[ भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-ग्रंथमाला पुस्तक ९ वें ]

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ

# वार्षिक इतिवृत्त

शके १८३६

संपादक व प्रकाशक
खंडेराव चिंतामण मेहेंदळे
चिटणीस



विजयादशमी १८३७

किंमत २ रुपये

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ पुणें

## वार्षिक इतिवृत्त शके १८३६ सालचें

सन्माननीय अध्यक्ष व विद्वान् सभासद हो, भारत-इतिहास-संशोधक-मंडळाची स्थापना होऊन सुमारें पांच वर्षे पुरीं होत आलीं. पूर्वीं चार वर्षांचें वृत्त आपणांस निवेदन केलें आहे च. आज पांचव्या वर्षाचें-शके १८३६ चें-इतिवृत्त आपणांस सादर करीत आहे.

गेल्या वर्षी मंडळाच्या २१ पाक्षिक सभा झाल्या; त्यावेळीं हजर असणाऱ्या सभासदांचें सरासरी प्रमाण १२ होतें. शिवाय ना. के. गोपाळ कृष्ण गोखले यांच्या शोकजनक मृत्यूमुळें एक सभा बंद ठेविली व एक विशेष सभा भरवून त्यांचे कुटुंबीयांस दुखवट्याचा ठराव करून कळविला. शिवाय मंडळाच्या कामाबद्दल सुज्ञ माणसांत आवड उत्पन्न करण्यासाठीं व मंडळास जास्त सभासद मिळविण्यासाठीं दोन विशेष सभा भरविण्यांत आल्या; एक सातारा येथें रा. ब. चिंतामण विनायक वैद्य यांचे अध्यक्षतेखालीं व दुसरी फर्ग्युसन कॉलेजांतील अॅंफिथिएटरमध्यें प्रो. हरि गोविंद लिमये यांचे अध्यक्षतेखालीं.

पाक्षिक सभांत वेळोवेळीं वाचलेले बहुतेक सर्व निबंध वार्षिक इतिवृत्तांत छापले आहेत. रा. पटवर्धन यांनीं बर्वे घराण्याच्या कागदपत्रांतील कागद निवडून त्यांवर कांहीं टांचणें लिहिलीं होतीं; परंतु बर्वे यांच्या कागदपत्रांचा एक स्वतंत्र खंड ते तयार करीत आहेत तेव्हां ते सर्व कागद रा. पटवर्धनांनीं मागें ठेविले आहेत. बाकी राहिलेले निबंध उपमंडळास सादर करून शके १८३७ च्या इतिवृत्तांत सामील करून प्रसिद्ध करूं.

प्रथम संमेलनानंतर शिवाजीस्मारककमेटीकडे केलेल्या अर्जाचा निकाल अद्याप झालेला नाहीं. ज्या उद्देशानें व ज्या धोरणानें फंड जमविला तिकडे च त्या पैशाचा विनियोग शक्य तर करावा व तें न च जमेल तर मग अतिसहानुभूतिपूर्वक मंडळाच्या अर्जाचा विचार करूं असें स्मारककमेटीचे अध्यक्ष रा. दाजी आबाजी खरे व सेक्रेटरी रा. बाळ गंगाधर टिळक यानीं सांगितलें आहे. महाराष्ट्र कवि अंगावर घेऊन त्यांत महाराष्ट्रीय सारस्वताची भर घातल्यापासून आजवर खालील ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत.

[ १ ] श्री मुकुंदमुनिप्रणीतं महाभाष्यम् ( संस्कृत )
[ २ ] ग्रंथराज दासोपंत कृत
[ ३ ] स्फुट प्रकरणें भाग १
[ ४ ] ,, भाग २

हे ग्रंथ तयार करण्यापासून तों छापवून बांधवून पाठविण्याचें सर्व काम रा. शंकर श्रीकृष्ण देव, रा. गोविंद काशीनाथ चांदोरकर व रा. भास्कर वामन भट वगैरे आपले धुळ्याचे सभासद विशेष आस्थेनें करतात, याबद्दल ते त्रिवर्ग व त्यांची इतर साहाय्यकारी मंडळी यांचे मी मंडळाच्या वतीनें अतिशय कृतज्ञतापूर्वक आपणा सर्वत्रांचे परवानगीनें आभार मानतों.

द्वितीयसंमेलनांत ठरविल्याप्रमाणें मंडळामार्फत करावयाच्या सूचीच्या पहिल्या हप्त्याचा सर्व भार धुळेकरांनीं आपले शिरावर घेऊन रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं संपादलेल्या १।२।३।४।५।६।७।८।९।१०।११।१२।१५।१६।१७।१८।१९ इतक्या खंडांतील अस्सल कागदपत्रांची सूची तयार केली आहे. सूचीचा नमुना खालीलप्रमाणें केला आहेः—

| व्यक्ति—स्थल | काल | प्रसंग | संदर्भ |
|---|---|---|---|
| | शक<br>महिना<br>मिति<br>वार | | खंड<br>प्रकरण<br>लेखांक<br>पृष्ठ |

सूचीची सर्व व्यवस्था रा. गोविंद काशीनाथ चांदोरकर यांजकडे होती व त्यांस खालील गृहस्थांचें साहाय्य झालें. रा. अनंत विश्वनाथ टिळक, रा. परचुरे, रा. दीक्षित, रा. भालचंद्र गणेश साठे, रा. परांजपे, रा. खरे, रा. चांदोरकर, रा. भट, व रा. रणदिवे; व या साहाय्याबद्दल मंडळ त्यांचे ऋणी आहे व मंडळावर असा च लोभ निरंतर असूं द्यावा अशी त्यांस आमची विनंति आहे.

रा. न. चिं. केळकर व इतर ५।६ गृहस्थ रा. वासुदेव वामन खरे यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाची सूची करीत आहेत; व पुढील संमेलनापूर्वी तें काम पुरें करणार आहेत. रा. ब. साने व पारसनीस यांच्या ग्रंथांच्या व इतर अस्सल कागदपत्रांच्या कांहीं ग्रंथांच्या सूचींचें काम पुनः वांटून घेऊन पुढील संमेलनापूर्वी करण्याची कांहीं व्यवस्था केली पाहिजे.

थॅंक डफ मधील आढळून आलेल्या चुका एकत्र करण्याचें काम सुरू आहे. पुष्कळशा चुका सूची तयार झाल्यानें सहज दाखवितां येण्याजोग्या असल्यामुळें सभासदांनीं विशेष भर सूचीवर दिलेला होता. तथापि डफ मधील चुकांना पाहण्या हमा लवकर च आपणापुढें विचारार्थ येईल.

सर्व वर्तमानपत्रांनी व मासिकांनी मंडळाच्या कामाबद्दल पूर्ण सहानुभूति आहे. केसरी व ज्ञानप्रकाश पूर्वीप्रमाणें व मंडळाच्या मासिक सभेच्या हकीकती तपशीलप्रमाणें प्रसिद्ध करून मंडळाच्या कामाबद्दल लोकांमध्यें आदर [illegible].

श्री. गं. ना. मुजूमदार, रा. पां. न. पटवर्धन, रा. अ. वि. पटवर्धन, रा. देव, रा. चांदोरकर, रा. भट वगैरेंचें सभासद मिळविण्याचे कामीं विशेष साहाय्य झालें; रा. न. चिं केळकर यांनीं हरएक बाबतींत मंडळास सल्लामसलत दिली.

शके १८३६ सालीं खालील गृहस्थ मंडळाचे सभासद होते.

## ( अ ) आश्रयदाते सभासद

१ श्री. सर परशरामराव भाऊसाहेब पटवर्धन सं. जमखंडी के. सी. आयू. ई. — जमखंडी

## ( आ ) हितकर्ते सभासद

२ श्री. नारायराव गोविंद ऊर्फ बाबासाहेब घोरपडे, संस्थान इचलकरंजी — इचलकरंजी

३ कै. श्री. बळवंत बाबाजी देशपांडे बी. ए. एल एल. बी. वकील — अहमदगर

## ( इ ) सभासद ×

४ रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर बी. ए. एल. एल. बी. — पुणें

५ रा. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर बी. ए. — ,,

६ श्री. रा. मार्तंड त्रिंबक गद्रे, इनामदार — ,,

७ श्री. व्यंकटराव तात्यासाहेब गुजर, जाहागिरदार — नागपूर

८ कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले बी. ए सी. आय. ई. — पुणें

९ रा. रा. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे बी. ए. एल. एल. बी. हायकोर्ट वकील — मुंबई

१० रा. रा. गोविंद काशीनाथ चांदोरकर बी. ए. एल. एल. बी. — धुळें

११ रा. रा. मुकुंद रामराव जयकर एम. ए. बार–ॲट लॉ. — मुंबई

१२ रा. रा. प्रोफेसर बळवंतराय कल्याणराय ठाकोर एम. ए. — पुणें

१३ श्रीमंत रामराव अमृतराव ऊर्फ आबासाहेब डफळे सं० जत — जत

१४ शंकर श्रीकृष्ण देव बी. ए. एल्. एल्. बी. वकील — धुळें

१५ श्री. रा. पंजाबराव बाजीराव देशमुख — सेंदुरजना

१६ श्री. रा. विनायक नीळकंठ नातू, इनामदार — पुणें

१७ रा. रा. अनंत विनायक पटवर्धन बी. ए. — पुणें

१८ श्रीमंत सरदार गोविंद बळवंत पटवर्धन शास्त्री — सावली

१९ रा. ब सीताराम विश्वनाथ पटवर्धन बी. ए. — पुणें

२० रा. रा. अनंत सखाराम फडके — भुसावळ

---

× यादी अकारविल्हे

२१ रा. रा. सदाशिव. रामचंद्र बखले बी. ए. एल्.एल्.बी. हायकोर्ट वकील, मुंबई
२२ श्रीमंत सरदार परशुराम कृष्ण बिवलकर अलिबाग
२३ रा. रा.नारायण मल्हार बेदरकर बी. ए. एल्. एल्. बी. वकील, उमरावती
२४ रा. रा. भास्कर वामन भट वकील धुळें
२५ रा. रा. विनायक लक्ष्मण भावे बी, एस्. सी, ठाणें
२६ रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनि एम्, ए. अकोला
२७ श्रीमंत सरदार गंगाधर नारायण मुजूमदार पुणें
२८ रा. रा. खंडेराव चिंतामण मेहेंदळे बी. ए. सरदार ( चिटणीस ) पुणें
२९ रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे बी. ए. इतिहाससंशोधक पुणें
३० श्री. गं भा. रमाबाई रानडे पुणें
३१ रा. ब. चिंतामण विनायक वैद्य एम् ए. एल्. एल्. बी. कल्याण
३२ ना. रा. ब. गणेश कृष्ण साठे वकील सोलापूर
३३ रा. ब. काशीनाथ नारायण साने बी. ए. ( अध्यक्ष ). पुणें

## ( ई ) साधारण सभासद ×

३४ रा. रा. बळवंत रामचंद्र अनगळ ॲडव्होकेट उमरावती
३५ रा. रा. जयराम केशव असनारे बी. ए. बी. एल्. ,,
३६ रा. रा. सदाशिव खंडो अळतेकर वकील कऱ्हाड
३७ रा. रा. गोपाळ नारायण उकिडवे सांगली
३८ ना. श्रीधर बाळकृष्ण उपासनी धुळें
३९ श्री. मोरेश्वर चिंतामण ओंकार, सरदार पुणें
४० रा. रा. अनंत रामचंद्र कवडे अहमदाबाद
४१ वैद्यपंचानन रा. कृष्णशास्त्री नारायणशास्त्री कवडे बी. ए. पुणें
४२ रा. रा. दत्तात्रय बळवंत काळसेकर शिराळें
४३ रा. सा. रावजी रामचंद्र काळे बी. ए. एल्. एल्. बी. सातारा
४४ प्रो. वामन गोविंद काळे एम्. ए. पुणें
४५ रा. रा. पी. व्ही. कृष्णस्वामी नाईक तंजावर
४६ श्री. रा. केशवराव वकील हैदराबाद
४७ रा. रा. श्रीनिवास व्यंकटेश कौजलगी बी. ए. एल्. एल्. बी. विजापूर
४८ रा. रा. गणेश सखाराम खरे. एंजिनीयर पुणें
४९ लक्ष्मण जनार्दन खरे एम्. ए. एल्. एल्. बी. उमरावती
५० रा. रा. अनंत हरि गद्रे पुणें
५१ रा. रा. गोपाळ रावजी गोगटे वकील [illegible]
५२ रा. रा. हरि गणेश गोडबोले बी. ए. पुणें

---

× यांची अकारविल्हे

| | | |
|---|---|---|
| ५३ | रा. रा. हरि केशव गोळे बी. ए. | पुणें |
| ५४ | रा. रा. नरहर रामचंद्र घुडे | कारंजा |
| ५५ | रा. रा. नारायण गोविंद चाफेकर बी. ए. एल्. एल्. बी. | धुळे |
| ५६ | रा. रा. गणेश कृष्ण चितळे बी. ए. एल्. एल्. बी. | अहमदनगर |
| ५७ | रा. रा. रामकृष्ण रावजी जयवंत बी. ए. एल्. एल्. बी. | उमरावती |
| ५८ | रा. रा. विश्वनाथ गणेश जावडेकर बी. ए. एल्. एल् बी. | धुळे |
| ५९ | रा. रा. व्यंटेश गणेश जावडेकर, वकील | अंमळनेर |
| ६० | रा. रा. मंगेश रामचंद्र टाकी | मुंबई |
| ६१ | रा. रा. अनंत विश्वनाथ टिळक बी. ए. एल्. एल्. बी. | धुळे |
| ६२ | रा. रा. रामचंद्र उमाकांत ढमढेरे | बडोदे |
| ६३ | रा. रा. यशवंत स्वामीराव तिळगुळकर बी. ए. एल्. एल्. बी. | विजापूर |
| ६४ | रा. रा. हरि विठ्ठल तुळपुळे बी. ए.एल् एल् बी. | पुणें |
| ६५ | रा. रा. सीताराम केशव दामले बी. ए. एल् एल् बी. | पुणें |
| ६६ | रा. रा. हरि श्रीकृष्ण देव एल्. एम्. एस् | पुणें |
| ६७ | रा. रा. सदाशिव महादेव दिवेकर | मुंबई |
| ६८ | रा. रा. नरसिंगराव कोन्हेर देशपांडे | सुळेभावी |
| ६९ | रा. रा. यशवंत गोविंद देशपांडे बी. ए. एल्. एल्. बी. | उमरावती |
| ७० | रा. रा राधाकृष्ण गणपत धोकटे | मुंबई |
| ७१ | रा. रा. बाबुराव हरि नाईक एम्. ए. | इंदूर |
| ७२ | रा. रा. गजानन घनःश्याम नाडकर्णी, ॲटव्होकेट | मुंबई |
| ७३ | श्री. रा. विनायकराव मोरेश्वर नातु, इनामदार | पुणें |
| ७४ | रा. रा. दत्तात्रय रामचंद्र पटवर्धन एम्. ए. एल्. एल्. बी. हायकोर्ट वकील | वांद्रा |
| ७५ | रा. रा. हरि केशव पटवर्धन एम्. ए. एल्. एल्. बी. | अहमदनगर |
| ७६ | रा. रा. शिवराम महादेव परांजपे एम्. ए. | पुणें |
| ७७ | रा. रा. गोपाळ सदाशिव पळसुले एल्. एम्. एस्. ( Ntl. ) | पुणें |
| ७८ | रा. रा. केशव आप्पा पाध्ये बी. ए. एल्. एल. बी. | ठाणें |
| ७९ | रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए. | पुणें |
| ८० | रा. रा. विनायक चिंतामण पांडे बी. ए. एल् एल् बी. | उमरावती |
| ८१ | रा. रा. श्रीकृष्ण व्यंकटेश पुणतांबेकर बी. ए. बार ॲट् लॉ | पुणें |
| ८२ | रा. रा. दत्तात्रेय शिवराम पुसाळकर वकील | एरंडोल |
| ८३ | रा. रा. रघुनाथ जगन्नाथ पेंडसे | विंचूर |
| ८४ | रा. रा. गोविंद नारायण पोतदार बी. एस्. सी. | मुंबई |
| ८५ | रा. रा. दत्तात्रेय वामन पोतदार बी. ए. | पुणें |

८६ रा. रा. वामन विष्णु फडके एम. ए. बार. ॲट. लॉ. पुणें
८७ रा. रा. गणेश वल्लाळ फणसळकर वकील सातारा
८८ रा. रा. नरहरि रघुनाथ फाटक अजमीर
८९ रा. रा. गोविंद वजाजी वक्षी वी. ए. तंजावर
९० रा. रा. रामकृष्ण वासुदेव वर्वे बी. ए. मुंबई
९१ रा. रा. केशव वामन ब्रह्म बी. ए एल् एल्. एल्. बी. उमरावती
९२ रा. रा. विष्णु काशीनाथ भागवत वकील अंमळनेर
९३ रा. रा. राजाराम रंगनाथ भालेराव पुणें
९४ रा. रा. नारायण बळवंत भिडे बी. ए. एल्. एल्. बी. पुणें
९५ रा. रा. बळवंत सखाराम भुसारी पुणें
९६ रा. रा. वासुदेव दामोदर मुंडले इसलामपुर
९७ रा. रा. कृष्णाजी बळवंत मोघे कारभारी ( सं. जमखंडी ) जमखंडी
९८ रा. रा. महादेव विष्णु मोडक बी. ए. एल. एल. बी. नंदुरबार
९९ रा. रा. विष्णु गोविंद विजापूरकर एम्. ए. तळेगांव दाभाडे
१०० रा. रा. मोतीराम बाळकृष्ण वेलकर एल्. एम. एस. मुंबई
१०१ रा. रा. शंकर रामचंद्र राजे पुणें
१०२ रा. रा. गोविंद पंढरीनाथ शिधोरे बी. ए. पुणें
१०३ रा. रा. वासुदेव विष्णु शिधोरे वकील धुळें
१०४ रा. रा. पांडुरंग केशव शिराळकर कऱ्हाड
१०५ रा. रा. दिनकर धोंडदेव साठये एल. आर. सी. पी. मुंबई
१०६ रा. रा. अच्युत सीताराम साठे एम्. ए. बी. एल. अकोला
१०७ रा. रा. भालचंद्र गणेश साठे बी. ए. एल. एल्. बी. पुणें
१०८ रा. रा. रामचंद्र धोंडदेव साठे बी. ए. एल. एल. बी. कुंदगांव

## ( उ ) साहानुभूतिक सभासद ×

१०९ रा. रा. द. वि. आपटे बी. ए. फोंडा गोवा
११० रा. रा. पांडुरंग वामन काणे एम्. ए. एल्. एल्. एम्. मुंबई
१११ रा. रा. केशव बाजीराव कुळकर्णी इंदापूर
११२ रा. रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर बी. ए. एल्. एल्. बी. जामगांव
११३ रा. रा. वासुदेव वामन खरे मिरज
११४ रा. रा. रघुनाथ हरि गद्रे वकील नाशिक
११५ रा. रा. महादेव मल्हार जोशी एम्. ए. जुनागड
११६ के. रा. रा. दत्तात्रय श्रीराम जोशी इनामदार तळेगांव दाभाडे
११७ रा. रा. वामन दामोदर तळवळकर, वकील पुणें
११८ रा. रा. महादेव गंगाधर दामले बी. ए. एल्. एल्. बी. उमरावती

---

× यादी अकारविल्हे

११९ रा. रा. रामचंद्र विनायक पटवर्धन बी. ए. एल्. एल्. बी. पुणें
१२० रा. रा. नीळकंठ पांडुरंग पाटणकर बी. ए. एल्. एल्. बी. नाशिक
१२१ रा. ब. विठ्ठलराव नारायण पाठक एम्. ए. सातारा
१२२ रा. ब. दत्तात्रेय बळवंत पारसनीस सातारा
१२३ श्रीमंत महादेव मोरेश्वर फडणीस ( भानू ) इनामदार पुणें
१२४ रा. रा. हरि रघुनाथ भागवत बी. ए. पुणें
१२५ रा. रा. चिंतामण गंगाधर भानू बी. ए. पुणें
१२६ रा. रा. दामोदर सावळाराम यंदे मुंबई
१२७ रा. रा. गोविंद बळवंत लघाटे बी. ए. एल्. एल्. बी. अहमदनगर
१२८ प्रो. हरि गोविंद लिमये एम्. ए. पुणें
१२९ रा. रा. विष्णु नारायण वर्तक एम्. ए. एल्. सी. ई. माळशिरस
१३० रा. रा. विनायक रामचंद्र सरज्योतिषी गोंवा

## ( उ ) वहाते सभासद ×

१३१ रा. रा. विष्णुबोवा अक्कलकोटकर अक्कलकोट
१३२ रा. रा. कृष्णाजी विष्णु आचार्य कालगांवकर पुणें
१३३ रा. रा. दामोदर वैजनाथ आठल्ये बी. ए. पुणें
१३४ रा. रा. गोविंद विनायक आपटे वाई
१३५ रा. रा. वासुदेव गोविंद आपटे बी. ए. इंदूर
१३६ रा. रा. हरि नारायण आपटे पुणें
१३७ रा. रा. जनार्दन विनायक ओक एम्. ए. तळेगांव दाभाडे
१३८ रा. रा. जनार्दन सखाराम करंदीकर बी. ए. एल्. एल्. बी. पुणें
१३९ रा. रा. रघुनाथ पांडुरंग करंदीकर सातारा
१४० कै. रा. रा. त्र्यंबक गुरुनाथ काळे पुणें
१४१ रा. रा. हरि नारायण किरपेकर पुणें
१४२ रा. रा. श्रीधर व्यंकटेश केतकर एम्. ए. पी. एच्. डी. उमरावती
१४३ रा. रा. माधव विष्णु खरे वकील एरंडोल
१४४ रा. रा. रामचंद्र जनार्दन गोखले पुणें
१४५ रा. रा. विष्णु दत्तात्रेय गोखले एम्. ए. पुणें
१४६ कै. रा. रा. बाळकृष्ण हरि गोगटे एम्. ए. पुणें
१४७ प्रो. विनायक सखाराम घाटे एम्. ए. पुणें
१४८ रा. रा. मल्हारराव राघोबा जाधव नेवासे
१४९ रा. रा. वामन मल्हार जोशी एम्. ए. पुणें
१५० रा. रा. शंकर नारायण जोशी पुणें
१५१ रा. रा. राजाराम दामोदर देसाई एम्. ए. तळेगांव दाभाडे

---

× यादी अकारविल्हे

१५२ रा. रा. सी. ल. नाडकर्णी इंदूर
१५३ रा. रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन पुणें
१५४ नामदार प्रि. रघुनाथ पुरुषोत्तम परांजप्ये एम्, ए. बी. एस. सी. पुणें
१५५ रा. रा. रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर पुणें
१५६ रा. रा. गणेश लक्ष्मण पागे मुंबई
१५७ रा. रा. भास्कर विष्णु फडके बी. ए. मुंबई
१५८ V. R. Phadke सांगली
१५९ रा. रा. अनंत वासुदेव फडणीस पुणें
१६० रा. रा. विनायक महादेव मुस्कुटे पुणें
१६१ रा. रा. शंकर अनंत भोसेकर मालेगांव
१६२ रा. रा. नारायण विठ्ठल मावळणकर पुणें
१६३ रा. रा. गणेश सखाराम मराठे एम्. ए. पुणें
१६४ रा. रा. काशीनाथ कृष्ण लेले धार
१६५ रा. रा. शंकर रावजी सोनार मुंढवे
१६६ रा. रा. शिवराम विनायक शेवडे बी. एस्. सी. तळेगांव दाभाडे
१६७ रा. रा. कृष्णाजी त्र्यंबक हसबनीस पुणें
१६८ प्रो. शेख अबदुल कादर सर्फराज हे मंडळाचे सभासद आहेत पण कोणत्या वर्गांत नांव घालावयाचें तें त्यांनीं अद्याप कळविलें नाहीं. म्हणजे गेल्या सालीं एकंदर नवीन ६७ सभासद झाले.

## जमाखर्चाचा तक्ता

| | | | |
|---|---|---|---|
| ११०१–८–६ | शिल्लक सालगुदस्त | ६७६–०–० | शके १८३५चे इतिवृत्ताची छपाई |
| ७८५–०–० | वर्गणी जमा | ९७–९–० | किरकोळ छपाई, बांधणी वगैरे |
| ३९२–०–० | ग्रंथविक्री | ६७–०–० | संशोधनखर्च |
| २००–०–० | देणगी एका वनवासी मित्राकडून | ८२–३–९ | टपालखर्च |
| | | ७३–२–० | ग्रंथ खरेदी |
| | | ७२–१–११ | किरकोळ |
| २४७८–८–६ | | १०६८–०–८ | |

वरचेवर तगादयाचीं पत्रें जात होतीं तरी हि साल अखेरीस फक्त तृतीयांश सभासदांनीं वर्गणी दिली होती. त्यामुळें वर्गणीच्या जमेच्या रकमेंत कम-तरता दिसत आहे. साल अखेरीस निकडीच्या तगादयाचीं पत्रें पाठविलीं तेव्हां

निम्म्यापर्यंत वर्गणी वसूल होत आली आहे. परंतु अशा रीतीनें वर्गणी साचत गेल्यास सभासदांस वर्गणी देणें जरा जड जाईल तरी त्यांनीं ही च फिरून एकवार केलेली सार्वत्रिक मागणी समजून मागील व चालू सालची वर्गणी सालअखेरीच्या आंत पाठविण्याची कृपा करावी. एरवीं द्रव्याभावीं आपण योजिलेल्या व योजणार त्या सर्व योजनांच्या नाड्या आवळल्या जाण्याची भीति आहे. असा प्रसंग आपणासारखे सुज्ञ लोक मंडळावर आणणार नाहींत अशी मला आशा आहे. ग्रंथविक्रीच्या संदर्भात मुंबई सरकारनें नंबर ११५८ एज्युकेशनल डिपार्टमेंट ता. ३०।३।१९१४ च्या पत्राप्रमाणें विनशर्त घेतलेल्या अहवाल शके १८३२।१८३३। १८३४ व खंड १२ यांच्या प्रत्येकी पंचवीस प्रतींची जमा आहे. आर्यभूषण व ज्ञानप्रकाश छापखान्यांशीं चैत्र ते फाल्गुन पर्यंत झालेला व्यवहार हिशोबांत नमूद केला आहे. श्रीआत्माराम छापखान्यांत नुकत्या च पुरे झालेल्या कामाचा हिशोब अद्याप होणें आहे. आतां आपण आहोंत ते सर्व सभासद कायम राहून कांहीं जास्त सभासद होतील या धोरणानें पुढील वर्षाचें स्थूल अंदाजपत्रक सादर करतों.

| जमा | |
|---|---|
| ३००० रु. | ६०० संशोधनार्थ खर्च |
| मागील वर्गणी | ८०० संमेलनवृत्त व वार्षिक इतिवृत्त मिळून छपाईखर्च |
| व चालू वर्गणी | ५०० इतिहाससाधनांचा खंड |
| देणगी वगैरे | ५०० सूची खर्च |
| मिळून जमा | १२५ टपालखर्च |
| | ५० किरकोळ खर्च |
| | १०० कवींची सूची |
| | २६७५ |

स्वतःच्या इतिहासाचीं व चारित्र्यपरंपरेचीं विविध साधनें मिळवून, निर्भेळ सत्यान्वेषणासाठीं त्या साधनांचें संशोधन करून व विचिकित्सक बुद्धीनें छाननी करून तीं साधनें योग्य स्वरूपांत प्रथम प्रकाशित करणें हें प्रत्येक राष्ट्राच्या प्रगतिशालित्वाचें द्योतक आहे. या दुअंगी कामाची आमच्या देशास जाणीव आहे च. पण ती जितकी उद्दीप्त स्वरूपाची व सार्वत्रिक असावी तितकी फलप्राप्तीचे दृष्टीनें अद्याप दिसून येत नाहीं. नामदार सर जेम्स मेस्टन प्रभृति इलाखाधिपती म्हणजे पर्यायानें सरकार च या दुअंगी कामगिरीचें महत्त्व आम्हा शिकलेल्या लोकांचे निदर्शनास साधतील तितक्या प्रसंगांनीं आणण्याची संधि

दवडील नाहींत. म्हणजे अशा कामीं सरकारकडून सुशिक्षित लोकांस सहानुभूति, प्रोत्साहन व साहाय्य हें मिळालें च पाहिजे; त्या च प्रमाणें विश्वविद्यालयाकडून हि मिळालें पाहिजे. या दृष्टीनें रिसर्च स्कालरशिपा वगैरे मार्गांनीं थोड्या बहूत तरतुदी झाल्या आहेत. पण आणखी पुष्कळ करून घेतल्या पाहिजेत. या कामीं सधन व ऐपतदार लोकांवर त्यांचे परीनें जबाबदारी येणार च व ती ते कर्तव्य म्हणून घेतील यांत बिलकूल शंका नाहीं. याचीं स्तुत्य उदाहरणें आपले समोर आहेत. परंतु श्रीमान् लोकांच्या दानशूरतेस इष्ट वळण मात्र लागलें गेलें पाहिजे; व तें वळण पुष्कळ अंशीं काम करणाऱ्यांच्या कर्तबगारीवर व योजल्या जाणाऱ्या कार्यावर अवलंबून राहणार.

संशोधनात्मक काम व विचिकित्सक बुद्धि यांची जोपासना व्हावी, साधनांचा संग्रह व्हावा व या मार्गानें काम करणारीं व या संबंधांत कळकळ वाटणारीं आणि तळमळ लागलेलीं व्यासंगी माणसें एकत्र जमून कांहीं अपेक्षित कार्य घडावें हा थोर उद्देश सफल व्हावा म्हणून संघटित रीतीनें प्रयत्न करणाऱ्या ( १ ) कलकत्याची रिसर्च सोसायटी व हिस्टारिकल सोसायटी, ( २ ) बहारप्रांतांतील बांकीपूर येथील नुकती च स्थापन झालेली बिहार रिसर्च सोसायटी,(३)मद्रास हिस्टारिकल सोसायटी, व साउथ इंडियन ॲसोसिएशन,(४)पंजाब हिस्टारिकल सोसायटी,इत्यादि चार पांच अत्यंत उपयुक्त व राष्ट्रहितकारी ज्या थोड्या संस्था स्थापन झालेल्या आहेत त्या च उद्देशानुरूप व त्या च दिशेनें काम करणारी महाराष्ट्रांतील संस्था म्हटली म्हणजे आमचें भारत–इतिहास–संशोधक–मंडळ होय. वरील संस्थांची हकीकत, त्या करीत असलेलें काम, त्यांच्या योगक्षेमाची तरतूद, सरकारकडून व तत्तद्देशस्थ संपन्न लोकांकडून त्यांस मिळालेल्या देणग्या व सवलती, त्यांचे मौल्यवान ग्रंथसंग्रह, त्यांत उत्साहानें व कळकळीनें काम करणारे विद्वान् लोक वगैरे बद्दलची प्रसिद्ध माहिती इकडील बऱ्याच सापेक्ष लोकांस असेल च. परंतु आपल्या संस्थेची स्थिति तुलनात्मक दृष्टीनें पाहिली असतां कांहीं बाबतींत सदृश तर बऱ्याच बाबतींत अगदीं भिन्न अशी आहे. त्यांपैकीं सुस्थितीच्या बाबी—त्या अगदीं च अल्प प्रमाणांत आहेत—वगळल्या तर गैरसोयींच्या व अडचणींच्या पण निकडीच्या अशा बाबी ज्या आपल्यास नेहमीं जाणवतात व नडतात त्यांसंबंधीं मी पुढें उल्लेख करणार च आहे. त्यांची तरतूद आपण आपल्या सामर्थ्यानुसार करवेल व साधेल तशी करण्याची व साधण्याची नेटानें योजना व खटपट करावी अशी आपणांस सूचना करणें भाग आहे.

आपले मंडळाची स्थापना होऊन उणीं पुरीं पांच वर्षें झालीं. या अवधींत आपण केलेल्या कामाचें पर्यालोचन करून, करावयास पाहिजेल्या व करावें लागणाऱ्या अवाढव्य कामाचें दिग्दर्शन व स्थूलदृष्ट्या समालोचन हि करण्यासाठीं आम्हीं

परवानगी मागून घेतों. या कालांत संशोधन जें कांहीं झालें तें प्राधान्यें करून महाराष्ट्रांतील प्रांतांत च झालें. या कामीं रा. राजवाडे, रा. देव, रा. चांदोरकर, रा. आपटे व सरज्योतिषी ( गोंवाप्रांत ), रा. पटवर्धन, श्रीमंत सरदार मुजूमदार, रा. आचार्य, रा. पोतदार, व आपले अध्यक्ष यांची च कामगिरी विशेष लक्षांत येणारी व लक्ष वेधणारी आहे. अधून मधून अल्प स्वल्प काम करणारे व हस्तें परहस्तें या कामास मदत करणारे आणखी ५।७ सभासद आहेत. यांपेक्षां आपल्यांपैकीं आणखी कितीतरी सभासदांनीं हें काम होसेनें व आस्थेनें करावयास लागलें पाहिजे. शोध करण्याचें काम सतत चालू ठेवलें नाहीं तर मंडळाचे शरीरांत जीवन तें काय खेळणार ? गोंवाप्रांत, कोंकण, मावळ, खानदेश, छिंदवाडा ( नागपूर ), सातारा, कोल्हापूर इलाखा, पैठण व तंजावराकडील कांहीं भाग एवढें च आपल्या आजवर झालेल्या संशोधनाचें क्षेत्र जरी असलें तरी त्या च मर्यादित क्षेत्रांत संशोधनास अद्याप किती तरी वाव आहे ? अशी वेळ येऊन ठेपली आहे कीं, प्रत्येक संशोधकानें मर्यादित क्षेत्र आंखून घेऊन त्यांत च काम कसून करावें व जी सामुग्री उपलब्ध होईल तीवर चर्चात्मक लिखाण नंतर स्वस्थपणानें करावें. पण प्रथम साधनें मिळविण्याचा च प्रयत्न केला पाहिजे.

मंडळाच्या प्रसिद्ध झालेल्या इतिवृत्तांतून या साधनांची विविधरूपता मासल्याचे रुपानें आपले निदर्शनास आलेली च आहे. श्रमविभागाचे तत्वानुरोधें काम करून अभिरुचीचे कलाप्रमाणें एकेका अंगाचा पतकर घेतला गेल्यास किती तरी काम होणार आहे. असें करण्यांत एकांगपरतेचा दोष आला तरी बेहत्तर पण त्या अंगापुरती संपूर्ण माहिती मिळविली पाहिजे व त्यांत पारंगतता संपादिली पाहिजे.

ताम्रपट व शिलालेख यांचा थोडा फार समावेश मंडळाचे कामांत झालेला आपले पुढें आहे च. त्यांच्या प्रतिकृती छापवून आधुनिक पद्धतीनें योग्य परिष्कार करून ते प्रसिद्ध करणें आपल्या ऐपतीच्या बाहेर होतें तरी पण तें हि करण्याची ऐपत मंडळास लवकर येईल अशी निदान मला तरी उमेद आहे. त्यांतून निघणारें माहितीचें महत्व मात्र कांहीं कमी नाहीं.

अज्ञात महाराष्ट्रीय ग्रंथ व ग्रंथकार व त्यांजबद्दलची माहिती नवीनं अशी बरी च आपण प्रसिद्ध केलेली आहे. ही माहिती सर्व संकलित करून पुस्तकरुपानें रा. गोविंदराव चांदोरकर यांनीं प्रसिद्ध केली आहे. आफ्रेटचे Catalogus Catalogorum या आदर्शभूत पुस्तकासारखी या पुस्तकाची रचना केली आहे या पुस्तकाची जरूर संशोधकांस नेहमीं भासत असे. ही जोड करून दिल्याबद्दल

आपण रा. चांदोरकरांचे आभारी असलें पाहिजे.* सदर काम कोणास हि भूषणास्पद होणार च. महाराष्ट्र या अत्यंत उपयुक्त ग्रंथाचें योग्य तें चीज करील च अशी खात्री आहे.

मराठी भाषेची विचिकित्सा, तिचे व्याकरणाचा ऐतिहासिक विचार, शब्दसिद्धि व निरुक्तिच्या साह्यानें होणारी उपपत्ति व व्युत्पत्ति या बाबतींत बरें च स्पष्ट रीतीनें व निश्चिततेनें आपण मार्ग आक्रमिला आहे. या भागांतील परिश्रम रा. राजवाडे यांचे च विशेषपणानें नमूद झालेले आहेत. सुबंतविचार, ज्ञानेश्वरीचें व्याकरण, तिङन्तविचार, चर्चात्मक निबंधांतून निघणारे निष्कर्ष व एकंदर व्युत्पादिलेले मराठींतील शब्द—एवढें च म्हटलें तरी झालेलें काम निःसंशय आदरणीय आहे. या बाबतींत हि मंडळा बाहेरील विद्वान् लोकांकडून जितका खल व्हावा अशी अपेक्षा होती ती अद्याप तरी तशी च मुग्ध स्थितींत आहे. वरील ग्रंथांत व निबंधांत ठरविलेले अगर सुचविलेले प्रतिपादनानें या विषयास जरी चालना मिळाली व तें प्रतिपादन अधिकृत व व्यासंगी विद्वानांकडून आक्षेपिलें गेलें तरी बरें च. जास्त खल होऊन कांहीं निश्चित निकाल तरी लागेल. ज्ञानेश्वरीच्या जुन्या पाठाचा नववा अध्याय गेले संमेलनांत आपल्यास दाखविला गेला होता. ती प्रत व रा. राजवाडे यांणीं संपादिलेली ज्ञानेश्वरी या दोन प्रतींवरून भाषाशास्त्राचे व निरुक्तीचे दृष्टीनें रा. राजवाडे यांणीं मंडळाचे सभासदांस ज्ञानेश्वरीचा नववा अध्याय लावून दाखवावा व तत्कालीन भाषेचें व्याकरण वगैरे समजावून द्यावें या उद्देशानें मंडळानें पांच सहा व्याख्यानें करविलीं. सदर व्याख्यानांसाठीं मुद्दाम अत्यंत परिश्रम घेऊन रा. राजवाडे यांणीं नववा अध्याय टिप्पणें देऊन संस्कृतांत भाषान्तरित करून तयार केला आहे. तो छापवून काढल्यास या मेहनतीचें फल या विषयाची अभिरुचि व जिज्ञासा असलेल्या सभासदांस विशेष सोयीनें मिळेल व अभ्यासास मदत होईल असें मला व व्याख्यानांचा फायदा ज्यांनीं घेतला त्या सर्वांस वाटत आहे. तो अध्याय छापून काढण्याची कांहीं तरी व्यवस्था झाली पाहिजे अशी माझी मंडळास सूचना आहे.

प्रथम संमेलनप्रसंगीं "महाराष्ट्रीय सारस्वत व महाराष्ट्र कवि" या मासिकानें द्वारा मंडळानें रा. विनायकराव भावे यांचें "महाराष्ट्र कवि" मासिक सुरू करून त्यांत अप्रसिद्ध जुन्या कवींचे ग्रंथ प्रकाशित करण्याचें अंगावर घेतलें होतें त्याप्रमाणें यांनी [illegible] पानें मजकूर प्रसिद्ध केला आहे. वाचकांनीं [illegible] त्यानें मजकूर [illegible] व प्रसिद्ध

रहे. मजकुराची योजना होत आहे. सुमारें ५,००० पानें भरतील इतकी काव्या-
त्मक, चरित्रात्मक वगैरे मजकूर रा. भावे यांणीं छापण्याचें ठरविलें आहे. त्याप्रमाणें
तें करतील अशी मंडळाची खात्री आहे. या पुढील योजना या बाबतींत काय
आहे ती ठरावाचे रूपानें आपले पुढें येणार आहे च.

गेल्या सालीं संमेलनांत रा. भास्करराव भट यांणीं महाराष्ट्रांतील व्यवहार-
निर्णयपद्धतीवर वाचलेल्या निबंधानें जुन्या महजरांचा व कागदपत्रांचा अभ्यास
करणारांस एक अगदीं नवीन च दिशा दाखविली. या मिळालेल्या स्फूर्तीमुळें व
सुचलेल्या दिशेमुळें कांहीं मंडळी ग्रामसंस्था, शासनपद्धति, वगैरे गोष्टींचा
सोपपत्तिक अभ्यास करीत आहेत. त्यांचें विवेचनात्मक उत्पादन आपणास
केव्हां तरी लौकर एकावयास मिळेल असें वाटतें. या दृष्टीनें जुन्या अस्सल
कागदांचा अभ्यास करण्याची अभिरुचि उत्पन्न होणें हें वाढत्या इतिहासा-
भिरुचीचें निदर्शन आहे.

६ जुन्या बखरी, हकीकतींच्या त्रोटक नोंदी, याद्या, करीने वगैरे आपण
छापविलेले आहेत. त्याचा उपयोग हा च कीं इतिहासाचा एक एक दुवा मोठ्या
खटपटीनें हुडकून काढतां येऊन त्याची पुढें सुसंबद्ध सांखळी बनावी. दोन जुनीं
मस्तकें प्रसिद्ध केलीं गेलीं त्यावरून जुन्या कागदपत्रांतील हिशोबांचे सरणीचा,
हक्कलाजिम्यांचा, वतनचाचींचा व फार कालापासून प्रचारांत असलेल्या शासन-
यंत्राचे परिभाषेचा उलगडा व्हावा, व परंपरेनें त्याचे यथार्थ स्वरूपाची स्थूल रूप-
रेखा तरी समजावी.

आंता राहतां राहिला अस्सल कागदपत्रांचा भाग. या भागापुरतें असें म्हण-
ण्यास चिलकूल दिक्कत वाटत नाहीं कीं, मंडळानें एवढें च जरी काम केलें असतें
तरी मंडळाची उपयुक्तता या एका बाबीवर च सिद्ध झाली असती. "मराठ्यांच्या
इतिहासाचीं साधनें खंड १२" व "म. इ. सा. खंड २० वा–शिवकालीन पत्रणी" हे
दोन ग्रंथ मंडळामार्फत प्रसिद्ध झाले आहेत. पहिले ग्रंथांत रघुनाथराव देशाव व त्यांचे
कारभारी चिंतो विठ्ठल रायरीकर यांचा अस्सल पत्रव्यवहार आलेला आहे. दुसरा ग्रंथ
छापून तयार जाहला आहे. यांतील महत्वाच्या नोंदी आपणांस आगाऊ सांगून
आपले कुतूहलाचा हिरमोड करणें रास्त नव्हे. आपले मंडळाचा पर्यायानें ज्या
ग्रंथांशीं संबंध येतो त्यांत रा. ब. दत्तोपंत पारसनीस यांचा 'इतिहाससंग्रह',
रा. वासुदेवशास्त्री खरे यांचा ऐतिहासिक लेखसंग्रह भाग ८ वा व रा. शंकररावजी
देव यांणीं नुकता च प्रसिद्ध केलेला 'श्री (समर्थ) संप्रदायाचीं कागदपत्रें" हा ग्रंथ;
हे तिघे गृहस्थ आपले मंडळाचे सभासद आहेत; व हे त्यांचे ग्रंथ ते करीत
असलेल्या अवांतर व्यापाचें फल. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १६,
१७, १८– शिवकालीन पत्रणी–व खंड १९ असे भाग 'इतिहाससंग्रहांत' प्रसिद्ध
झाले आहेत. सदरील दोन्ही मासिकें आपल्या मंडळास संग्रहणीय आहेत; यांत-

यांचीं जुनीं दप्तरें धुंडाळलीं पाहिजेत. त्यांचे करीने, कैफीयती, सनदा, पत्रव्यवहार मिळविला पाहिजे. या कामीं त्यांची मदत तर पाहिजे च व ती मंडळाला हळू हळू मिळणार हें हि खचित. परंतु त्यांचा विश्वास आपल्या कामावर जोडला गेला पाहिजे; व तो आपलें मंडळ रजिष्टर झाल्यावर व आपल्या मालकीच्या घरांत संसार थाटून नांदूं लागल्यावर बसावयास लागेल अशी अटकळ करण्यास प्रत्यवाय न यावा. शिवाय सरकारचे दप्तरखान्यांत चिटणिशी दप्तरांतील किती तरी कागद पडले असतील ते त्यांच्या परवानगीनें व सहकारित्वानें तपासून त्यांतील माहिती प्रसिद्ध करण्याची योजना केली पाहिजे. या कामांत सरकारचे पदरीं वाकचगार लोक आहेत ते व आपले मंडळांतील अधिकृत सभासद यांनीं मिळून सदरहु प्रकारचें काम चांगलें केल्यास तें योग्य स्वरूपानें बाहेर येईल. नाहीं तर नुकत्या च प्रसिद्ध झालेल्या 'सनदा' व 'तहनामे' या दोन पुस्तकांचे सारखी स्थिति व्हावयाची. या कामांत मूळ कागद वगैरे वाचण्याच्या चुका झालेल्या आहेत. हें त्यांतील वैगुण्य काढावें म्हणून म्हणत नाहीं तर ती केवळ निरुपायाची गोष्ट आहे. कारण कदाचित् नकला केल्या गेल्या असतील त्या वेळचे स्थितींत व हल्लींचे विशेष परिश्रमानें दृढ व निश्चित झालेल्या माहितीच्या, वाचनाच्या व संवईच्या वगैरे परिस्थितींत फार अंतर पडलें आहे. ही बाब विसरतां कामा नये. वर उल्लेखिलेल्या बाबतींत आपलें सरकार आपल्या मंडळास जरूर त्या सवलती व सोई मोठ्या खुषीनें करून देईलसें वाटतें. या संशोधनाचे बाबतींत आपले मंडळास मुंबई विश्वविद्यालयाकडून हि थोडी फार मदत मिळण्याचा संभव आहे. या संबंधांत जी खटपट करावयाची त्या बद्दल आपले पुढें ठरावाचे रूपानें सूचना येणार आहे तेव्हां या बाबीचा योग्य तो खल होईल च.

आपले मंडळांतील संशोधनाचें काम करणारास पदोपदीं अडचण भासते ती पोक्त व सर्वांगसुंदर अशा इतिहासविषयोपयोगी संदर्भ-ग्रंथसंग्रहाची. आपल्या या ऐतिहासिक शहरांत सर्व प्रकारच्या शिक्षणविषयक संस्था उत्तम रीतीनें काम करीत आहेत. सर्व प्रकारच्या प्रागतिक चळवळींचा उगम येथून च झालेला आहे व त्या चळवळींचें केन्द्रस्थान बनण्याचें पुण्य अथवा श्रेय या शहरानें जोडलें आहे. तरी अशा ठिकाणीं च कलकत्त्यांतील Imperial Library सारखी संस्था सरकारनें सार्वजनिक उपयोगाची काढली तर लोकांवर महत् उपकार होतील. व व्यासंगी लोकांची केवढी सोय होणार आहे. शिक्षणाचे बाबतींत सरकारनें ठरविलेल्या उदार धोरणानुरोधानें अशी संस्था काढणें हें सरकारच्या अवश्य कर्तव्यांपैकीं च प्रमुख कर्तव्य होईल अशी आशा करण्यास जागा आहे. सध्यांच्या नाहक उत्पन्न झालेल्या अडचणींतून सरकार मोकळें झाल्यावर-व तें तसें लवकर च मोकळें होईल, कारण सत्पक्षाचा . . . . . .

# अनुक्रमणिका

# वार्षिक इतिवृत्त

## शके १८३६ चें

### १ ठेंगें मत

१ कोंकणांत देवाच्या गोठण्यास गोडबोले यांजकडे चित्तपावनांचीं चौदा गोत्रें व साठ कुळें याजसंबंधानें एक पत्रक मिळालें, त्यांत ठेंगें मत हे शब्द आलेले आहेत. ठेंग ( गा–गी–गें ), ठेंगणा हे मराठी शब्द स्थग, स्थगीयस्, स्थगिष्ट ह्या संस्कृत तरतमभाव दाखविणाऱ्या शब्दांपासून निघालेले आहेत.

स्थग = ठग = ठेग, ठेंग ( गा–गी–गें )
स्थगीयान् = ठगाण = ठेंगाण ( णा–णी–णें )
= ठेंगण ( णा–णी–णें )
स्थगिष्ट = ठेंगट

स्थग म्हणजे लपविलेलें, आच्छादित, उघड नव्हे तें, अप्रसिद्ध. चौदा गोत्रें व साठ कुळें हीं प्रसिद्ध व उघड. बाकीचीं कुळें षष्टिकुलांतर्गत असून जणूं काय त्यांत लपलेलीं आहेत. ठेंगू, ठेंगणा माणूस म्हणजे ज्याचें शरीर लपलेलें आहे, आखुड, ऱ्हस्व झालेलें आहे तो. ह्या पत्रकांत प्रथम प्रत्येक गोत्रांतील प्रसिद्ध कुळें जीं साठ तीं दिलीं आहेत व खालीं प्रत्येक कुळांतील अप्रसिद्ध ऊर्फ ठेंगीं उपकुळें दिलेलीं आहेत. पत्रक येणेप्रमाणें:—

श्रीगणेशायनमः ॥

अथ चित्तपावनविप्राणां चतुर्दश गोत्राणि
। तत्तद्गोत्रेषु पर्यायशब्दवाच्यानि षष्टिकुलानि
। तत्र कानिचिद्व्यवहारे रूपनामानि जातानि
। तानि सपर्यायं यथाश्रुतं लिख्यते ॥

विष्णुवर्धन

१ कोंडविडे
१ नेने
१ पराजप्ये
१ मेहदळे
—
४

ठेंगेमत्त

१ मंडळिक
१ दरवे
१ ओळकर
—
३

१ देव

═══

नित्युंदनगोत्र

१ वैशंपायन
१ भांडभोके
—
२

ठेंगेमत्त

१ भिडे
१ सहस्त्रबुध्धे
१ पींपळखरे
—
३

═══

भारद्वाजगोत्री

१ आचवल
१ ठेणे ॥ येवशे
१ देव
१ घंघाळे
१ पांपुर्डे
१ रानडये
—
६

ठेंगेमत्त

१ गोळे
१ वैद्य
१ मनोहर
१ वेसास
१ सोवनी
१ जोशि
१ अखवे
१ राहाळकर
१ कांण्ये
—
९

═══

गार्ग्य गोत्री

१ कर्वे
१ गाडगीळ
१ लोंडे
१ माटे
१ दाबके व दामले
—
५

ठेंगेमत्त

१ जोशि
१ थोरांत
१ घाणेकर
१ सांगले
१ केळकर
१ गोरे
१ पंडे
१ गुनाहे
१ गुनार
१ वैद्य
१ येरे[illegible]

१ भट
१ भागवत
१ म्हैसकर
१४
१ केतकर
१ कळणेकर

कपीगोत्री
१ निमये
१ सांबेटे
१ जाईल
१ मायिदेव । माइल
४
ठेगेमत्त
१ काळे
१ विद्वांस
१ करंदीकर निमये
१ साने
१ मराठे
१ रराटे
१ भागवत
१ चक्रदेव
१ दलाल
९

जामदग्नी
१ पेंडसे
१ कुंटे
२

ठगेमत्त
१ भागवत

वत्सगोत्री
१ माळशे
१
ठेगेमत्त
१ उकडवे
१ गांगल
१ जोशि
१ काळे
५*

बाभ्रव्यगोत्री
१ बाळ
१ बेहेरे
२
ठेगेमत नाहि

कौशिक गोत्री
१ गद्रे
१ बाम
१ भावे
१ वाड
१ आपटे
५
ठेगेमत्त
१ बर्वे
१ बापये

---

* चाराचा आंकडा हवा किंवा एक नांव लिहावयाचें राहिलें आहे असें तरी समजलें पाहिजे.

केवणेकर

१ भावये
१ आगाशे
१ गोडबोले
१ पाळ्ये
१ देवधर
१ सट्टकर
१ कानिटकर
१ देवल
१ वर्तक
१ खरे
१ शेडे
१ कोलटकर
१ फाटक
१ खुळे
१ लावणेकर
१ पारकर

१८

आत्रिगोत्री
१ आठवले
१ चितळे
१ भाडभोके

३

ठगेमत्त
१ चिपळोणकर
१ मोने
१ चाफेकर
१ चोळकर
१ फडके
१ वाडदेकर
१ जोगळेकर

७

१ आचवल

| चित्तपूर्णविप्राणां चतुर्दश गोत्राणि कुलानि गोत्राणि | | इकाद्दे शौनकोक्तानि पदि कुलानि मूळचीं | व्यापारे नामानि कुलानीप दृश्यानि ठगेमताचीं |
|---|---|---|---|
| १ काश्यपगोत्र | २५ | ५ | २० |
| २ शांडिल्यगोत्र | ४३ | ८ | ३५ |
| ३ वासिष्ट | ३० | ११ | १९ |
| ४ कौंडिण्य | ३ | २ | १ |
| ५ विष्णुवर्धन | ७ | ४ | ३ |
| ६ भारद्वाज | १५ | ६ | ९ |
| ७ नित्युंदन | ५ | २ | ३ |
| ८ गार्ग्य | १९ | ५ | १९ |
| ९ कपिगोत्र | १३ | ४ | ९ |
| १० जामदग्न्य | ३ | २ | १ |

| गोत्राणे | | मूळची | टंगेमताचीं |
| --- | --- | --- | --- |
| ११ वत्स | ५ | १ | ४ |
| १२ बाभ्रव्य | २ | २ | ० |
| १३ कौशीक | २३ | ५ | १८ |
| १४ अत्रिगोत्र | १० | ३ | ७ |
| १४ | २०३ | ६० | १४३ |

२. प्रथम स्थूलमानानें ह्या पत्रकाचा काळ ठरवूं. पत्रकांतील एकशे त्रेचाळीस कुलनामांत पेशवे, फडणीस, रास्ते, हसबनीस, खासगीवाले, वगैरे फारसी आडनांवाचीं जीं कुळें त्यांचीं फारसी नांवें मुळींच नाहींत. एक दलाल हें आडनांव फारसीसारखें दिसतें. कदाचित् तें एखाद्या संस्कृत गोत्रशब्दाचा अपभ्रंश असण्याचा संभव आहे. तात्पर्य, चितपावन लोक देशावर येऊन व नांवारूपास पावून, फारसी आडनांवें मिळविण्याच्या पूर्वी हें पत्रक मूळांत लिहिलें गेलें आहे. हें पत्रक मूळ अस्सल नाहीं; नक्कल आहे. कारण धारु बद्धल धारप, दोणकर बद्धल दाणेकर वगैरे चुकीचे शब्द पत्रकांत आहेत. अस्सलांत अशा चुक्या नसत्या. सबब, असें दिसतें कीं हें पत्रक मूळांत शिवकालीन असावें म्हणजे सरासरीनें तीनशे वर्षांचें जुनें असावें. त्या कालीं रास्ते, पेशवे, फडणीस, हीं चितपावनांचीं आडनांवें निर्माण देखील झालीं नव्हतीं. तेरजेंत पत्रककार स्कंदपुराणाचें नांव घेतो व म्हणतो **स्कांदे शौनकोक्तानि षष्टि कुलानि.** हा उल्लेख स्कंदपुराणांतर्गत सह्याद्रिखंडाला जर असेल व सह्याद्रिखंडांत साठ कुळांचा जर उल्लेख असेल, तर हें पत्रक सह्याद्रिखंडरचनेनंतर म्हणजे शक १५०० नंतर व शक १६०० पूर्वी केव्हां तरी झालें असावें. सह्याद्रिखंडाहून स्कांदपुराणाच्या इतर कोणत्या भागांत जर हीं साठ कुळनामें आलीं असतील तर पत्रकाचा काल शक १५०० च्या पूर्वी जाईल. तत्रापि, स्थूलमानानें हें पत्रक तीनशे वर्षांहून जुनें धरण्यास हरकत नाहीं.

३. तीनशे वर्षांहून जुनाटपण किती, याचा स्थूल अंदाज करतां येण्याला साधन आहे. कित्येक चितपावन शक १५०० च्या सुमारास पिढीजाद देशमुख व कुळकर्णी असलेले कोंकणांत आढळतात. जो धंदा किंवा जें वतन पिढीजाद झालें त्याच्यावरून कित्येक कुलनामें निर्माण होतात. आपल्या प्रस्तुतच्या पत्रकांत देशमुख, कुळकर्णी, हीं आडनांवें नाहींत. त्यावरून म्हणतां येतें कीं मूळांत हें पत्रक शक १५०० च्या पूर्वीचें असावें.

४. ह्या पत्रकांत वर्तक व जोशी हीं धंदावाचक आडनांवें ऊर्फ कुळनांवें आलेलीं आहेत. वर्तकपण व जोशीपण चितपावनांनीं शक १२०० पासून शक

१४०० पर्यंतच्या काळांत केव्हां तरी लिहिलेलें असावें. अर्थात् पत्रक शक १२०० पासून शक १४०० पर्यंतच्या काळांतील आहे, यांत संशय नाहीं.

५. पत्रकाच्या जुनाटपणासंबंधानें दुसरें हि एक गमक आहे. शक १७७४ रत्नागिरी येथें जोशी व अमरापुरकर यांनीं छापिलेल्या गोत्रमालिकेंत शांडिल्यगोत्राखालीं सात कुळें व वासिष्ठगोत्राखालीं बारा कुळें दिलेलीं आहेत. प्रस्तुत पत्रकांत पहिल्या गोत्राखालीं आठ कुळें व दुसऱ्या गोत्राखालीं अकरा कुळें दिलीं आहेत. पहिल्यांत थये हें कुळ जास्त दिलें आहे व दुसऱ्यांत साठये हें कुळ गाळिलें आहे. याचा अर्थ असा कीं स्कांदपुराणांतर्गत कुळवर्णनपर जे श्लोक सध्यां आपणाला उपलब्ध आहेत ते श्लोक आहेत त्याहून निराळ्या पाठानें उपलब्ध होते किंवा ते श्लोक स्कांदपुराणांत मुळींच बिलकुल नव्हते, अशा वेळीं हें पत्रक मूळांत लिहिलें गेलें असावें. म्हणजे मूळ पत्रकाचा काळ शक १२०० च्या हि पूर्वी जातो.

६. पत्रकाच्या अत्यंत पुराणत्वाविषयीं पत्रकांत दुसरें एक नामी गमक आहे. कपिगोत्राखालीं ह्या पत्रकांत निमये म्हणून एक कुळनाम आलेलें आहे. जोशी व अमरापुरकर यांच्या गोत्रमालिकेंत ह्या कुळनामाला लिमये असें म्हटलें आहे. मूळ कुळनाम निमये हेंच उघड शुद्ध व पुराणें आहे. गोत्रप्रवरांत निमयः ( निमि शब्दाचें अनेकवचन ) असा ह्या गोत्राचा पाठ आहे. निमि नामक ऋषिपासून जें कुळ प्रसिद्धीस आलें त्यांतील माणसांना निमयः म्हणू लागले. उच्चारांत न चा ल मराठींत होतो. निमयः चें लिमया, लिमये झालें. हें लिमये गोत्रनाम कित्येक वर्षे मला समाधानकारक पद्धतीनें व्युत्पादितां येण्यास फार अडचण पडे. हें पत्रक हातीं आल्याबरोबर निश्चित व्युत्पत्ति हातीं आली. अर्थात्, लिमयांच्या कुळनामाचा निमये असा उच्चार ज्या पुरातनकाळीं होत असत त्या काळीं हें पत्रक रचिलें गेलें असावें. म्हणजे शक १२०० पासून शक १४०० पर्यंतचा काल या पत्रकाला [illegible] होत नाहीं.

७. ह्या निमये—लिमये शब्दाखेरीज दुसरीं दोन कुळनामें [illegible] पाहतात. तीं हीं:—ठेंडे व लेले. ह्या दोन्ही आडनांवांत मूळांत एक [illegible] हें आडनांव पुराणतर असावें.

८. प्रस्तुत पत्रक [illegible] आहे. [illegible] चौदा गोत्रें, साठ जुनीं कुळें [illegible] नवीन कुळें दिलीं आहेत. जोशी व अमरापुरकर यांच्या गोत्रमालिकेंत चौदा गोत्रें, साठ जुनीं कुळें [illegible] सांगितलेलीं आहेत. [illegible] आहे, [illegible] नाहीं. [illegible]

प्रांतांत लग्नादि शरीरसंबंध उभा राहावयाचा म्हणजे गोत्रप्रवर पहाण्यास ह्या जोश्यांच्या कडे लोकांना धांव घ्यावी लागते. अर्थात् चितपावनांचीं गोत्रें, जुनीं आणि नवीं कुळें आणि प्रवर होतां होईल तों परिपूर्ण यादी करून नित्याच्या पहाण्याकरितां या जोश्यांना ठेवणें अपरिहार्य असतें. प्रस्तुत कालीं जोशी व अमरापूरकर यांची किंवा यांच्या सारखी मोठी यादी च हे जोशी लोक वापरतात. प्रस्तुत पत्रक तें ज्या कालीं रचलें त्या कालीं कालानुरूप परिपूर्ण च होतें. अपूर्ण असतें तर निरुपयोगी होतें. हें पत्रक मोठ्या कसोशीनें रचिलें आहे, ह्याला एक प्रमाण असें आहे कीं, मूळ जुन्या पोथीवरून ठेंगेमताचीं कुळनामें उतरल्यावर, नक्कलकार आपल्या कालीं किंवा आपल्या कालापूर्वीं आणि मूळपोथीच्या कालानंतर जीं जीं नवीन कुलनामें प्रचारांत आलीं तीं तीं साक्षेपानें नमूद करतो. हीं नवीन नांवें नमूद करण्याचें प्रयोजन इतकें च कीं लग्नार्थी लोक सल्लामसलत घेण्यास आले असतां, यादींतील नांवांत कमतरपणा दिसून आपल्या धंद्याला कमीपणा येऊं नये. एवंच ही यादी ज्या कालीं रचिली त्या कालचीं बहुतेक सर्व कुलनामें तींत नमूद झालीं असावीं, असें खात्रीनें म्हणतां येण्यास बहुत बळकट पुरावा आहे. ही यादी ज्या वेळेस झाली त्या वेळीं चितपावनांत फक्त १४३ नूतन कुळें होतीं. शक १७७७ तील जोशी व अमरापूरकर यांच्या यादींत ह्या यादींतल्याहून १०१ नूतन कुलनामें जास्त आहेत. इतकीं कुलनामें अस्तित्वांत येण्यास बराच काल लोटला पाहिजे. पेशवाईच्या अंतापासून म्हणजे शक १७३९ पासून शक १८३६ पर्यंतच्या सुमारें शंभर वर्षांत चितपावनांत फार तर दहा पांच नूतन कुलनामें निर्माण झालीं असतील. मुजूमदार, पुणेकर, शास्त्री, खेडकर, नगरकर, वगैरे फार झालीं तर नूतन अशीं दहा पांच नवीन कुलनामें मला आठवतात. तेव्हां शंभर कुलनामें नवीन उद्भवण्यास पांच सहाशें वर्षांचा अवधि जावा असा अंदाज आहे.

९ आतां हीं कुलनामें कसकसीं उत्पन्न झालीं तें पाहूं. प्रथम चौदा गोत्रें ऊर्फ कुलनामें होतीं. प्रथम म्हणजे कोणत्या कालीं त्याचा निर्देश दुसऱ्या एका लेखांत* लवकरच मी करणार आहे. त्या चौदा कुलनामांचीं साठ कुलनामें जीं झालीं तीं कांहीं एकदम एकाएकीं झालेलीं नाहींत. कालान्तरानें व परिस्थित्यनुकूलताप्रतिकूलतेनें च झालीं असलीं पाहिजेत. तीं साठ कुलें नक्की कोणतीं तें हि आस्ते आस्ते च ठरत गेलें असलें पाहिजे. प्रस्तुतच्या यादींत च अशीं दोन कुळें साठ कुळांतील आपल्याला आढळलीं आहेत कीं ज्यांचा

---

* भा. इ. सं. मंडळ द्वितीय-संमेलन. वृत्त लेखांक ३ पृष्ठ २६

मेळ जोशी व अमरापूरकर यांच्या गोत्रमालिकेंतील कुळांशीं बसत नाहीं. ह्या साठ कुळांचीं पुढें प्रस्तुत यादींत आपल्याला आणीक १४४ नूतन कुळें झालेलीं दिसतात, तीं कशीं झालीं त्याचा खुलासा दिग्दर्शनानें करतों. जोशी व अमरापूरकर याणीं एकंदर नऊ प्रकारचे गाडगीळ सांगितले आहेत:— १ खुद्द गाडगीळ, २ सुतार, ३ म्हसकर, ४ केतकर, ५ वैद्य, ६ मरुगकर, ७ अधिटकर, ८ खंजणे व ९ टोळे. ह्यांपैकीं पहिले पांच म्हणजे १ गाडगीळ, २ सुतार, ३ म्हसकर, ४ केतकर व ५ वैद्य, हे तेवढे प्रस्तुत यादींत दिले आहेत, शेवटले चार दिले नाहींत. म्हणजे शेवटलीं चार कुलनामें प्रस्तुत यादी रचिली गेल्यानंतर प्रचारांत आलीं. प्रथम गार्ग्य कुळापासून १ कर्वे, २ गाडगीळ, ३ लोंढे, ४ माटे, ५ दाबके अशीं पांच कुळें निर्माण झालीं. ह्या पांच कुळांतील गाडगीळ या कुळापासून प्रस्तुत यादीच्या काळापर्यंत १ सुतार, २ म्हसकर, ३ केतकर व ४ वैद्य हीं चार आणीक कुळें उत्पन्न झालीं. पैकीं म्हसकर व केतकर हीं ग्रामनामांवरून उत्पन्न झालेलीं आहेत, वैद्य हें धंद्यावरून झालेलें आहे, आणि सुतार हें ऋषिनामावरून झालेलें आहे. अर्थात्, सुतार गाडगीळ हें कुळ खुद्द गाडगीळानंतर प्रथम उत्पन्न झालेलें धरणें भाग आहे. कारण ऋषिनामें सुमारें १००० शकानंतर प्रचारांतून गेलीं असावीं असा तर्क आहे. वैद्य हें आडनांव धंद्यावरून पडलेलें आहे, तेव्हां तें प्रथम गाडगीळांत केव्हां उत्पन्न झालें तें अस्सल जुनाट दस्तऐवजाच्या पुराव्या खेरीज नक्की सांगतां येणें दुरापास्त आहे. हजार वर्षांपूर्वी हि वैद्यकीचा धंदा कोणी नामांकित पुरुष करून आपल्या पौत्रादींना तें नांव वतन करून देईल किंवा आज हि देईल. केवळ आडनांवावरून येथें कालनिर्णय शक्य नाहीं. केतकर गाडगीळ व म्हसकर गाडगीळ या कुळनामांचा हि कालनिर्णय शक्य नाहीं. केत किंवा केतकी गांवीं अगर म्हस गांवीं कोणी कर्ता गाडगीळ जाऊन, तेथें रुजून, आपल्या पौत्रादींना ग्रामोत्पन्न कुलनाम केव्हां देता झाला, हें ठरविणें अस्सल जुनाट दस्तऐवजा खेरीज दुर्घट आहे. चितपावनांच्या इतर अनेक कुळांना हा च कायदा लावून, त्यांच्या विस्ताराचा परामर्श घेतां येण्यासारखा आहे.

१० चितपावनांच्या ह्या साठ कुळांत व पुढील हि कुळांत प्रजावृद्धीसंबंधानें किंवा कुलवृद्धीसंबंधानें कांहीं वांशिक लकबा दृष्टीस पडतात. कांहीं कुळांपासून फार उपकुळें निर्माण झालेलीं आहेत व कांहीं पासून फार थोडीं कुळें निघालीं आहेत. कुलविस्तार व स्वतंत्रकुलस्थापना होण्यास एक च कारण पुरें पडत नाहीं. (१) कुलविस्तार होण्यास प्रथम प्रखर प्रजोत्पादनशक्ति पाहिजे. (२) झालेल्या प्रजेंत दीर्घायु होण्याइतकी जीवशक्ति हवी. (३) हीं दोन्हीं असून शिवाय अस्मानी व सुलतानी परिस्थितीचें आनुकूल्य संपादण्याची त्या प्रजेंत

ताकद असावी लागते. स्वतंत्रकुलस्थापनेस हि अशीं च अनेक कारणें उपकारक होतात. ( १ ) प्रजाविस्तार फार नसतां हि त्यां प्रजेंत जर सामान्यतः तुटक स्वभाव असेल तर स्वतंत्रकुलस्थापना होऊं शकेल. ( २ ) प्रचंड कर्तृत्व, मग तें आर्थिक असो, यौद्धिक असो किंवा बौद्धिक असो, तें हि स्वतंत्रकुलस्थापक होतें. प्रायः ज्यां कुलांतील माणसांचा प्रकृतिधर्म अत्यंत मायाळू असतो तीं सहसा स्वल्प कारणानें किंवा अपरिहार्य कारणानें हि मूळ कुळाला सोडून तुटक कुळ निर्माण करीत नाहींत. अशीं नाना कारणें कुलविस्ताराला व स्वतंत्रकुलस्थापनेला उपकारक व अपकारक असतात. पैकीं कोणती कारणें कोणत्या कुळाच्या चरित्रांत दृश्यमान झालीं आहेत, हें त्या कुळाची लोकसंख्या, कर्तृत्व, उपकुलसंख्या वगैरेवरून निश्चिणावयाचें असतें. चित्पावनांचीं जीं चौदा गोत्रें आहेत त्यांची कुलविस्ताराच्या बाबतींत नंबरवारी येणेंप्रमाणें लागते.

| गोत्रनाम | प्रस्तुत पत्रक | जोशी व अमरापूरकर |
|---|---|---|
| १ शांडिल्य | ४३ | ५६ |
| २ वासिष्ठ | ३० | ४९ |
| ३ काश्यप | २५ | ४० |
| ४ कौशिक | २३ | ३४ |
| ५ गार्ग्य | १९ | २७ |
| ६ भारद्वाज | १५ | १९ |
| ७ कपी | १३ | २२ |
| ८ अत्रि | १० | ११ |
| ९ विष्णुवर्धन | ७ | ९ |
| १० वत्स | ५ | १८ |
| ११ नित्युंदन | ५ | ७ |
| १२ कौंडिण्य | ३ | ४ |
| १३ जामदग्न्य | ३ | ४ |
| १४ बाभ्रव्य | २ | ४ |
| १४ | १४३ | २४४ |

सर्वांत पहिल्या चार गोत्रांची स्वतंत्रकुलविस्तारस्थापना फार झालेली आहे व शेवटच्या चार गोत्रांची अति कमी झालेली दिसते. स्वतंत्रकुलविस्तार फार झाला म्हणजे त्याबरोबर प्रजाविस्तार हि फार झाला असेल, असें

नियमानें सांगतां येणार नाहीं. प्रजावृद्धि थोडी असून तुटक स्वभावामुळें एका गोत्राचीं अनेक कुलें झालीं असण्याचा संभव आहे. किंवा प्रजा थोडी असून तीतून प्रखर कर्तृत्वाचे पुरुष बरे च निघाल्यामुळें हि स्वतंत्र कुलें जास्त उत्पन्न होण्याचा संभव आहे. तसेंच, अत्यंत मायाळू स्वभावामुळें किंवा कर्तृत्व-हीनतेमुळें किंवा अल्पप्रजात्वामुळें एखाद्या गोत्रापासून थोडीं कुलें निर्माण होण्याचा संभव आहे. तत्रापि, चित्पावनांच्या प्रत्येक गोत्रांतील व कुळांतील लोकांची संख्या कळल्याविना या प्रश्नाचा निश्चित उलगडा होण्यासारखा नाहीं. समाज-शास्त्राच्या दृष्टीनें व सुजननशास्त्राच्या दृष्टीनें ह्या प्रश्नाचा उलगडा होणें तर अत्यंत इष्ट आहे. आपली प्रगति होत आहे किंवा प्रतिगति होत आहे, ह्या बाबीचा छडा लावणें आपल्या वंशाच्या भावी व वर्धमान हिताला मोठें हितावह आहे. सबब, हिंदुस्थानांतील व हिंदुस्थाना बाहेरील अखिल चित्पावनांची एकदा स्वतंत्र मोज-दाद करणें जरूर झालें आहे. प्रजावृद्धीच्या कामीं, तिचें निकोप संवर्धन कर-ण्याच्या कामीं, तींत कर्तृत्ववान् व राष्ट्रहितवर्धक व्यक्ति कशा उत्पन्न होतील तें ठरविण्याच्या कामीं, वगैरे वगैरे अनेक बाबींच्या विचाराला ही मोजदाद उपयोगी पडणार आहे. हिच्या व्यतिरिक्त सर्व बोलणें सैल, अस्पष्ट, अंधुक, व अनिश्चित होतें. एतदर्थ खालील तक्ता एकोनयेक चित्पावनाला पोहोंचून तो सायन्त भरून मागाविण्याचा प्रयत्न करण्याचा माझा विचार आहे.

## तक्ता

१ गांव रहातें २ तालुका ३ जिल्हा ४ इलाखा किंवा प्रांत ५ सबंद नांव ६ आडनांव नवें व जुनें ७ गोत्र ८ प्रवर ९ कोणत्या गोत्रांशीं जुळत नाहीं तीं १० शाखा ११ कुटुंबांतील माणसांची संख्या १२ स्त्रियांची संख्या १३ विधवा १४ सुवासिनी १५ कोंवार १६ पुरुषसंख्या १७ विवाहित १८ अविवाहित १९ कुलदैवतें-देवदेवी २० धंदा सर्व पुरुषांचा व स्त्रियांचा २१ पोट जात-देशस्थ, चितपावन, कऱ्हाडे इ. इ. २२ वर्ण शरीराचा २३ उंची २४ वजन २५ छातीची रुंदी २६ रोग २७ धर्म-शैव, वैष्णव, स्मार्त इ. इ. २८ उत्पन्न वार्षिक २९ मूळ गांव, तालुका, जिल्हा.

११ पत्रकांत शेवटीं तेरजेच्या मथळ्यावर चित्तपावन या शब्दाला चित्तपूर्ण असा पर्यायशब्द दिलेला आहे. चित्तपावन हा जर प्रांत असेल तर त्या प्रांताला चित्तपूर्ण हें दुसरें नांव हें पत्रक रचण्याच्या कालीं होतें, असा ह्याचा अर्थ होतो. पूर्णगड हा किल्ला व गांव अडिवरें व पांवस यांच्या मध्ये आहे. म्हणजे पूर्ण हें गडाचें, गांवाचें व खाडीचें नांव आहे. तस्मात्, चित्तपूर्ण ह्या शब्दांतील पूर्ण हा अवयव ग्रामवाचक, गडवाचक किंवा खाडीचा वाचक असतो हें स्पष्ट आहे.

आणि पूर्ण हा शब्द जर स्थलवाचक असेल तर पावन हा शब्द हि स्थलवाचक असला पाहिजे.

१२ ठेंगेमत देऊन, त्याच्या खालीं एखाद दुसरें आणीक कुळनाम या पत्रकांत दिलेलें किंवा जोडलेलें आढळतें; परंतु, त्याचा किंवा त्यांचा समावेश बेरजेंत किंवा तेरजेंत केलेला नाहीं. ह्यावरून उघड ठरतें कीं हे जोड नकलकारानें मागाहून दिलेले आहेत.

वि. का. राजवाडे

---

## २ देवरुखे यांची मूलोत्पत्ति

१ कोंकणांत फुणगुसच्या खाडी भोंवतालील पांचपन्नास गावांतून प्राधान्यानें देवरुख्यांची वस्ती आहे. ह्या पांचपन्नास गांवा भोंवतालील दोन्ही तीरावरच्या गांवांत चित्पावनांची वस्ती आहे. ह्या पांचपन्नास च गांवांत चित्पावनवस्तीच्या मध्यें देवरुख्यांची ही वस्ती कशी आली, ह्या बाबीचा शोध, गेल्या वर्षी कोंकणांत प्रवास करीत असतांना, लावण्याची मी थोडीबहुत खटपट केली. आपण ह्या टापूंत आज शेंकडों वर्षे रहात आलों आहों, ह्या पलीकडे स्वतः देवरुख्यांना, त्या टापूंत च प्राधान्यानें आपण कां रहात आहों, ह्यासंबंधानें तोंडीं विशेष कांहीं एक सांगतां आलें नाहीं. आणि हा कांहीं त्यांचा म्हणजे देवरुख्यांचा एकट्यांचा च दोष नाहीं. हा दोष हिंदुस्थानांतील सर्व जातींत व पोटजातींत आढळून येतो. ऐतिहासिक स्मरण, इतिहासाभावामुळें, सर्वत्र च शिथिल आहे. जगाच्या इतर हि भागांत ही च स्थिति आढळून येते. तोंडी माहिती वरुन जेव्हां कांहीं विशेष निष्पत्ति होईना, तेव्हां लेखी माहिती जुळविण्याचा मीं प्रयत्न केला. परंतु, तो प्रयत्न कोंकणांत सिद्धीस न जातां, घांटावर सिद्धीस गेला. इस्लामपूरचे रा. मुंडले यांणीं शिराळे येथील एका देशपांड्याचे कांहीं कागद माझ्या स्वाधीन मी कोंकणांतून आल्यावर सहजगत्या केले, त्यांत एक पंक्तिपावनत्वा बद्धल कागद सांपडला. देवरुखे हे पंक्तिपावन ब्राह्मण आहेत किंवा नाहींत ह्या बाबी संबंधाचा ऊहापोह ज्यांत केला आहे असा हा कागद आहे. हें निर्णयपत्र शक १६७६ त उत्तर कोंकणांतील प्रसिद्ध क्षेत्र जें सुपारें तेथील ब्राह्मणांनीं दिलें आहे. शक १६७६ म्हणजे शाहूराजाचा व पहिल्या बाजीरावाचा काळ येतो. निर्णयपत्रांत देवरुखे हे पंक्तिपावन ब्राह्मण नाहींत असा निकाल दिला आहे, त्याच्याशीं आपणाला सध्यां कांहीं कर्तव्य नाहीं. सध्यां मंबईतील बहुतेक खाणावळी देवरुख्यांनीं चालविलेल्या आहेत व त्यांत सर्व तऱ्हेचे ब्राह्मण जेवतात. तेव्हां मुंबई टापूंत

तरी पंक्तिपावनत्वाचा प्रश्न राहिलेला नाहीं. कोकणांत हि बहुतेक लोक ह्या जातीशीं अन्नव्यवहार करतात. तेव्हां पंक्तिपावनत्वाच्या प्रश्नांत आतां कांहीं एक म्हणण्या सारखें तथ्य राहिलें नाहीं; व त्यासंबंधानें आपल्याला येथ कर्तव्य हि नाहीं. निर्णयपत्रांतील मजकुराच्या साहाय्यानें ऐतिहासिक बाबी काय काय निष्पन्न होतात तेवढें आपणास पहावयाचें आहे.

२ ज्यांना आपण सध्यां देवरुखे म्हणतो व जे स्वतःला हि देवरुखे म्हणवितात त्यांना ह्या निर्णयपत्रांत देवराष्ट्रीय ह्मटलें आहे. निर्णयपत्रांत वाक्य असें आहेः—" इत्यनेन वचनेनापि देवराष्ट्रीयाणां पंक्तिदूषणं निर्णीत मिति दिक् ". देवरुखे हें हि रूप निर्णयपत्रांत आलें आहे. " आणिखि जवळ शेणवि किरवंत देवरुखे इत्यादिक्र वेदोक्तकर्माधिकारी अनेक ज्ञाति आहेत. " म्हणजे ह्या दोन वाक्यांचा इत्यर्थ असा कीं आधुनिक मराठींत ज्यांना देवरुखे म्हणतात त्यांना पुराणांतून व संस्कृतांत देवराष्ट्रीय म्हणत. अर्थात् देवरुखे म्हणजे देवराष्ट्रीय अशी समजूत शक १६४६ त होती. आणि ही १६४६ तील समजूत, परंपरागत समजूत, इतिहासाला अत्यंत उपकारक आहे. निर्णयपत्रांत देवरुखे ऊर्फ देवराष्ट्रीय ह्यांच्या संबंधानें स्कंदपुराणांतून एक वाक्य उद्धृत केलें आहे त्यांत हे देवराष्ट्रीय कोठून आले तें सांगितलें आहे. तें वाक्य असें:—

अन्येपि देवराष्ट्रीया देवराष्ट्रा दुपागताः ।
अपांक्तेया अयाज्या श्च गिरिकांतारवासिनः ॥

या उद्धारांत देवरुखे ऊर्फ देवराष्ट्रीय ब्राह्मण देवराष्ट्र देशांतून किंवा राष्ट्रांतून आले, म्हणजे कोंकणांत आले, असें सांगितलें आहे. ह्या देवराष्ट्रीयांना पद्मपुराणांतील ज्या वाक्यांत देवराष्ट्र या नांवानें उल्लेखिलेले आहे असें हि एक वाक्य ह्या निर्णयपत्रांत उद्धारिलें आहेः—

अंगवंगकालिंगा श्च साल्वमाथुरमागधाः ।
पाशाशाभिरतोला श्च चौलत्रिगुडसौपराः ॥
यमलावल्यसौराष्ट्रा देवराष्ट्रा श्च पार्थिकाः ।
यदिका निगला श्चैव सर्वे त पंक्तिदूषकाः ॥

देवराष्ट्र देशांत ज्यांचा अधिवास म्हणजे पिढ्यानपिढ्या वस्ति त्या ब्राह्मणांना ह्या उद्धारांत देवराष्ट्राः असें म्हटलें आहे. म्हणजे ह्या ब्राह्मणांचीं तीन नांवें या निर्णयपत्रांत आलीं, ( १ ) देवरुखे, ( २ ) देवराष्ट्रीय, ( ३ ) देवराष्ट्र. शिवाय ही हि एक बाब ज्यास्त कळली कीं हे ब्राह्मण देवराष्ट्र नांवाच्या देशांतून किंवा प्रांतांतून किंवा राष्ट्रांतून कोंकणांत आले. आतां प्रश्न असा उद्भवतो कीं ह्या देवराष्ट्र नांवाचा प्रांत म्हणजे सध्याचा कोणता प्रांत ?

३ शकपूर्व तिसऱ्या शतका पासून तो शकोत्तर तेराव्या शतका पर्यंतच सोळाशे वर्षांतले जे शिलालेख, ताम्रपट व नाणीं आतां पर्यंत प्रसिद्ध झालीं आहेत त्यांत देवराष्ट्र या देशाचा उल्लेख फक्त एकदा व एका स्थलीं आलेला आहे. अलाहाबाद येथील स्तंभावर शक २७२ च्या सुमारास राज्य करणाऱ्या समुद्रगुप्ताच्या लेखांत ह्या देवराष्ट्र देशाचा उल्लेख पहिल्यानदा व शेवटला आलेला आहे. ह्या स्तंभलेखांत दक्षिणापथांतील कोणकोणचे व कोठकोठचे राजे आपण जिंकिले त्याचा निर्देश समुद्रगुप्त करीत आहे व त्यांत देवराष्ट्रदेशाच्या कुबेर राजाचें नांव आहे. ह्या निर्देशा वरून प्रथमदर्शनीं इतकें निश्चित म्हणतां येतें कीं देवराष्ट्र हा देश दक्षिणापथांतील आहे. स्तंभलेखांत दक्षिणापथांतील ज्या इतर आणिक देशांचीं नांवें आलीं आहेत ते देश हेः— ( १ ) कोसल, ( २ ) महाकांतार ( ३ ) केरल ( ४ ) पिष्टपुर, ( ५ ) कोट्टूर किंवा कोट्टार, ( ६ ) एरंडपल्ल ( ७ ) कांची, ( ८ ) आवमुक्त, व ( ९ ) कुस्थलपुर. पैकीं, कोसल म्हणजे रायपूर व संबळपूर यां मधील प्रांत. महाकांतार म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेकडील रानाचा डोंगराळ प्रदेश. पश्चिमसमुद्राच्या कांठचा केरल देश प्रसिद्ध आहे. पिष्टपुर म्हणजे गोदावरी जिल्ह्यांतील सध्यांचें पिठापूर. कोट्टूर हें मद्रास इलाख्यांत आहे. एरंडपल्ल म्हणजे खानदेशांतील एरंडोल. कांची म्हणजे सध्यांचें कांजीवेरम. आवमुक्त म्हणजे सध्यांचा कोणता प्रांत तें सांगतां येत नाहीं. कुस्थलपूर म्हणजे सध्यांचे कोठलूर असावें. नागपूर पासून म्हैसूर पर्यंतचे हे सर्व प्रांत आहेत. म्हैसूरच्या दक्षिणेकडील पांड्यादि राजांच्या प्रदेशांचा ह्या स्तंभलेखांत निर्देश नाहीं. ह्यावरून दिसतें कीं म्हैसूर पर्यंत च समुद्रगुप्तानें आक्रमण केलें होतें. उघड आहे कीं देवराष्ट्र हा प्रदेश किंवा प्रांत नागपूर पासून म्हैसूर पर्यंतच्या टापूंत कोठें तरी होता. रायपूर, जबलपूर, खानदेश, मलबार, गोदावरी, म्हैसूर, वगैरे म्हैसूर पर्यंतचे बहुतेक टापूंचा निर्देश ह्या यादींत आहे. एक सह्याद्रि किनाऱ्याचा टापू तेवढा रहातो. त्या टापूंत देवराष्ट्र हा देश असला पाहिजे. आतां, हा टापू कोणता तें नक्की ठरवावयास उत्तम साधन म्हणजे ह्या सह्याद्रिकिनाऱ्याच्या लगत्यास देवराष्ट्र या संस्कृत शब्दानें किंवा त्याच्या अपभ्रंशानें प्रथित असें सध्यां एखादें स्थल असल्यास पहावयाचें. तसें स्थल कृष्णेच्या कांठीं कऱ्हाडा जवळ आहे हि. कऱ्हाडाच्या दक्षिणेस कुंडल म्हणून एक खेडें व रेल्वेस्टेशन आहे. त्याच्या समोर पूर्वेस देवराष्ट्रें ह्या नावाचें एक लहानसें खेडें किंवा गांव आहे. ह्या गांवाभोंवतीं व आसपास प्राचीन अवशेष व देवालयें फार आहेत. त्या वरून एखादा अगदीं नवशिका हि अनुमान करूं शकतो कीं हें स्थल पूर्वीं केव्हां तरी मोठें वैभवाचें स्थल असावें. एथें कुबेर व समुद्रेश्वर यांचीं देवालयें आहेत.

आणि इतर लहान मोठीं देवालयें तर शेंकडों आहेत. तेव्हां अलाहाबाद येथील स्तंभलेखांत निर्देशिलेला दक्षिणापथांतील देवराष्ट्र नामें जो देश तो सध्यांच्या देवराष्ट्रें या खेड्याच्या भोंवतालील प्रांत असावा, असें बऱ्याच निश्चिततेनें म्हणतां येतें. म्हणजे शक २७२ च्या सुमारास देवराष्ट्रें येथें कुबेर नांवाचा राजा राज्य करीत होता, असें विधान करणें सुलभ होतें. सध्यांचें देवराष्ट्रें देवराष्ट्र या नांवानें त्या काळीं प्रसिद्ध असून, तें ज्या प्रांताची राजधानी होतें त्या प्रांताला हि देवराष्ट्र ही च संज्ञा होती. ह्या देवराष्ट्र प्रांतांत त्या काळीं साताऱ्या पासून कोल्हापूर पर्यंतचा व समुद्रा पासून पंढरपूर पर्यंतचा टापू समाविष्ट होत असावा. ह्या देवराष्ट्र प्रांतांत रहाणारे जे ब्राह्मण व देवराष्ट्र देशच्या कुबेर राजाच्या आश्रयानें रहाणारे जे ब्राह्मण ते देवराष्ट्र किंवा देवराष्ट्रीय किंवा देवरुखे ब्राह्मण होत.

४ शक २७२ त झालेल्या समुद्रगुप्तानें दक्षिणापथांतील देशांचीं व राजांचीं जीं नांवें दिलीं आहेत त्यांत **तगर** व **शिलाहार** हीं दोन नांवें नाहींत. **तगर** हें नगर व कदाचित् देश नागपुर पासून म्हैसूर पर्यंतच्या टापूंत पडतो. समुद्रगुप्ताच्या कालीं म्हणजे शक २७२ च्या सुमारास तगरास जर नांव घेण्यासारखें राज्य असतें तर जिंकिलेल्या राजांच्या व राज्यांच्या यादींत **तगराचा** निर्देश निःसंशय झाला असता. निर्देश नाहीं, ह्यावरून असें अनुमान करणें चुकीचें होणार नाहीं कीं, शक २७२ च्या सुमारास व पूर्वी **तगर** येथील राजांचा अंमल तहकूब होऊन गेला होता. **तगर** ह्या ऐश्वर्यसंपन्न शहराचा निर्देश शक ७२ मध्यें लिहिणाऱ्या टॉलेमीनें प्रामुख्यानें केला आहे. तेव्हां शक ७२ मध्यें **तगरास शिलाहारवंशीय** राजे दिमाखानें राज्य करीत असावे व ते कदाचित् **शातवाहनांचे** अंकित मांडलिक असावेत, असा तर्क करतां येतो. **शातवाहनांचें** राज्य शक १५० च्या सुमारास नष्ट झालें त्या बरोबर च **तगरेश्वरभूपतींचा** हि ऱ्हास झाला असावा असें दिसतें. आणि शक १५० च्या सुमारास तगर येथील राजांची जागा देवराष्ट्र येथील राजांनीं पटकाविली असें हि विधान करणें संभाव्य होतें. शक १५० च्या सुमारा पासून देवराष्ट्र प्रांतांत राज्य करणाऱ्या राजांना शक २७२ त समुद्रगुप्तानें आपले मांडलिक केलें. तदनंतर देवराष्ट्र प्रांतांतील राजे शक ४०० पर्यंत बहुशः कांहीं काल मांडलिक व कांहीं काल स्वतंत्र राहून नंतर चालुक्यांचे मांडलिक झाले असावेत. तगरचे शिलाहार शक ८०० च्या सुमारास पुन्हां उदयास आले.

५ शक २७२ त झालेल्या समुद्रगुप्तानें जिंकिलेल्या कुबेरराजाच्या देवराष्ट्र प्रांताचा व राष्ट्राचा व राज्याचा नक्की थांग लागल्या मुळें एका चावीवर चांगला प्रकाश पडतो. शक १५० च्या सुमारास शातवाहनांचें राज्य नष्ट झाल्या पासून

शक ४०० च्या सुमारास चालुक्यांचें राज्य स्थापित होण्याच्या अवधीपर्यंतचा जो २५० वर्षांचा काल त्यांत जे अनेक लहान सहान संस्थानिक उदयास आले असतील त्या पैकीं एका संस्थानाचा पत्ता आपल्यास लागला. शक १५० पासून शक ४०० पर्यंतचा २५० वर्षांचा जो काल त्याला पुराणेतिहाससंशोधक अविज्ञात काल अशी संज्ञा देत. कां कीं, ह्या २५० वर्षांत दक्षिणापथांत किंवा विशेषतः ज्याला पुढें महाराष्ट्र म्हणूं लागले त्यांत राजकीय उलाढाल काय झाली असावी त्याचा ओझरता हि उल्लेख करता येण्यास कांहीं एक साधन उपलब्ध नव्हतें. देवरुखे ब्राह्मणांची मूळपीठिका शोधून काढण्याच्या निमित्तानें व प्रस्तुत सांपडलेल्या निर्णयपत्राच्या आधारानें ह्या २५० वर्षांत दाक्षिणापथांत जीं संस्थानें उदयास आलीं त्या पैकीं एकाचा पत्ता आपल्यास लागला. त्यावरून समजतें कीं शक १५० पासून शक ४०० पर्यंतच्या अवधींत, तत्पूर्वी शातवाहन ज्या दक्षिणापथांत साम्राज्य करीत होते त्या दक्षिणापथांतील सह्याद्रि किनाऱ्याच्या शेजारी देवराष्ट्र प्रांतांत देवराष्ट्र नांवाच्या राजधानींत एक संस्थान नांदत होतें. ह्या देवराष्ट्र संस्थानांतील शक २७२ च्या सुमारास राज्य करणाऱ्या एका राजाचें नांव कुबेर होतें. परंतु, हा कुबेर कोणत्या वंशांतील राजा असावा तें सांगतां येण्यास साधन नाहीं. देवराष्ट्र ह्या सामाजिक शब्दाचा दुसरा अवयव महाराष्ट्र, गोपराष्ट्र, सुराष्ट्र, इत्यादि शब्दातल्या प्रमाणें राष्ट्र हा आहे. राष्ट्र हा संस्कृत शब्द रट्ट ह्या प्राकृत शब्दाचा मूळ आहे. तेव्हां कुबेर हा कदाचित् रट्ट वंशांपैकीं असावा असें अनुमान करतां येतें.

६ देवराष्ट्र हा प्रांत सह्याद्रिकिनाऱ्या शेजारील कृष्णानदीच्या पूर्वबाजूचा टापू असावा व त्या राज्यांतील जे राजाश्रयी ब्राह्मण त्यांना देवराष्ट्रीय ऊर्फ देवरुखे म्हणत. ह्या दोन बाबी सिद्ध झाल्यावर, देवरुखे ब्राह्मण कोंकणांत कधीं शिरले या बाबींचा पत्ता लावण्याचा मार्ग खुला होतो. देवराष्ट्र येथील राजांचें राज्य चालुक्यांच्या पहिल्या अमदानींत म्हणजे सुमारें शक ४०० च्या सुमारास चालुक्यांच्या अंकित झालें असावें व पुढे थोड्याच कालानें नष्ट हि झालें असावें. हा काल जर शक ४५० धरला तर, त्या कालीं हे देवराष्ट्रीय ब्राह्मण राजाश्रय सुटल्या मुळें संगमेश्वरच्या व फुणगूसच्या आसपास आश्रयाला येऊन कायमचे राहिले असावे. कोंकणांतील ह्या च प्रदेशांत येऊन रहाण्याचें कारण असें दिसतें कीं कोंकणचा हा टापू त्या कालीं देवराष्ट्र येथील राजांच्या अंमलाखालीं होता व चालुक्यांच्या जुलुमापासून दूर होता. त्या कालीं कोंकणांत चित्पावन ब्राह्मण होते च. त्यांच्या मध्यें शक ४५० किंवा ५०० च्या सुमारास देवराष्ट्रीय ब्राह्मण परचक्राच्या भयानें घांटावरून कोंकणांत येऊन गिरिगव्हरांत लपून राहिले. ह्या घाटावरील भिन्नाचाराच्या व भिन्नव्यवहाराच्या ब्राह्मणांपासून यज्ञयाग करणारे

वा. इ. ३

चित्पावन ब्राह्मण अर्थात् च अलिप्त राहिले. शिलाहारांच्या अंमलांत व तो अंमल यादवांनीं मोडल्यावर करहाटक ब्राह्मण हि जसे परचक्राच्या भयानें कोंकणचा आश्रय शक ११०० च्या सुमारास करेत झाले, तसे च शक ४५० च्या सुमारास हे देवराष्ट्रीय ब्राह्मण कोंकणचा आश्रय करते झाले.

७ देवराष्ट्र या संस्कृत शब्दाचा प्राकृत अपभ्रंश देवरट्ठ व्हावा देवरुख होऊं नये. देवरुखे या प्राकृत शब्दाचें संस्कृत रूप देवऋषि व्हावें. संगमेश्वरा जवळ देवरुख नांवाचें गांव आहे. परंतु त्याचें जुनें नांव देवरख असावें असा तर्क आहे. हा तर्क जर खरा असेल तर देवरुखे ह्या शब्दाचें शुद्धरूप देवरखे असलें पाहिजे. देवरखे या प्राकृत शब्दाचें संस्कृत रूप देवराक्षित. देवरख या गांवाचें हि मूळ संस्कृत नांव देवरक्षित असावें. देवरख ब्राह्मण देवरट्ठ किंवा देवराष्ट्र देशांतील होत. किंवा देवराष्ट्र या शब्दाचें शुद्ध रूप देवरक्षित, देवरक्ष असें असावें. देवराक्षित नामक राजाचें नांव पुराणांतून येतें. जसा देवत्रात, देवरात हा शब्द तसाच देवरक्षित हा शब्द. तें कांहीं असो; देवराष्ट्र हें रट्टांचें सध्यां ज्याला मराठा देश म्हणतात त्या पैकीं शक २७२ च्या सुमारास एक संस्थान होतें आणि तेथील ब्राह्मणांना देवराष्ट्र किंवा देवराष्ट्रीय ब्राह्मण म्हणत आणि ह्याच देवराष्ट्र ब्राह्मणांना सध्यां देवरुखे किंवा देवरखे म्हणतात.

८ निर्णयपत्र येणेप्रमाणें:—

श्री

**स्वस्ति श्रीमधुमारमणचरणरुहांतःकरण**
**षट्कर्मपरायण वेदशास्त्रसंपन्न राजपूज्य**
**विद्वद्गृहस्थवृंद शूर्पारकक्षेत्रास्थितेषु**

स्नेहाभिषिक धर्माधिकारि ज्योतिर्विदुपाध्याय प्रमुखविद्वद्वृंद श्रीक्षेत्रस्थित-कृतानेकशो–नतयः क्रमश आशीरायायः शमिहेषासित शिखि तिथ्यंतं वरिवर्त्ति भावत्कमाशास्महे विशेषस्तु तुम्ही पत्र पाठविलें तें पावोन वर्तमान वंदीत जालें तेथें लिहिले होतें की परशुरामक्षेत्रिं माहाराष्ट्र व चित्तपावन व कऱ्हाटक ब्राह्मण आणिखि जवळ शेणवि व किरवंत व देवरुखे इत्यादिक वेदोक्तकर्माधिकारी अनेक जाती आहेत त्या मध्यें माहाराष्ट्र व चित्तपावन व कऱ्हाटक या तिहिं जाती मध्यें परस्परें अन्नव्यवहार व पंक्तिव्यवहार परंपरागत चालत असे इतर जातिमध्यें कोणाचें घरिं अन्नव्यवहार व पंक्तिव्यवहार नाहिं ऐसें असोन सांप्रतीं देवरुखेयांनि मुद्गलभटां जवळ येउन अर्ज करून सांगितलें जें चित्तपावन व कऱ्हाटक हे पूर्वी आमचें घरिं जेवित होते आणि पंक्तिस हि घेत होतें त्यास आलिकडे दोन शा

वर्षा पूर्वी अनंतभट्ट चितळे चित्तपावन ब्राह्मण हे मउजे वसणिचें तळें उपशीत होते तेथें नियत केला अइसा जे ह्या मार्गें जाइल त्याणें एक पाटी माती खणोन तळ्या बाहेर टाकावी अशियासि भानपुरु तेरा देवरुखा हा त्या मार्गे जात होता त्यास अनंतभटिं आज्ञा केलि जे एक पाटी माती टाकुन जाणें त्यास त्याणें अवज्ञा केली म्हणउन त्यास शाप दिल्हा त्या पासुन उभयता आमचे घरिं जेवित नाहिं तरि स्वामींनि आमचा अंगिकार करून आमचें घरिं जेवित असें केले पाहिजें म्हणउन विज्ञप्ति केलि त्या नं(त)र राजेश्री मुद्गलभट्ट पडितराय यांहीं परशुरामक्षेत्रिंचि व्यवहारविचारणा विदित नसतां त्याचे वचन प्रमाण मानु(न) अजम शिदियांशी अनेक पत्रें लिहिलिं एसे जे हे देवरुखे उत्तम ब्राह्मण अनंव्यवहारा योग्य आहेत आम्ही देशस्थ तों यांचे घरिं जेवित च आहों तरि तुम्ही हि ते प्रातिंचे सारे ब्राह्मण मीळउन यांचे घरिं जेववणें त्यास तेणें प्रमाणें दाभोळ व राजापुर यां दो सूभ्याचें ब्राह्मण सारे मेळउन परस्परें मनास आणिता अन्नादिसिद्धि जेवित नाहिं असें चितात आणून अजम शिद्दि ब्राह्मणास बोलिलें ऐसें जे आम्ही तुम्हास जेववावें तरि हाकिमिच्या बळें जेविलें असें दिसोन येतें पंडितराव तों लिहितात जे ब्राह्मण उत्तम अन्नव्यवहारा योग्य आहेत आशियांशि हा मुकद्दमा हिंदु महजबा वरून फसल होईल तर तुम्ही सारें ब्राह्मण सातेरेयास माहाराज राजेश्री छत्रपति पाशि जाउन कजा चुकउन येणें नाहिं तरी देशातुन जागाजागांचिं संमतपत्रें घेउन येणें ब्राह्मण जे येथें कजिया चुकेल म्हणऊन बोलिले त्याज वरून आम्ही चितपावन व कऱ्हाटक सारे सातारेयास हुजूर येऊन राजेश्रीस विज्ञप्ति केलिं ऐशी जे वेदमूर्ति मुद्गलभट्ट पंडितराय यांहिं पत्रें पाठऊन आमास श्रमी केले ( धर्मास श्रमी केलें ) तनिमित्य येथें आलों तरि माहाराजाहिं पडित मीळऊन धमशा(स्त्र)न्याय करून आमचा कजिया चुकविला पाहिजे म्हणुन विनंति केलि त्याज वरि माहाराज बोलिले जे मुद्गलभटिं पत्रें लिहिलिं ती बाष्कळ रद्द असेत म्हणउन त्याच्या हातुन मुद्रांकित कागद लिहुन देविले आणि बोलिलें जे आपण ब्राह्मणजातीचा न्याय मनास आणित नाहि तुम्ही आपल्ये क्षेत्रीं जाऊन पूर्वापर व्यवहार चालत असेल त्या प्रमाणें चालवणें असें बोलोन आम्हास निरोप दिल्हा या नंतर आम्ही आपल्या क्षेत्रास जाणार तरि संमत्तपत्रें घेऊन गेलें पाहिजे या स्तव तुम्हास पत्र लिहिले असे तरि स्वामिनी शास्त्रावलोकन करून धर्मशास्त्रिंचीं वचनें लिहुन संमत्तपत्र पाठवणें म्हणऊन तुम्ही लिहिलें तरि पत्रार्थ मनास आणिता भानपुरु तेरा यास अनंतभटिं येक पाटिं मृत्तिके करिता शाप दिला त्याज वरून साऱ्या देवरुख्यांचे घरि चित्तपावन व कऱ्हाटक जेवीत नाहिं म्हणउन देवरुखे मुद्गलभट्टां जवळि बोलिलें तर हे गोष्टि असंबद्ध दिसोन येत्ये निमित्य जे ब्रह्मशापे करून वंशक्षय होतो तर भानपुरुचा वंशक्षय तों जालाच त्याचि संतति तों नाहिं

म्हणऊन परस्परें लोक सांगतात यांस जेवित नाहीत व पंक्तिस घेत नाहीत तब-
हिष्कार म्हणतात शाप व बहिष्कार यांचा अर्थ येक होत नाहि हे तों सर्वांस विदित असे यद्यपि मातृकुल बहिष्कार केला असतां तथापि जाचा अपराध ज्यास व होऊन जातांत संबंध काय असे याज वरून दिसोन येतें जें हे पूर्वापार न जाणता आहेत असें असोन लटका व्यवहार करीतात हें सर्वांस कळतच असेल तथापि तुम्हां लिहिलें जे शास्त्रांचीं वचनें लिहोन संमतपत्र पाठवून देणे त्याज वरून अनेक पुस्तकें पाहोन धर्मशास्त्रांचीं वचनें लिहिलिं असत त्याज वरून संशय दूर होईल यास्तव या पुढें निषेधवचनें लिहिणें लागलिं येणें प्रमाणें धर्मशास्त्रें निषिद्धब्राह्मणवचनानि ॥

॥ मत्स्यपुराणें ॥

त्रिशंकुम्बर्बरानौड्रां स्तथा द्रविडकेरलान् ॥
कार्नाटका स्तथाभीरान्कलिंगांश्च विवर्जयेत् ॥[1]

॥ सौरपुराणें ॥

अंगवंगकलिंगांश्च सौराष्ट्रान् गुर्जरांस्तथा ॥
आवंत्यान्मागधांश्चैव ब्राह्मणांश्च विवर्जयेत् ॥[2]

॥ पद्मपुराणें ॥

अंगवंगकलिंगांश्च साल्वमाथुरमागधाः ॥
पाशाशाभिरनोलाश्च चोलत्रिगुडसोपराः ॥
यवलावंत्यसौराष्ट्र देवराष्ट्राश्च पाथिकाः ॥
यद्विका निगलाश्चैव सर्वे ते पंक्तिदूषकाः ॥

॥ यमः ॥

राज्ञः कामास्तथोन्मत्ताः सर्वे ते पंक्तिदूषकाः ॥

---

१ पाठांतर– कृतघ्नान्नास्तिकांस्तद्वन्म्लेंच्छदेशनिवासिनः ।
त्रिशंकुर्बर्बरद्रावर्वातद्रविडकोंकणान् १६।१७, अध्याय १६.

२. सौराष्ट्रं गुर्जरं तथा । ( पाठांतर अ. १७. ५८ वा श्लोक )
आभीरं कौंकणं चैव द्राविडं दक्षिणापथं ।
अंध्रं च मागधं चैव देशानेतांश्च वर्जयेत् ॥ ५९ । अध्याय १७
वर्णाश्रमाचारविधिकथन.

[ * °र्बरौडाधान् टक्कद्राविडकोंकणाः; र्बरा ऐंध्रचीनद्र°. वर्जयेत् लिंगिन सर्वान् श्राद्धकाले विशेषतः ॥ १७ ॥ –पाठांतरें. ]

॥ मनुः ॥

साद्भिश्च निंदिताचाराः स्वकर्मपरिवर्जकाः ॥
चतुराश्रमबाह्याश्च सर्वे ते पंक्तिदूषकाः ॥
यस्तेनः पतितः क्लीबो ये च नास्तिकवृत्तयः ॥
तान्हव्यकव्ययोर्विप्राननर्हान्मनुरब्रवीत् ॥

॥ स्कांदपुराणें ॥

अन्येपि देवराष्ट्रीया देवराष्ट्रादुपागताः ॥
अपांक्तेया अयाज्याश्च गिरिकांतारवासिनः ॥

इति धर्मशास्त्रपुराणवचनैः देवराष्ट्राणां पंक्तिदूषणमस्त्येव अन्नंव्यवहारस्य खपुष्पवदत्यंताभाव एवं ॥ देशाचारतोपि ए(त)द्वेश्मनि अन्नव्यवहारो न श्रूयते ॥ तत्र देशाचारग्रामाचारकुलाचारस्यापि प्रामाण्यमस्ति ॥

॥ स्मृत्यर्थसारे ॥

सामयाचारिकाधर्मा ज्ञातिदेशकुलोद्भवाः
ग्रामाचाराः परिग्राह्या ये च विध्यविरोचनः ॥

इत्यनेन वचनेनापि देवराष्ट्रियांणां पंक्तिदूषणं निर्णितमिति दिक् ॥ पत्रलेखनार्थप्रमाणमवगम्य सर्वसंमतानि लिख्यंते शके १६४६ क्रोधी संवत्सरे संमतोयमर्थः सर्वेषां ॥—

शेवटल्या श्लोकीच्या नंतर मूळ अस्सल निर्णयपत्रावर सुपारे येथील ब्रह्मवृंदाच्या सह्या होत्या हें उघड आहे. त्या ह्या नकलेंत उतरून घेतलेल्या नाहींत. असल्या ह्या जातिनिर्णयपत्रांच्या नकला गांवगन्नाचे लोक प्रमाणाचा दाखला म्हणून करून घेत असत. त्या पैकीं च शिराळे येथील कोण्या गृहस्थाकडून तेथील देशपांड्यांनीं ही नक्कल त्या कालीं उपयोगार्थ व व्यवहारार्थ करून घेतलेली आहे.

वि. का. राजवाडे

# ३ तिरगुळ



देवरुख्यां संबंधीच्या निर्णयपत्रांत पद्मपुराणांतील खालील अनुष्टुभार्ध लक्ष्यांत ठेवण्या सारखा आहे.

चोलत्रिगुडसौपराः ॥

पंक्तिदूषक ब्राह्मण कोणते ह्याचें परिसंख्यान चाललें आहे त्यांत चौल, त्रिगुड व सौपर हे ब्राह्मण पंक्तिदूषक म्हणून नामनिर्देश करून सांगितले आहेत. चौलप्रांतांत म्हणजे अष्टागरांत रहाणारे जे ब्राह्मण ते चौल ब्राह्मण. शूर्पारकक्षेत्रांत ऊर्फ सोपार-क्षेत्रांत ऊर्फ सोपारे प्रांतांत राहाणारे जे ब्राह्मण ते सोपर किंवा सौपार ब्राह्मण. येणें प्रमाणें चौल व सुपारें या प्रांतांत रहाणाऱ्या ब्राह्मणांचा पत्ता लागला. बाकी राहिले तिसरे त्रिगुड ब्राह्मण. हे हि पंक्तिदूषकांत गणले आहेत. हे त्रिगुड ब्राह्मण कोठील व कोणत्या देशांतले ? चौल व सोपार ब्राह्मणांच्या संगतींतच त्रिगुड ब्राह्मणांचा निर्देश केलेला आहे. तेव्हां प्रथमदर्शनीं असा तर्क होतो कीं चौल व सौपार ब्राह्मण ज्या प्रमाणें चौल व सुपारें या अपरांतांतील प्रांतांतील रहाणारे त्या प्रमाणें च त्रिगुड ब्राह्मण हि अपरांतांतील च एखाद्या जुन्यापुराण्या नांवाच्या प्रांतांतील रहाणारे असावे. आणि हा तर्क कांहीं भ्रामक नाहीं. वास्तविक स्थिति तशीच आहे. दक्षिण गुजराथ व उत्तर कोंकण या प्रांतांत त्रैकूटक नाम धारण करणारे राजे शक १७० पासून शक ४१५ पर्यंत व पुढें बराच काळ राज्य करीत होते. ह्या त्रैकूटक राजांची राजधानी त्रिकूट नामक डोंगरी स्थान होतें. हें त्रिकूठ नगर अपरांतांत म्हणजे उत्तर कोंकणांत होतें. ह्याचा उल्लेख कालिदासानें रघुवंशाच्या चौथ्या सर्गाच्या ५९ व्या श्लोकांत केला आहे.

त्रिकूटमेव तत्रोच्चैर्जयस्तंभं चकार सः ॥

म्हणजे कालिदासाच्या कालीं हें डोंगरी कोंकणी शहर चांगलें चालतें बोलतें होतें. रघूनें त्रिकूट जिंकलें असा अभिप्राय कालिदासाचा आहे. अर्थात्, कालिदास या त्रैकूटक राजांचा समकालीन होता, म्हणजे शक १७० पासून शक ४१५ पर्यंतच्या काळांत केव्हां तरी होता. सध्यां आपल्याला कालिदासाच्या कालाशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं. तिरगुळ ब्राह्मण कोण व कोठले होते तें पहावयाचें आहे. अपरान्तांत म्हणजे उत्तर कोंकणांत सह्याद्रींत हें त्रिकूट नगर होतें. येथील राजांना व प्रजांना त्रैकूटक त्या कालीं म्हणत. त्रैकूटक याचा प्राकृत अपभ्रंश वृद्धि जाऊन त्रिगुडअ

असा होणें शक्य आहे. त्रिगुडअ ह्याचें स्वल्पोच्चारित रूप त्रिगुड. हा त्रिगुड शब्द पद्मपुराणकारानें योजिला आहे व तो प्राकृत आहे. अर्थात्, पद्मपुराण किंवा पद्मपुराणांतील त्रिगुडशब्द ज्या अध्यायांत किंवा श्लोकांत आला आहे. तेवढा अध्याय किंवा श्लोक त्रिगुड हा प्राकृत शब्द बनल्यावर लिहिला गेला, हें उघड आहे. ह्या त्रिगुड शब्दाचा मराठी अपभ्रंश तिर्गुळ. तात्पर्य तिर्गुळ हे ब्राह्मण आहेत व ते त्रिकूट ऊर्फ त्रिगुड या उत्तर कोंकणांतील शक १७० पासून शक ४१५ पर्यंतच्या गजबजणाऱ्या नगरांतील व कदाचित् प्रांतांतील रहाणारे ब्राह्मण होते. जुन्नर व त्या खालील तळकोंकण यांत तिर्गुळांची वस्ती अद्याप हि आहे. त्रिकूट येथील राजे अभीर होते व त्रैकूटक ऊर्फ त्रिगुड ब्राह्मण दुष्टाचारवान् होते, सबब पद्मपुराणकाराच्या मतें पंक्तिदूषक होते.

वि. का. राजवाडे.

## ४ शिवाजीच्या कारकीर्दीतील कांहीं मित्या

कैलासवासी गोपाळराव हरि देशमुख यांच्या टिपणांत खालील मित्या होत्या. त्या त्यांनीं कोठल्या तरी जुनाट टिपणावरून उतरून घेतल्या आहेत हें उघड आहे. पुणें येथील देशपांड्यांच्या दप्तरांत शिवचारित्रांतील कांहीं मित्या म॰ इ॰ सा॰ खंड १७ यांत छापिल्या आहेत त्या पहाव्या. त्या वरून दिसतें कीं शिवाजी हयात असतां अनेक लोक त्याच्या अद्भुत चारित्रांतील मित्या सालवार व महिनेवार व तिथवार टिपून ठेवीत होते. अशाच एखाद्या टिपणावरून गोपाळराव हरि देशमुखांनीं खालील मित्या उतरून घेतलेल्या दिसतात. मित्या येणे प्रमाणें:—

१५७० सर्वधारी संवत्सरे श्रावण वद्य १ शाहाजी महाराज धरले. ( ही मिति डफूनें दिली नाहीं. ) Aug. 1648

१५७७ मन्मथ संवत्सरे पौष वद्य १४ जावली घेतली ( ही मिती डफूनें दिली नाहीं ). Jan. 1656. Duff says 1655

१५७९ हेमलंबी संवत्सरे चैत्र वद्य १० बेदर घेतलें. ज्येष्ठ शुा १२ संभाजी पुत्र जाले.

१५८१ विकारी संवत्सरे आश्विन शुा ७ अफजलखान मारला. पौषमासीं रुस्तुमजमान मोडिला. माघमासीं विज्यापूरची स्वारी झाली.

१५८२ शार्वरी संवत्सरे चैत्र शुा ८ वासोटा घेतला.

१५८५ शुभकृत् संवत्सरे चैत्र शुा ८ शास्तेखान मारिला. मार्गशीर्षमासीं सुरतेस आले. माघ शुा ५ शाहाजी राजे वारले.

१५८७ विश्वावसु संवत्सरे जयसिंग व दुलेलखान भेटले. फाल्गुनमासीं दिल्लीस गेले.

१५८९ सौम्य नाम संवछरे माघ वद्य ९ सिंहगड घेतला. आषाढ शुा २ रोहिडा घेतला. पुढें हिंदोळा व कर्नाळा व माहुली घेतली.

१५९५ प्रमादी संवत्सरे चैत्र वद्य १० परळी घेतली.श्रावण वा ९ सातारा घेतला. आश्विन शुा १३ पांडवगड घेतला.

१५९६ आनंद संवत्सरे ज्येष्ट शुा १३ मंदवारीं, ज्येष्ट शुा ४ मुंज होऊन, राज्याभिषेक जाला.

१५९६ आनंद संवत्सरीं ज्येष्ठ वा ९ जिजाऊ साहेब मेली. माघ वा ५ संभाजीची मुंज झाली.

१६०१ बाहादूरबेंडा घेतला. वैशाखमासीं भूपाळगड घेतला. फाल्गुनांत राजारामाचें लगिन; गुजराची मुलगी केली.

१६०२ रौद्र संवत्सरे चैत्र शुा १५ शिवाजी राजे मेले. वैशाख वा १३ रायगडीं धराधर जाली. आषाढ शुा ११ पुतळाबाई सती गेली. मार्गशीर्ष शुा १० शाहूराजे जन्मले. माघ शुा ७ राज्याभिषेक जाला.

ह्यां पैकीं एक दोन खेरीज बहुतेक मित्या डफनें आपल्या बखरींत दिल्या नाहींत.

वि. का. राजवाडे.

## ५ सवाई माधवराव व रामचंद्रशास्त्री

१ नाना फडणिसांनीं सवाई माधवराव पेशवे यांजकरितां लिहिवलेली मराठ्यांची बखर म० इ० सा० खंड चौथा यांत छापिली आहे. भारतांतील कथाभाग बाल पेशव्यांस कळावा म्हणून नानांनीं रामचंद्रशास्त्रयांकरवीं तयार करविलेली बकासुराची बखर आज मंडळापुढें मांडीत आहे. दुःखाची गोष्ट कीं यूरोपियन इतिहासाच्या बखरी सवाई माधवरावाला नानांनीं ऐकविल्या नाहींत. प्रस्तुत बखरीचा प्रारंभ असाः—

श्रीगजानन प्रसन्न

श्रीमंत् सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री माधवरावसाहेब यासीः–

शुभचिंतक रामचंद्रशास्त्री याचे अनेक आशीर्वाद. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेष. आपले आश्रये करून राज्यसह आपल्यास अभीष्टचिंतनें कालक्रमणा करीत असतां माहाराजाचे बाल्यरूपांत वृत्ति पाहातां गोब्राह्मणप्रतिपालन आणि शूरत्वाची कथा श्रवण जालें असतां अत्यंत आनंदात्मक असावें. हा चमत्कार दृष्टिगोचर पाहातां अंतःकरणसंतोष जाहाला. आणि मनांत असें आलें कीं सरकारांनीं बाल्यरूपांत आपणासी कांहीं संभाषण करावें. या हेतूनें कथाभाग योजिता जाला. आणि माहाराजास भाषण करिताहेत. श्रीमंत ! भारतांतील आदिपर्वी पंडुपुत्र पांडव यांहीं ब्राह्मणांचें प्रतिपालण कसें केलें आणि राक्षसांचा नाश कसा केला तें कथानक यथामतीकरून सांगतों. श्रवण करावें.

बखरीचा शेवट असाः–

हें माधवरावसाहेब पंतप्रधान याणीं सर्व कथानक श्रवण करून परमानंदें समाधानातें पावले. आणि रामचंद्रशास्त्रीबावास विनंति करितात कीं, महाराज, मजवर मेहरबानगी करून आपली स्नानसंध्या नित्यकर्म कायक्रमणा जाल्यानंतर कांहीं काल येऊन अवकाश जाल्यास अश्या राज्याच्या नीतीकरून आम्हाला बोध जाला असता फार अंतःकरणास चांगलें होईल. असें वाक्य यजमानाचें शास्त्रीबावानीं श्रवण करून संतोषातें पावले आणि भाषण करताहेत कीं, महाराज तुम्हास कल्याण असे, मी आपले आज्ञेप्रमाणें एण्यास फारच अत्यंत संतोषी आहे. असें भाषण करून आपले स्वस्थानास जाते जाले.

ही बखर विनायकराव चिंतामण देशमुख याची असे मिा वैशाख शुद्ध ३ भौमवासरे शके १७८२ रौद्र-नाम संवत्सरे.

२ सवाई माधवरावा करितां स्वतंत्र कल्पित कथा हि नाना फडणिसांनीं तयार करविल्या होत्या, त्यांच्या दोन प्रती मजजवळ आहेत. व त्यापैकीं कांहीं कथा मी दहा पंधरा वर्षां पूर्वीं छापविल्या होत्या.

वि. का. राजवाडे

# ६ राजावलीचें एक जुनें बाड शक १६११ तलें

१ सदहु बाड गोपाळराव हरि देशमुखांचा दप्तरांत मिळालें. बंद रास चार आहेत. ह्या बाडांत एक विशेष हा आहे कीं देवगिरीच्या यादवांचा उल्लेख यांत केला आहे. शक १६११ त बाड लिहिणाऱ्याला त्याच्या पूर्वील तीन चारशें वर्षापलीकडील इतिहास कोणत्या स्वरूपानें माहीत होता तें या बाडावरून दिसतें. ह्या बाडावरून असें हि अनुमान करतां येतें कीं शक १६११ त तत्पूर्वीच्या तीन चारशे वर्षांच्या इतिहासाचीं टिपणें, बाडें, बखरी, वगैरे साधनें थोडीं फार उपलब्ध असावीं. त्या टिपणांवरून किंवा बखरींवरून साक्षात् उतारा प्रस्तुत बाड लिहिणाऱ्यानें केलेला दिसत नाहीं. टिपणें व बखरी केव्हां तरी व कोठें तरी लहानपणीं वाचलेल्या असाव्या, त्यांच्या अंधुक आठवणी बाड लिहिणारा कालांतरानें, बहुशः म्हातारपणीं, लिहीत आहे.

२ बाडकार यादव राजांना मराठे राजे म्हणतो व त्यांचा प्रारंभ शालीवाहनापासून करून रामदेराव जाधवापर्यंत ५३३ वर्षांचा हिशोब देतो. त्याच्या मतें शालिवाहानापासून रामदेराव जाधवापर्यंत ५३३ वर्षें लोटलीं. हीं वर्षें त्यानें अशीं काढिलीं. शालिवाहन शक व हिजरी सन यांज मध्यें जेव्हां केव्हां ५३३ वर्षांचें अंतर होतें त्या वेळचा उल्लेख कोठल्या तरी जुन्या बाडांत त्याला सांपडला व रामदेरावापर्यंत ५३३ वर्षें लोटलीं असावीं, असा त्याचा तर्क झाला. शालिवाहन शक व हिजरी सन यांच्यांत ५३३ वर्षांचें अंतर शक ८७३ च्या सुमारास होतें. त्या कालीं हिजरी साल ३४० सुमारें होतें. शक ८७३ तील एखाद्या जुन्या टिपणावरून ५३३ वर्षांचा हिशोब आपणास द्यावयाचा आहे असा तर्क बाडकारानें केलेला दिसतो. शालिवाहनापासून ५३३ वर्षांचा हिशोब बाडकार एणेंप्रमाणें देतोः—

| | | |
|---|---|---|
| शालिवाहन | ६० | वर्षें |
| सिंधु | ६० | ,, |
| मुंज | ३५ | ,, |
| भोज | ८५ | ,, |
| कुन्हा भिलम भोजाचा भाचा | ८० | ,, |
| कान्हराज | ७५ | ,, |

| | | |
|---|---|---|
| माहादे राज | ८० | " |
| रामदेराव जाधव | १० | " |
| | ५३३ | |

बाडकार वरील आंकड्यांची ५३३ बेरीज देतो ती चुकली आहे. खरी बेरीज ५६५ येते. मग बाडकारानें ५३३ बेरीज कशी केली तें त्याचें त्यास माहीत. शालिवाहन शक व हिजरी सन यांमधील ५३३ हें अंतर त्याला कसें तरी यावयाचें होतें, इतकें च रामदेराव जाधवाच्या वेळेस ५३३ अंतर नव्हतें व शक १६११ त म्हणजे बाडकाराच्या वेळीं हि ५३३ अंतर नव्हतें. शक ८७३ त ५३३ अंतर होतें.

३ ह्या ५३३ वर्षांत शालिवाहनापासून रामदेरावापर्यंत जे राजे बाडकारानें दिले आहेत, ते सर्व इतिहासप्रसिद्ध आहेत. इतकें च कीं शालिवाहनाचा व मुंज-भोजांचा कांहीं एक संबंध नाहीं. तसेंच, मुंजभोजांचा व भिल्लमादि यादवांचा हि विशेषसा संबंध नाहीं. बाडकार म्हणतो कीं कुन्हा भिलम हा भोजाचा भाचा होता. असेल कदाचित. मुंज-भोज हे नर्मदे पलीकडील प्रख्यात राजे होते. सबब त्यांचा उल्लेख बाडकारानें केला आहे. भिलम, कान्हराज, महादेव व रामदे हीं चार नांवें देवगिरीच्या यादवांचीं आहेत. तीं पितापुत्रांचीं नाहींत. स्मृतींत जीं राहिलीं तीं बाडकारानें दिलीं आहेत. लक्ष्यांत इतकें च घ्यावयाचें कीं शालिवाहन, मुंज, भोज, भिलम, कान्ह, महादेव व रामदेराव, यांचीं नांवें बाडकाराच्या स्मृतींत राहिलीं. या दृष्टीनें पहातां, हें बाड अति महत्वाचें आहे. मुसुलमानां पूर्वी यादव-वंशी भिलम, कान्ह, महादेव व रामदेराव हे राजे महाराष्ट्रांत झाले व ते मराठे होते, हें बाडकाराला माहीत होतें, एवढें म्हणण्यास आपल्याला आधार झाला.

खडकीस तळें बांधून तोगलख चौदा वर्षे भांडत होता व नंतर देवगिरीचें तक्त त्याच्या हातीं लागलें असें बाडकार लिहितो तें लक्ष्यांत ठेवण्या-सारखें आहे.

पहिल्या इदलशाहाच्या कारकीर्दीचे शक बाडकारानें दिले आहेत त्यावरून दिसतें कीं मुसुलमान पातशाहांच्या कारकीर्दींच्या हकीकती लिहून ठेवण्याची चाल महाराष्ट्रांत होती. शक बरोबर असोत किंवा चुकलेले असोत. ही कांहीं मोठी जमेस धरण्याची बाब नाहीं. पातशाहांचीं नांवें खरीं खोटीं तपासिलीं पाहिजेत.

त्याचे राज्ये गेले जाधव
रामदेराव देवगिरीस राज्ये
केले इा सुभकृत संवछर
ता। आंगीरा संवछर ९०

५३३

ए। मराठे राजे ५६ सुलतान तोगलख मिलोन

३४

पैकीं सुलतान तोगलख वरुसे ३४
बाकी मराठे साल ४९९

सदहूं मराठे राजे रामदेराव जाधव देवगिरीस करीत असतां त्या वरी सुलतान तोगलख व बामणी पातशाह दिलीहून चाल करून दौलताबाजेस वेढा घातला मुकाम खडकी तेथे राहून तले बांधिले चौदा वर्षे भांडत होता मग देवगिरी दौलताबाज घेतली मराठे देवगिरी दौलताबाज तेथे मुसुलमान पातशाही पिढीया एकूण वरुसे २५८

| | वरुसे | महिने |
|---|---|---|
| १ सुलतान तोगलख बामणी पातशा | ३४ | १ |
| २ पेरोजा शाऊ | १६ | ६ |
| ३ दाउद शाऊ | १६ | ६ |
| ४ राज सिधु शा | २१ | १ |
| ५ दाउदशा आज्याचे नाव ठेविले | ३७ | १० |
| ६ खादेशराव | ३२ | १० |
| ७ महमदशाव | २४ | ६ |
| ८ गबासींधुशाव | २२ | १ |
| ९ महमदशाव आज्याचे नाव ठेविले | २४ | ६ |
| १० पेरोजाशाव वडिलाचे नाव ठेविले | २७ | ७ |
| | २५३ | ६० |

दर १२ प्रा। ए।
वरुसें ५

सदर्हू पिढिया देवगिरी दोलताबाजेस पातशाही केलीयां वरी पेरोजाबाजसं पादशा गेला पेरोजाशा याचा लेक खानखाना नाव

पेरोजाबाजेस पादशा देवगिरीहून आले तेथे राहिले पिढिया १४ एकून वरुसे————————— ३२०८

| | वरुसे | महिने | दिवस |
|---|---|---|---|
| १ खानखानाशा | २५ | १० | ५ |
| २ महमदशाव | २२ | ९ | १ |
| ३ आलादीशा | २३ | ६ | ४ |
| ४ हुकुमशाव | २३ | ६ | ८ |
| ५ चिमणशाव | २० | ६ | ६ |
| ६ निजामशाव | २१ | १ | १६ |
| ७ महमदशाव | ३० | ११ | १० |
| ८ वलीशाव | २५ | ५ | १२ |
| ९ मूर्तुजाशाव | २० | १० | ८ |
| १० इभरामशाव | ३० | ६ | १५ |
| ११ हुकूमशाव | १५ | ५ | १५ |
| १२ दाउदशाव | १६ | ३ | १४ |
| १३ करीमशाव | २२ | १० | २ |
| १४ वलीशाव | २० | ८ | २ |
| | ३१२ | ९६ | ११८ |

सदर्हू पिढिया पातशाही केली

त्या वरी पेरोजाबाजेची पातशाही उठली बेदरास पातशाही आली पिढिया १३ एकून वरुसे २८२

| | वरुसे | माहे | रोज |
|---|---|---|---|
| १ महमद शाव | २९ | ११ | २ |
| २ दाउद शाव | २२ | ९ | ४ |
| ३ हसन शाव | १४ | १० | ४ |
| ४ महमद शाव | २४ | ९ | ६ |
| ५ शामशद शाव | २२ | १० | ८ |
| ६ पेरोजा शाव | २३ | ६ | १० |
| ७ बुऱ्हान शाव | २८ | ९ | १५ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | अली शाव | २० | १० | २२ |
| ९ | चिमण शाव | २१ | ८ | १६ |
| १० | दाउद शाव | १८ | १० | २४ |
| ११ | सुलतान बबू | १८ | १० | २४ |
| १२ | हमदा शाव | २४ | ५ | १६ |
| १३ | पेरोजा शाव | ९ | ६ | ० |
| | | २७२ | ११६ | १२० |
| | | १० | ४ | |
| | | २८२ | १२० | एकुण महिने |

सदर्हू पिढिया बेदरी पातशाही जाहाली त्या वरी पेरोजाशाव त्याचे बंदे ४ त्यास मुलुक वाटून दिल्हे पातशाही बेदरीची उठली जागा जागा बंदे ठेविले तेथेच पातशाही करू लागले

तक्त ——— ४ ———

बहिरी निजाम शाव तक्त १
मदर मलिक तक्त वराड बाळापूर १
मुकुदशाव तक्त गोंड कडे तैलंग १
इदलशाव तक्त वर्णावत म्हणजे
विज्यापूर इस्तकाबिल पैवस्तगी
श्रीशके १३६१ वरुसे सिद्धर्थी
नाम संवछर ता। श्रीशके १६०८
वरुसे क्षय नाम संवछर आश्विन
शु। सेष्टी सोमवार ते दिवसी
अवरंगा शा पातशा याने विज्यापूर
घेतले सुलतान सिकंदर तक्तीहून
धरून नेले तक्त दूर जाहाले
एकून मुदती साले २४७
यासी पातशाहा पिढिया ८

१ प्रथम पातशाहीस इसीफशा बैसला
श्रीशके १३६१ वरुसें सिधार्थी नाम

संवछरे ता श्रीशके १३९० वरुसे
सर्वधारी नाम संवछरे एकूण वरुसे ३०

सदर्हू पातशाही मध्ये पा खवास
मुकांसा लि(हि)ले बितपशिल

वि. का. राजवाडे

---

## ७ ब्रह्मानंदकृत किंवा तुकाकृत भर्तृहरिशतक टीका

१ ही अपूर्ण पोथी रा. रा. का. वा. देव कन्हाडकर यांच्या संग्रहास होती. पहिलीं ५ पानें व ८९ पुढील सर्व पानें नाहींत. प्रत्येक शतकाच्या शेवटीं ग्रंथकारानें आपला उल्लेख केला आहे तो असाः—

भतृहरि–महायोगी–कृत–नीतिशतोत्तरा ।
ब्रह्मानंदें समश्लोकी केली टीका तुका म्हणे ॥ १ ॥

॥ इति श्रीभतृहरियोगेश्वरविरचितायां सुभाषितरत्नावल्यां नीतिशतकं नाम प्रथमशतकं ॥ १ ॥

भतृहरि–महायोगी–कृतीं शृंगारशंभरी ।
ब्रह्मानंदे समश्लोकी केली टीका तुका म्हणे ॥ १ ॥

ह्या समाप्तींत भतृहरीच्या तिन्ही शतकांस मिळून तुका किंवा ब्रह्मानंद किंवा तुका ब्रह्मानंद सुभाषितरत्नावली म्हणतो. समाप्तिश्लोकाच्या द्वितीयपादाचा अर्थ, (१)तुका म्हणतो कीं ब्रह्मानंदानें ही टीका केली, किंवा(२)तुका म्हणतो, मीं ब्रह्मानंदभरित होत्साता ही टीका केली, असा दोन प्रकारचा होतो. त्यावरून ग्रंथकाराचें नांव तुका होतें किंवा ब्राह्मनंद होतें असा संशय पडतो. हा तुका कोण? असा हि प्रश्न उद्भवतो. तुका विप्र हा कवि रहिमतपुराजवळ रहात होता व हें काव्य कन्हाडास सापडलें, या दोन बाबीं वरून असें विधान करण्याकडे प्रवृत्ति होते कीं हा तुका दुसरा तिसरा कोणी नसून खुद्द तुका विप्र च होय. तें कांहीं हि असो, कवीनें भाषान्तर चांगलेच केलें आहे. भाषान्तर श्लोकबद्ध आहे व कित्येक ठिकाणीं वामनाच्या भाषान्तराहून सरस आहे. कित्येक श्लोक सांत्ययमक आहेत. कित्येक निरन्त्ययमक आहेत. व कित्येकांत पहिला व तिसरा आणि दुसरा व चौथा असे सांत्ययमक आहेत. कवि सवाई माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दीच्या शेवटीं झाला असावा असा भाषेवरून अदमास होतो.

२ तुका ब्रह्मानन्दाच्या या भाषान्तरांत एक विशेष आहे. भर्तृहरीच्या नीतिशतकाच्या ज्या प्रती वरून त्यानें भाषान्तर केलें त्या प्रतींत नीतिशतकाचे दहा दशक केलेले असावे. कदाचित् तुका ब्रह्मानन्दानें हि हे दशक पाडले असण्याचा किंचित् संभव आहे. परंतु, तत्पूर्वीच हे दशक पडलेले असावे. नीतिशतकाच्या दाही दशकांचीं नावें येणेप्रमाणें:—

पहिलें दशक—अज्ञपद्धति
दुसरें दशक—विद्वत्पद्धति
तिसरें दशक—मानवशौर्यपद्धति
चोथें दशक—अर्थपद्धति
पांचवें दशक—दुर्जनपद्धति
साहावें दशक—सज्जनपद्धति
सातवें दशक—सज्जनपरोपकारपद्धति
आठवें दशक—आश्चर्यशीलपद्धति
नववें दशक— } ह्या दोहोंचें नांव
दहावें दशक— } दिलें नाहीं.

वि. का. राजवाडे

# ८ वेंका मुंगी कृत सत्याधिराज प्रशस्ति

१ हें लहानसें बत्तीस श्लोकांचें काव्य पुणें येथील अष्टपुत्र्यांच्या ग्रंथसंग्रहांत बॅरिस्टर पुणतांबेकर यांच्या द्वारा सांपडलें. जमाखर्चाचे दोन बंद, पांच चार जमाखर्चाच्या ओळी लिहिलेलें व बाकी कोरे असे होते, त्यांवर हें काव्य लिहिलेलें आहे. जमाखर्चाच्या मथळ्यावर, सुहुरसन ११२१ छ ११ कार्तिकमास, अशी मिती आहे. सुहुरसन ११२१ म्हणजे शक १६४२. कार्तिकाला मोहरम आहे. म्हणजे जमाखर्च शक १६४२ कार्तिक शुद्ध ११ चा आहे. अर्थात् कवि तदनंतरचा आहे.

२ सत्याधिराज हा एक माध्वमती यति होता व तो वेलुरास मद्रास इलाख्यांत रहात असे. तो वेंका मुंगी याचा गुरु, वेंगा मुंगी हा मराठी भाषा बोलणारा माध्व. वेंका मुंगी मराठींत संस्कृतातल्याप्रमाणें दोन शब्दांचा स्वरसंधि करतो. येलाण = येला + आण (णि) (श्लोक ९ प्रथम षोडशी); तुलार्पिला = तुला +

अर्पिला (श्लोक १० प्रथम षोडशी); तेत्र = ते + अत्र (श्लोक १ द्वितीय षोडशी); सत्याधिराजार्पुन = सत्याधिराजा + अर्पुन (श्लोक १३, द्वितिय षोडशी). श्लोकरचनेच्या सोकर्याला हा प्रकार फार उपकारक आहे. वेंका मुंगी यानें आपलें नांव व आडनांव (१) श्लोक १६ प्रथम षोडशी, (२) श्लोक १२ द्वितीय षोडशी व श्लोक १५ द्वितीय षोडशी, या तीन स्थलीं उल्लेखिलें आहे. वेंका मुंगी व सत्याधिराज नक्की केव्हां झाले त्याचा शोध केला पाहिजे—

श्री

श्रीमत्सत्याधिराजें भुमिवरि फिरतां सर्व साम्राज्य केलें
सोनें रूपें सुवरां सुघन मिलवुनां सत्य तुलनाति दिल्हें। १ ।
आलां राहोनि येथें सिरनाद्रिचें तिरीं वेल्हुरी अग्रहारीं
रत्नें वस्त्रं विचित्रें अति विमल धरी शंखचक्रें शरीरीं ॥ २॥
पदक शोभतसे हृदया वरी जरीतुरा झलके यतिच्या शिरीं ।
विमल श्री तुलसी धरि कंधरीं तकटि वस्त्र कटी वरि बंदरी ॥ ३ ॥
श्रीनिवासचरणीं रुलती चिरें वीजतुल्य दिसती बहुताजरें ।
भूवराहयति हा अतिआदरें अर्पितो गुरुवरासि महादरें ॥ ४ ॥
बरें हृत्प्रदेशीं मणीं तुलसीचे हिरे माणिकें मौक्तिकें कांचनांचें ।
गला हार जे शोभती चंपकाचे तसे आणिखी लोंबती मोगऱ्याचे ॥ ५ ॥
वर्णीत मीं विबुध हो जरि लेशमात्रें ऐकोनि सर्व पुलकांतिक होति गात्रें ।
वृंदावनीं झलकती राजतातपत्रें देखोनि विस्मय बहू चमकेति नेत्रें ॥ ६ ॥
चंद्रसूर्य उगवति गिरी वरी शोभताति तइसे समयां वरी ।
दीप देखुनि पलोन बहु दूरी अंधकार लपतो गिरिगव्हरीं ॥ ७ ॥
डोले बरे शोभति राजताचे टीले बहू झल्कति कांचनाचे ।
नैवेद्य होती चणयां मुगांचे खजूर-केलें-गुल-खोबऱ्याचे ॥ ८ ॥
लाडू अपार बरवे गुलचारुल्यांचे हीरे जसे झलकती रवे नाबतेचे ।
घालूनि साखर बरी तिलवे तिलाचे येलाण कापुर मिरें मग खस्खसेचे ॥९॥
नारेल ऊस उतत्या बहु खर्मुजें हो दालिंब शेव फणसांत मृदू गरे हो ।
आंबे रसाल इरसाल हि जांवले हों ऐसा फलार गुरुराज तुलार्पिला हो ॥१०॥
भूवराह पुजितो गुरुवारीं संभ्रमें करुनियां कुजवारीं ।
वाजती शाहानया अणि भेरी गुज्गुजी पणह टाल न फेरी ॥ ११ ॥
नृफणि वाजवितो पृथु तुंबुरा गगनि लाजवितो बहु तुंबरा ।
घागऱ्या झणकती तुझिया करा म्हणति भूसुर ते बहु तुं बरा ॥ १२ ॥
नेले चंद्रजोती बहू फूलबाज्या बरा होतसे बंदुखांचा अवाजा ।
चला रे तुम्हीं लोक हो तें बगा जा, पहा जा, पुजा पाहुनीं पापमूलासिं भांजा ॥१३॥

भूवराह करि उत्सव रानीं आम्रवृक्ष लवती मोहरानीं ।
कोकिला मधुर बोलति वाणी ऐकुनी उठतसे निजकानीं ॥ १४ ॥
दूसरी मृदु तसी फणिवाणीं टालशब्द गगनांत खणाणी ।
राम राम म्हण गातस वीणा पापराशि पलताति झणाणा ॥ १५ ॥
मुंगी असोन वदतों बहु चापलें हो सत्याधिराज +++ म्हण आपुला हो ।
अ ++++++++ मनकामना रे तुं शीघ्र कीं अप ++ नगरासि जा रे ॥१६॥
तूं स्वल्प देशी तरि तेत्र फार गुरूपदेशें करि अंगीकार ।
त्वन्मोदकाचा महिमा अपार मी काय जाणे मतिमूढ फार ॥ १ ॥
पायां पडोनीं बहु वीनवावें आंजूलि जोडूनि उभे रहावें ।
सत्याधिराजें जल स्वीकरावें अर्पू म्हणोनि मज उद्धरावें ॥ २ ॥
आलें मिरें भोंकर चिंच आंबे शेंघा मुले आर्द्र हलेदि निंबे ।
चाकोत घोल अलु सूरण माट मेथी भेंड्या चुका सुरस कुंजिर शाकजाती ॥३॥
कोशिंबिरी वाढिलि बालकांची दुसरी तसी सुंदर आंबियाची ।
तिस्री कसी पीवालि दोडक्यांची चौथी पवित्र चि आवन्याची ॥ ४ ॥
कारली पडवली अण शेंगा देवडांगर बरें ऋषिशेंगा ।
दोडके कुहिरिया ++ लकें दीधली यतिवराहचालकें ॥ ५ ॥
परिमलित असे हो अन्न तें तांदलाचें वरण सुरस शोभें पीवले तें मुगाचें ।
पुडि तिखटि मिऱ्यांची मीठ कोथिंबिरीचें कढण धरुनि केलें सार तें पूरणाचें ॥६॥
दही शेंदुनी गाइचें ताक केलें मिरें मीठ घालूनियां तापवीले ।
चण्याचें बरें पीठ घालूनि केली कढी तीशि कोथिंबिरी मेलवीली ॥ ७ ॥
मालत्या सखली + बोटवे सेवया गव्हलिये मग देठवें ।
सोजि + ली खिरीस बरे नवे दूध घालुनि सिजे हलू ++ ॥ ८ ॥
दूधांत खिरी बहु आलुनीया येला मिरें कापुर घालुनीया ।
गव्यें बहू साखर वाढुनीया सीता +++++ अर्पुनीया ॥ ९ ॥
मांडे पुऱ्या गुल्वरि ++++++++ पापड दीर्घपानी ।
खाजा करंजा ++++++++++++++ रुचि घेतलीया ॥ १० ।
++++++++++++ रिया बरि केली
खबुंजाची नीवली तदुपरि दुसरी आंबयाची अकाली ।
अणिक तिसरी आहे ++++++++++ ली
सित चिति दूध येला कापुरें मेलवीली ॥ ११ ॥
दुधाची दह्याची बरी साय आहे दहीं दूध ते ही बहू वाढिले हीं ।
अति परमरुचीने स्वामिंनीं स्वाद घ्यावा
पिपिलिक-उपनाना व्यंकु तो उद्धरावा ॥ १२ ॥

शाला बन्या उंच नव्या विशाला काश्मीरदेशीं बहुमोल त्यांला ।
सत्याधिराजांपुन पादुकांला कृतार्थ मानी मग आपल्याला ॥ १३ ॥
आज्यें करूनि भिजवून +++++ वाती उजळूनियां धरितसे मग दोहि हाती ।
पाहा ति फार ज्योती देखोनियां सूर्य लपोनि जाती ॥ १४ ॥
+++++ सिंपुनि शुद्ध पाणी वेंका बरें वाउनि शीघ्र आणी ।
+++++++++ ताल वाणी ठोकीत हा भार बहू झणाणी ॥ १५ ॥
+++++++ पत्र पाणी सारोनि मौनी बसतील पानीं ।
++++++++++++++++ प्रसादें नसे काहि याण ॥ १६ ॥

वि. का राजवाडे

---

## ९ रामकविकृत प्रदोषव्रतमाहात्म्य

### शक १५६७

१ एकनाथानंतर मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, वामनप्रभृति थोर थोर संतकवि झाले. त्या च सुमारास प्रस्तुत टिप्पणविषयक कवि होऊन गेला. रामकवीची गणना संतांत केलेली कोठें आढळत नाहीं. तेव्हां केवळ कवि ह्या एका च नात्यानें जे दोन चार ग्रंथकार शंभर वर्षांपाठीमागें महाराष्ट्रांत उदयास आले त्या मध्यें ह्या रामकवीची गणना होते. ह्याचें प्रदोषव्रतमाहात्म्य हें एक च काव्य सध्यां सांपडलें आहे. कऱ्हाड येथील रा. रा. काशीनाथ वासुदेव देव यांच्या संग्रहास हें काव्य होतें. इतरत्र महाराष्ट्रांत ह्या कवीचीं काव्यें ज्याअर्थी गेल्या पंचवीस तीस वर्षांत मला सांपडलीं नाहींत, त्याअर्थी हा कवि इतर प्रांतांत फारसा माहीत नसानासा दिसतो. तसें च हा कवि कऱ्हाडास किंवा कऱ्हाडच्या आसपास कोठें तरी कृष्णातीरीं रहात असावा असें हि अनुमान कऱ्हाडास याचा ग्रंथ सांपडला ह्या बाबीवरून सकृद्दर्शनीं, करण्याकडे प्रवृत्ति होतें.

२ प्रदोषव्रतमाहात्म्य या नांवावरून प्रथमदर्शनीं असा समज होण्याचा निश्चय आहे कीं हें प्रकरण पौराणिक कथाभागाचें एखादें ओवीबद्ध सामान्य भारूड असावें, परंतु, तसा प्रकार नाहीं. हें प्रकरण मराठींत जीं अनेक उत्तम काव्यें आहेत त्यांत मोडण्यासारखें आहे व भारतेतिहाससंशोधकमंडळास मी अशी शिफारस करण्याची परवानगी घेतों कीं हें काव्य मंडळानें प्रसिद्ध केल्यास एका उत्तम काव्याचा जीर्णोद्धार केल्याचें श्रेय त्यास मिळेल.

३ रामकवीच्या ह्या काव्यांतून उत्कृष्ट उत्कृष्ट वेचे देण्याचें हें स्थळ नव्हें. पण एवढें सांगितल्यावांचून रहावत नाहीं कीं सृष्टिवर्णनें व व्यवहारवर्णनें ह्या

काव्यांत फारच कुशलतेनें केलीं आहेत. नवरसांचें साधन हि कवीस आहे. रामकवि आपल्या पूर्वीच्या खालील कवीश्वरांचा उल्लेख करतो:—

आतां आधि नमन । आधी कविवरां करीन ।
तयाचेनि प्रसादें करुन । करीन ग्रंथ ॥ ६५ ॥
तरि अष्टादश पुराणें । आणि भारतइतिहास जेणें ।
केले तया व्यासा कारणें । नमन माझें ॥ ६६ ॥
शतकोटि रामायण । भविष्य केलें निर्माण ।
तया वाल्मिकी लागुन । नमस्कारु माझा ॥ ६७ ॥
आणिकि विविधा स्मृती । नाना ऋषेश्वर बोलति ।
तया नमन पुडतपुडति । साष्टांगें माझें ॥ ६८ ॥
भाष्य–प्रक्रियादि–व्याकरणें । शब्दवित्पत्ति कारणें ।
केलिं तया नमनें । शेषादिकां ॥ ६९ ॥
आणिकि साहि दर्शनें । नानाविध व्याकरणें ।
केलिं तयातें नमनें । वारंवार ॥ ७० ॥
विविध विधानें उत्तमें । कळावया वस्तुपदार्थनामें ।
केलिं तया अतिप्रेमें । नमितसें ॥ ७१ ॥
भारवी दंडि कालिदास । भावभूति धनंजय श्रीहर्ष ।
जयदेव शार्ङ्गधर गणेश । आदि करुनि ॥ ७३ ॥
तयां नमन सद्भावें । करुनि मागितलें स्वभावें ।
कवित्वरचनि मज द्यावें । बुद्धिवैभव ॥ ७४ ॥
मग प्राकृत कविश्वर । निवृत्ति ज्ञानदेव चांगेश्वर ।
चोंभा सावंत वाटेश्वर । नामदेव ॥ ७५ ॥
कृष्णदास मुद्गल । सनतिदास मेराळ ।
अवधुत रसाळ । कविश्रेष्ठ ॥ ७६ ॥
एको जनार्दन विख्यात । माझा पितामह गोपिनाथ ।
आणि नृसिंह तत्सुत । पितृव्य माझा ॥ ७७ ॥
सिद्धानंदपदारविंद । तेथील ज्ञानामृतमकरंद ।
तयाचा भोक्ता षट्पद । बाळकु नामें ॥ ७८ ॥
तो सकळ कविवरां राजा । श्रीगुरु जनक माझा ।
तया नमन सहजा । पुर्वींच केलें ॥ ७९ ॥

ह्या नमनांत चोंभा कवीची गणना रामकवीनें ज्ञानेश्वरादिकां बरोबर केलेली आहे. त्या वरून ज्ञानेश्वरा नंतर लवकर च पन्नास पाऊणशें वर्षांच्या अंतरानें

थोंभा होऊन गेला असावा, असा अंदाज मागें मीं इतरत्र केला होता तो खरा ठरतो.*

४ रामकवि ग्रंथसमाप्ति येणेप्रमाणें करतोः—

आतां सांगेन माझा वंश । जयाचें सर्वत्र प्रसिद्ध यश ।
तो आइका सावकाश । उबग न मनितां ॥ १२७ ॥
सकळा ऋषी माजि पवित्र । जो बोलिजे कपिल स्वतंत्र ।
तयाचे नांवें कापिल गोत्र। प्रसिद्ध जेयां ॥ १२८ ॥
तया कापिलगोत्रा आंत । बैकार वंश विख्यात ।
तेथ नारायणासि सुत । अतिश्रीमंत जन्मला ॥ १२९ ॥
नावं ठेविले गोपिनाथ । भगवंताचा अंशभुत ।
तयाचे वर्णितां गुण समस्त । असाधारण ॥ १३० ॥
तया गोपिनाथाची कांता । रुखमाइ नांवें पतिव्रता ।
तियेचा उदरि विख्याता । चौघ पुत्र जन्मले ॥ १३१ ॥
वडिला नृसिंह नामकरण । दुसरिया नावं बाळकृष्ण ।
तिसरा तुकोजि सुजाण । नारायण चौथा ॥ १३६ ॥
जो वडिल नृसिंह—नाम । तो मूर्तिमंत परब्रह्म ।
चालत बोलते विश्रामधाम । योगियांचें ॥ १३७ ॥
आतां बाळकृष्णाचे गुण । वर्णूं शके कवण ।
जैसा पूर्वि बाळकृष्ण । गोकुळि अवतरला ॥ १३८ ॥
ऐशिया तयाची कांता । गंगा नावें पतिव्रता ।
तियेची वर्णिता पवित्रता । गंगा चो ते ॥ १४२ ॥
तियेचिये पवित्र कुशि । मि जन्मलों सुद्धवंसि ।
नावं ठेविलें प्रितिसी । रघुनाथाचें ॥ १४३ ॥
हे वोवियाबद्ध पुष्पमाळा । अर्पिलि शंकरपादमुळा ।
संत सर्वदा घालुत गळां । भक्तिप्रेमें ॥ १४३ ॥
॥ इतिश्री प्रदोषव्रत माहात्म्ये धर्मगुप्तमुक्तिप्राप्ति नाम त्रयोविंशाति प्रकरणं ॥ २३ ॥

ग्रंथसमाप्तीनंतर कवीनें ग्रंथलेखनाचा काळ असा दिला आहेः—

नृपशालिवान शके । रत्नाकरि सकौतुकें ।
रुतु-बाण-मृगांकें । युक्त केलें ॥ १ ॥

* भा. इ. सं. मंडळ अहवाल शके १८३३ पृष्ठ ३–४

तै विंत्रिकरण संवत्सर । धर्मशादनकाळ मनोहरं ।
+ + + + + + । अपुर्व असे ॥ २ ॥
सकळ जगाचा स्वामि । मास तें तंव त्याचा मामिं ।
जीवें सहित शुद्ध दशामि । संपूर्ण होति ॥ ३ ॥ ७ ॥

रत्नाकर–ऋतु–वाण–मृगांक म्हणजे १५६७ शक होतो.

नकलकारानें आपला काल खालीलप्रमाणें दिला आहे:—

स्वस्तिश्रीनृपशालिवाहनशके ॥ १६२१ ॥ प्रमाथि संवत्सरे दक्षिणायने हेमंतऋतु मार्गशीर्ष वद्य एकादशी गुरुवारे तद्दिनि इदं पुस्तकं समाप्तः ॥ श्री शंकरार्पणमस्तु ॥

५ समाप्तीवरून स्पष्ट आहे कीं कवीनें हें काव्य शक १५६७ त रचिलें. आपलें गांव, प्रांत, वगैरे स्थलनिर्देशन करण्यास कवि विसरला, ही महाराष्ट्र-सारस्वतेतिहासकाराच्या मार्गांत मोठी च अडचण आहे. कालनिर्देश तरी कवीनें केला, हें आपलें भाग्य च समजावयाचें.

६ ग्रंथाचीं प्रकरणें एकंदर २३ आहेत; व ओंव्या ३७३३ आहेत.

वि. का. राजवाडे

## १० शाहू छत्रपतीचीं पर्जन्य पाडण्याविषयीं क्षेत्रस्थ ब्राह्मणांस आज्ञापत्रें

१ शक १६४० व १६४१ हीं दोन सालें महाराष्ट्राच्या कांहीं बऱ्याच भागांत अवर्षण पडलें. तें घालविण्याचा तत्कालीन राजमान्य व लोकमान्य उपाय म्हटला म्हणजे शिवालयांत किंवा तें नसल्यास कोणत्या हि इतर देवळांत अनुष्ठान बसविणें. सध्यां हि देशावर युद्धादि किंवा इतर घोर संकट आलें असतां, युरोपांत त्या त्या देशांतील भटभिक्षुक व राजेरजवाडे देवळांतून प्रार्थना करतात. तो च प्रकार आपल्या हि देशांत पूर्वीं जारीनें चालू होता व सध्यां हि चालू आहे.

२ पहिलें आज्ञापत्र १६४१ च्या आषाढ शुद्धांतील आहे. त्यांत पाऊस न पडल्यास व अनुष्ठान न केल्यास तुम्हास बोल लागेल, एवढी च इशारत कऱ्हाडच्या ब्राह्मणांस दिली आहे. दुसरें पत्र आषाढ वद्यांतील आहे. त्यांत पाऊस न पडल्यास, तुमचीं इनामें दूर होतील, असा धाक घातला आहे. तिसऱ्या पत्रांत पर्जन्यसूक्ताचें अनुष्ठान करण्यास सांगितलें आहे. व चौथ्या

पत्रांत सांग अनुष्ठान करण्याचा सल्ला दिला आहे. तात्पर्य, १६४१ च्या भाद्रपद वद्य ६ पर्यंत पर्जन्य पडला नाहीं. पुढें तरी पडला किंवा नाहीं, तें कळण्यास मार्ग नाहीं. पत्रें कऱ्हाड येथील गिजऱ्यांच्या दप्तरांत आहेत, त्यांच्या नकला अस्सलबरहुकूम सोबत जोडल्या आहेत. नकला एकंदर चार आहेत.

वि. का. राजवाडे

---

श्री १६४१ आषाढ शुद्ध १

**लेखांक १**

वेदमूर्ती राजश्री ब्राह्मणानि

कसबे कऱ्हाड स्वामी गोसावी यांसि

सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधी नमस्कार सुहूरसन अशरीन मया अलफ यंदा मृगाचे नक्षत्र सपूर्ण पडिले नाही आग्द्रा हि पडता दिसत नाही पर्जन्याकरिता मुलकात हकाक जाहाला आहे या करिता हे पत्र लिहिले आहे तरी अवघे ब्राह्मण क्षेत्रींचे मिलोन अनुष्टान करून पर्जन्याची वृष्टी होए ते गोष्टी करणे ए गोस्टीस अतराय कराल तरी तुम्हांस बोल लागेल हे चितात आणुन एवढ्या दिवसात पर्जन्य पडे

ऐसे करणे छ ३० रजब




श्री १६४१ आषाढ वद्य ७

**लेखांक २**

वेदशास्त्रसंपन राजश्री ब्राह्मण

क्षेत्र कराड स्वामी गोसावी यांसि

सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधी नमस्कार विनं(ति) उपरी एथील कुशल जाणुन स्वकीय लिहिले पाहिजे विशेष मुलखात पर्जन्य पडत नाही या करिता राजश्री स्वामीनी आज्ञा केली आहे तरी तुम्ही समस्त मिलोन अनुष्टान

वा. इ. ६

करून पर्जन्य वृष्टी होए ते करणें नाही तरी तुमचे इनाम दूर होतील छ २०
शाबान बहुत काय लिहिणे




**लेखांक ३**

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री
समस्त ब्राह्मण क्षेत्र कऱ्हाड गोसावी यासि

श्रे॥ रघुनाथभट पंडितराव नमस्कार उपरी एथील कुशल जाणुन स्वकीय लिहिणे विशेष प्रजन्याने ओढ दिली आहे याजनिमित्य राजश्री स्वामींनी सर्वत्र क्षेत्रास प्रजन्यसूक्ताचे अनुष्ठान करणे आणि प्रजन्य सीघ्र वृष्ट करी ते केले पाहिजे बहुत काय लिहिणे




**लेखांक ४**

श्री

१६४१ भाद्रपद वद्य ६

वेदमूर्ती समस्त ब्राह्मण क्षेत्र
श्री कराड स्वामी गोसावी

सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधी नमस्कार नमस्कार विनति उपरी एथील कुशल जाणऊन स्वकीय लिहिणे विशेष मुलुका मध्ये दोन वर्षे पर्जन्याची वृष्टी होत नाहीं एदं-निमित्य जिमुक्या ब्राह्मणास अग्रहारे दिल्ही आहेत त्याणी सांग अनुष्ठाने करून पर्जन्य पडोन पिके होऊन राज्याची अभिवृधी करावी म्हणऊन राजश्री स्वामींची आज्ञा जाहली आहे तरी तुम्ही समस्त एकत्र होऊन सांग अनुष्ठान करोन पर्जन्य पडोन पिके होऊन राज्याची अभिवृधी होए ते करणे छ १९ सवाल बहुत काय लिहिणे



# ११ निजानन्दकृत ज्ञानाब्धितरंग

## शक १६३०

१ रा. रा. विष्णु गोविंद विजापूरकर यांच्या संग्रहीं हा ग्रंथ फ्रेंच कागदावर अलीकडे बराच अशुद्ध लिहिलेला होता. तो त्यांनीं नुकता च माझ्या हवालीं केला. ग्रंथाचे एकंदर ११ तरंग असून ओव्या १६३६ आहेत. ग्रंथसमाप्ति येणेंप्रमाणें:—

सोळासे छत्तीसोत्तरें । शालीवाहन शक उच्चार ।
दक्षिणदेश अतिपवित्र । रामक्षेत्र दंडकारण्य ॥ २११ ॥
पंचक्रोश कृष्णातीर । मुक्तावळी नाम नगर ।
ग्रंथसमाप्ती रामेश्वर । वंदुनी समग संपविला ॥ २१२ ॥
सर्वधारी संवत्सर । दक्षिणायन मार्गेश्वर ॥
वद्य दशमी गुरुवार । प्रथम प्रहर जाणावा ॥ २१३ ॥
पुष्य नक्षत्र अमृतसिद्धि । योग जाणावा त्रिशुद्धी ॥
वंदूनीया संतमांदी । ग्रंथ निजानंदीं संपविला ॥ २१४ ॥

इति श्री वेदांतगर्भसुगमसार—गुरुशिष्यसंवाद—ज्ञानाब्धितरंग—संप्रदायमठपद्धतीविवरणं नाम एकादश सिद्धान्त ॥ वोव्या १६४० ॥ कृष्णार्पणमस्तु ॥
॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥

२ समाप्तीत सोळासे छत्तीसोत्तरें हा पाठ चूक आहे. खरा पाठ सोळासे तीसोत्तरें हा आहे, कारण सर्वधारी संवत्सर त्या सालीं येतो. सर्वधारीच्या मार्गेश्वर वद्यदशमीस गुरुवार येतो. नक्षत्र जुळत नाहीं—मुक्तावळी म्हणजे माहुली असावी. तत्रापि खात्री नाहीं.

३ विजानंद संप्रदायपरंपरा अशी देतो:—

शूळपाणि—नारायण—ब्रह्मदेव—वसिष्ट—शक्ति—व्यास—शुक—गौडपाद १ श्रीशंकराचार्य—( दशनामसंन्यास, द्वारका, जगन्नाथ, जोसीमठ, शृंगेरी येथील मठस्थापक ) २ विश्वरूपाचार्य—३ बोधायनाचार्य—४ ज्ञानघनाचार्य—५ ज्ञानोत्तमाचार्य—६ ज्ञान गिरि—७ सिंहेगिरी—८ईश्वरतीर्थ—९ नरसिंह—१० वियातीर्थ-मध्वसमकालीन—११ भारतीतीर्थ—१२ वियातीर्थ—१३ श्रीमळीयानंदतीर्थ—१४ यादवेंद्रयति—१५ परंकृष्ण—१६ श्रीनृसिंहसरस्वती—१७ माधवेंद्रसरस्वती—१८

अनृतेंद्रसरस्वती–१९ गगनेंद्रसरस्वती–२० माधवेंद्रसरस्वती–गोदातट–मंजरथ–२१ एकनाथ–२२ श्रीकृष्ण शक १५६२–२३ निजानंद शक १६३०

शृंगेरीच्या शंकराचार्यांपासून गुरुपरंपरा आहे. मध्यें कांहीं खंड असावा असें दिसतें. मध्वसमकालीन ( शक ११२० ) जो विद्यातीर्थ त्याच्यापासून श्रीकृष्णापर्यंत ( शक १५६२ ) तेरा पिढ्या दिल्या आहेत. म्हणजे १३ पिढ्यांस ४५२ वर्षं होतात. दर पिढीस ३४।३५ वर्षं पडतात. सबब पिढींत मध्यें कोठें तरी कांहीं खंड असावे.

२ ग्रंथ सामान्य अद्वैतवेदान्ताचा आहे.

वि. का. राजवाडे

## १२ रामचंद्राचार्य विरचित कानडी भगवद्गीता माध्वमत

१ ही गीता अष्टपुत्र्यांच्या संग्रहाला होती. अष्टपुत्रे हे माध्वमती असावे. विजापुराकडील रहणार. सदर गीतेचीं फक्त ९५ पानें सांपडलीं असून, त्यांत दहावा अध्याय संपूर्ण झाला असून, अकराव्याचे सहा श्लोक आहेत. ७० पानें गहाळ. कागद पुर्तकाली. प्रत्यध्यायाच्या शेवटीं प्रायः समाप्ति अशीः—

> ॥ हरिः ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्म-
> विद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्नाटकरामचंद्राचार्य-
> विरचिते श्रीमध्वाचार्यमतानुवर्तिन्यां अभ्यासयोगे
> नाम षष्ठमोऽध्यायः ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ ॥

पदार्थ कानडींत लिहिला आहे. कर्त्याचें नांव रामचंद्राचार्य. मध्वमत. पोथी सुमार साठ पाउणशें वर्षांची दिसते. कर्त्याचा काळ माहीत नाहीं.

२ या पोथींत एक विशेष असा आहे कीं कानडी भाषा मराठी बालबोध लिपींत लिहिली आहे. कानडी लिपि देवनागरीपासून च झालेली आहे. परंतु ती महाराष्ट्रांत आतां कोणाला वाचतां येत नाहीं. ह्या पोथीवरून दिसतें कीं कानडी, तामील, तेलगू, मलेयाळं या भाषेंतील ग्रंथ बालबोध लिपींत लिहिले असतां चालण्यासारखें आहे. हिंदुस्थानांत बालबोध ऊर्फ देवनागरी वळण

गौड व कर्नाटक भाषा धरून—सर्वांहा मुरू होणें सहज आहे, कृत्रिम नाहीं.

वि. का. राजवाडे

---

## १३ मुक्तेश्वराच्या भारताची एक जुनी त्रुटित प्रत

निर्णयसागर वगैरे छापखान्यांतून मुक्तेश्वराचे जे ग्रंथ छापून बाहेर पडले आहेत ते सर्व बऱ्याच आधुनिक प्रतींवरून तयार केलेले आहेत, असें त्या त्या प्रतींतील भाषेवरून आज कित्येक दिवस मला वाटत होतें. परंतु मुक्तेश्वराच्या कोणत्या हि ग्रंथाची अति जुनाट प्रत मला आजवर सांपडली नव्हती. सबब तत्संबंधानें विशेष लिहिण्याच्या भरीस मी पडलों नाहीं. अलीकडे दोन महिन्यां-खालीं पुणें येथील अष्टपुत्र्यांकडील कांहीं पोथ्या व गबाळ मजकडे आलें. त्यांत मुक्तेश्वराच्या भारताच्या सभापर्वाच्या पंधराव्या अध्यायाचीं १४ पानें म्हणजे २६७ ओव्या अति जीर्ण पानांवर लिहिलेल्या आढळल्या. भाषेवरून पहातां प्रत जुनाट आहे किंवा एका अगदीं मुक्तेश्वरकालीन पोथीचा साक्षात् अव्वल उतारा आहे असें दिसलें. निर्णयसागरी प्रतीशीं हीं पानें ताडून पाहिलीं तेव्हां अनुमान खरें आहे असें प्रत्ययास आलें. भाषा, पाठ वगैरे बऱ्याच बाबी निर्णयसागरी प्रतीहून जुनाट आहेत हें पांचपंचवीस ओव्या ताडून पहातां सहज प्रत्ययास येतें. मुक्तेश्वर एकनाथाचा नातू. तेव्हां त्याची भाषा एकनाथाच्या व दासोपंताच्या भाषेसारखी बरीच असली पाहिजे व मुक्तेश्वर रामदासाच्या आधींचा; तेव्हां रामदासाच्याहून मुक्तेश्वराची भाषा जुनी असली पाहिजे. दासोपंताचे व रामदासाचे अस्सल मूळ प्रतीवरून छापलेले ग्रंथ उपलब्ध आहेत. तेव्हां तुलना करण्यास अनुमान किंवा अंदाज यांची गरज नाहीं; प्रत्यक्ष प्रमाण उपलब्ध आहे. मला प्रस्तुत जी प्रत सांपडली आहे ती लिहिणारा किंचित् अशुद्ध आहे. तथापि प्रतीचा जुनाटपणा कांहीं झांकत नाहीं. कांहीं ओव्या तुलनेकरितां खालीं देतों.

| अष्टपुत्री प्रत | निर्णयसागरी प्रत |
|---|---|
| दुर्योधन् भोंवडी नेत्र | दुर्योधन भवंडी नेत्र |
| म्हणे हा पांडवांचा मित्र | म्हणे हा पाडवांचा मित्र |
| प्रतिकामी सारथीपुत्र | प्रतिकामी सारथीपुत्र |
| पैं सत्व उरऊं ठेला ॥ ५ ॥ | पैं सत्वर उठविला ॥ ५ ॥ |
| कर्दळीस्तंभप्राय सकुमार | कर्दळीस्तंभमाय सुकुमार |

आहेत. १७१९ तील भाषान्तर अघळपघळ आहे. तत्पूर्वीचें भाषान्तर आटपशीर आहे. संस्कृतज्ञ पुराणिक मोठमोठीं पुराणें सांगत. ते मोठमोठ्या गांवच्या देवळांत वक्तृत्व करीत. लहानसहान व्रतकथा सांगण्याचें काम असंस्कृतज्ञ ग्रामजोश्यांवर पडे. त्यांना साहाय्य व्हावें म्हणून ही भाषांतरें संस्कृतज्ञ पुराणिकांनीं करून ठेविलीं आहेत. ह्या मराठी व्रतकथां वरून दिसतें कीं, भारत, भागवत, रामायण, ह्यांचीं जशीं गद्यपद्य भाषान्तरें मराठींत झाली, तशींच भाषान्तरें लहानसहान व्रतकथांचीं हि करावीं लागलीं. ज्योतिष, वैद्यक, रसायण, व्याकरण, वेदान्त, मंत्रविद्या गणित, धर्मशास्त्र, शकुनविद्या, पशुवैद्यक, छंदःशास्त्र, वेदविद्या, कोकशास्त्र, यां विषयां वर जशीं लहानमोठीं भाषान्तरवजा मराठी पुस्तकें झालीं तशींच इतिहास, पुराणें, आख्यानें, व व्रतकथा यां वर हि झालीं.

२ १७१९ तल्या भाषांतरांत लिहिलें आहे कीं ही कथा भविष्योत्तरपुराणांतील आहे; आणि तत्पूर्वीच्या भाषांतरांत लिहिलें आहे कीं ही कथा पद्मपुराणांतील आहे.

३ हरतालिकाव्रतकथेचें हि भाषान्तर कऱ्हाडास सांपडलें. ह्या तिन्ही पोथ्या मंडळाच्या संग्रहांत आहेत.

वि. का. राजवाडे

## १७ श्रीसमर्थ आणि उपनिषदें

श्रीसमर्थग्रन्थांचा अभ्यास कसा करावा हा एक प्रश्न आहे. केवळ ग्रन्थांच्या अभ्यासानें जन्माचें सार्थक्य होतें असें नाहीं, तथापि जन्मास आल्याची सार्थकता होण्यास जीं साधनें आहेत, त्यांत श्रवण हें मुख्य साधन आहे. तें श्रवण कसें करावें ? प्रत्यक्ष गुरुमुखानें श्रवण घडेल तर यापरतें भाग्य नाहीं. परंतु तसें श्रवण घडण्याचें नशिबीं नसल्यास गुरुग्रन्थांचा तरी सारखा ध्यास घेतला पाहिजे. गुरुग्रन्थानां च गुरुस्थानीं मानून, ग्रन्थ च गुरुरूप आहेत अशी अचल भावना ठेवून ग्रन्थांतील वाच्यार्थाचें श्रवण करावें व लक्ष्यार्थाचें मनन करावें. अर्थज्ञान होण्यास शब्दज्ञान अवश्यक आहे, यासाठीं शब्दज्ञानाची हि उपेक्षा करतां कामा नये. शब्दज्ञान झालें म्हणजे आपलें कार्य संपलें, अशी फसवणूक मात्र स्वतःची करून घेऊं नये, म्हणजे झालें. गुरुकृपेची वेळ आली म्हणजे लक्ष्यार्थ लक्ष्यांत येईल व अनुभवास हि येईल. तोंवर वाच्यार्थ पाहिला च पाहिजे.

तेव्हां श्रीसमर्थग्रन्थांतील शब्दज्ञान यथार्थ होण्यास काय केलें पाहिजे असा मनाला प्रश्न आहे. श्रीसमर्थांचे मुख्य ग्रंथ दोनः–( १ ) श्रीमत् दासबोध व २ ) श्री श्लोक मनाचे. पैकीं श्रीमत् दासबोधाला संमत ग्रन्थ कोणते त्यांचा उल्लेख श्रीसमर्थांनीं पहिल्या दशकाच्या पहिल्या समासांत केला आहेः—

शिवगीता रामगीता । गुरुगीता गर्भगीता ।
उत्तरगीता अवधूतगीता । वेद आणि वेदांत ॥ १८ ॥
भगवद्गीता ब्रह्मगीता । हंसगीता पांडवगीता ।
गणेशगीता येमगीता । उपनिषदें भागवत ॥ १९ ॥
इत्यादिक नाना ग्रंथ । संमतीस बोलिले येथ ।

हे सारे ग्रन्थ अभ्यासिले पाहिजेत. ग्रन्थराजांत या ग्रन्थांतील कित्येक उतारे हि आले आहेत. या सर्व ग्रन्थांचें जें रहस्य तें श्रीमत् दासबोधांत आलें आहे. श्री कल्याणस्वामीकृत ग्रन्थराजाची जी आरती आहे तिचा आरंभ च असा आहेः—

वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला ।
श्रुतिशास्त्रग्रन्थगीता साक्ष संगम केला ॥

तसें च मनाच्या श्लोकांना आधारभूत ग्रन्थ कोणते यांचा प्रत्यक्ष निर्देश श्रीसमर्थांनीं जरी केलेला नाहीं, तरी मनोबोधाची आरती पाहिली म्हणजे या अवघ्या २०५ श्लोकांत वेदांताचें सारें रहस्य आलें आहे, हें आपणांस कळणार आहे.

वेदाचें जें गुह्य शास्त्राचें जें सार ।
प्राकृत शब्दामाजी केला विस्तार ॥

अशा स्वरूपाचे हे श्लोक आहेत. तेव्हां या दोन्ही ग्रन्थांना आधारभूत ग्रन्थ कोणते व त्यांचा आधार श्रीसमर्थांनीं कसकसा घेतला आहे, हा अभ्यासाला एक स्वतंत्र विषय आहे. आधारभूत ग्रन्थांच्या साहाय्यानें श्रीसमर्थकृत ग्रन्थांतील कित्येक दुर्बोध स्थळें लागण्याचा हि संभव आहे. या माझ्या म्हणण्याच्या समर्थनार्थ एक लहानसें उदाहरण देतों.

नव्हे जाणता नेणता देवराणा ।

असा मनाच्या श्लोकांपैकीं १९३ व्या श्लोकाचा पहिला चरण आहे. याचा अर्थ कसा करावा ? आपण आपल्या मनांत या चरणाचा जो कांहीं अर्थ करूं, त्याहून किंचित् निराळा, अथवा निराळा नसला तर अधिक स्पष्ट अर्थबोध होण्यास केनोपनिषद् उपकारक होईल असें वाटतें.

अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि ।

इंद्रियांनीं जाणल्या जाणाऱ्या वस्तु नामरूपात्मक, अल्प, अशुद्ध, अनित्य असतात; तसें ब्रह्म नाहीं व तें इंद्रियांनीं जाणलें जात नाहीं. बरें, तें अविदित आहे म्हणावें तर तेथें जाणण्याची अपेक्षा उत्पन्न होते, कारण जें माहित नसतें तें माहित करून घ्यावें, अशी लोकप्रवृत्ति असते; परंतु ब्रह्म एकीं एक, अद्वितीय, विज्ञानस्वरूप च असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं अशी अपेक्षा हि संभवत नाहीं. तात्पर्य, ब्रह्म ज्ञात आणि अज्ञात वस्तूंहून निराळें आहे, असा या चरणाचा स्पष्ट अर्थ होतो.

मग तें ब्रह्म आहे तरी काय ? श्री समर्थ तो श्लोक पुरा करितातः—

न ये वर्णितां वेदशास्त्रां पुराणां ।
नव्हे दृश्य अदृश्य साक्षी तयाचा ।
श्रुती नेणती नेणती अंत त्याचा ॥ १९३ ॥

आणि केनोपनिषद् सांगतेंः—

न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो न विद्मो न विजानीमो यथैतदनुशिष्यात् ।

तें डोळ्याला दिसत नाहीं, वाणीला वर्णितां येत नाहीं, मनाला त्याची कल्पना होत नाहीं, तात्पर्य, दुसऱ्याला सांगतां येईल असें त्याचें श्रुतीला हि वर्णन होत नाहीं. ( केनोपनिषद् १×३ ).

अशीं आणखी कित्येक स्थळें दाखवितां येतील. पण तसें करण्याचा आज हेतु नाहीं. श्रीसमर्थकृत ग्रन्थांचा अभ्यास कसा झाला पाहिजे याचा नुसता एक मार्ग आज दाखवावयाचा होता. तथापि आणखी एक स्थळ इतकें तंतोतंत आहे कीं तें पाहून मनाच्या श्लोकांतील हा प्रसंग श्रीसमर्थांनीं छांदोग्यांतून च घेतला आहे, अशाविषयीं शंका वाटणार नाहीं. मनाच्या श्लोकांत गुरुशिष्यसंवाद नाहीं. साऱ्या २०५ श्लोकांत प्रश्नोत्तरपद्धतीचा अवलंब फक्त एका च ठिकाणीं केला आहे. १९४ वा श्लोक असा आहेः—

वसे हृदईं देव तो कोण कैसा । पुसे आदरें साधकु प्रश्न ऐसा ।
देहे टाकितां देव कोठें रहातो । परी मागुता ठाव कोठें पहातो ॥

या श्लोकांत दोन प्रश्न साधकानें विचारले आहेतः (१) प्रत्येकाच्या हृदयांत देव आहे म्हणतात तो कसा आहे, केवढा आहे, आणि (२) देह पडल्यावर हा देव कोठें जातो.

छांदोग्य उपनिषदांत हि प्रायः प्रश्नोत्तरपद्धति नाहीं, तथापि हे च दोन प्रश्न जेथें आले आहेत, तेथें ते शिष्यानें गुरूला विचारले आहेत. प्रत्येकाच्या अंतः-करणांत एक लहान कमलासारखें घर आहे, त्यांत अंतराकाश आहे व त्यांत तें ब्रह्म आहे, तें जाणलें पाहिजे असें गुरूंनीं म्हटल्यावर शिष्य विचारतो

यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नन्तराकाशः किं तदत्र वियते ॥ ( छांदोग्य ८ × १ × २ )

याचा अर्थ वसे हृदईं देव तो कोण कैसा। हा एक प्रश्न, आणि दुसरा प्रश्न

यदेतज्जरा वाऽऽप्नोति प्रध्वंसते वा किं ततोऽतिशिष्यते ॥ (छां.८×१×४)

जेव्हां देहाला म्हातारपण येतें किंवा देह नाश पावतो तेव्हां मग काय उरते ?

असे हे दोन्ही प्रश्न १९४ व्या श्लोकांत आहेत, ते च छांदोग्यांत आहेत. १९५ व्या श्लोकांत या प्रश्नांचीं उत्तरें श्रीसमर्थ देतातः—

वसे हृदईं देव तो जाण ऐसा। नभाचे परी व्यापकु जाण तैसा।
सदा संचला येत ना जात कांहीं। तयावीण कोठें रिता ठाव नाहीं॥

तो देव अंतःकरणांत आहे म्हणजे कांहीं तो लहान मोहरी एवढा आहे असें नाहीं, तर जेवढें हें बाहेरचें आकाश आहे तेवढा तो व्यापक आहे व देह जरी पडला तर तो सर्वव्यापी देव मरत नाहीं, तो सर्वत्र भरलेला आहे, त्याला येणें जाणें कांहीं नाहीं.

हुबेहुब हीं च उत्तरें छांदोग्यांत दिलीं आहेतः—

यावान्वा अयमाकाशस्तावानेषोऽन्तर्हृदयआकाशः॥ इत्यादि (८×१×३)

जेवढें हें बाहेरचें आकाश आहे तेवढें अन्तराकाश आहे, वगैरे. आणि देह क्षीण होऊन पडला तरी

नास्य जरयैतज्जीर्यति न वधेनास्य हन्यते ॥ इत्यादि

देहाबरोबर तो देव क्षीण होत नाहीं किंवा मरत नाहीं, तर तो सदा संचलेला आहे.

असो. अशीं शेंकडों—नव्हे—हजारों स्थळें आहेत. तीं आनंददायक आणि बोधप्रद झाल्यावांचून राहणार नाहींत.

धुळें, ज्येष्ठ शु. ६ शके १८३६

शंकर श्रीकृष्ण देव

# १८ जनीजनार्दनांचा थोडासा परिचय



जनीजनार्दनांचीं कांहीं थोडीशीं पदें आजवर प्रसिद्ध होतीं किंवा ऐकून ठाऊक होतीं. हल्लीं त्यांचा एक लहानसा स्वतंत्र ग्रन्थ नवीन उपलब्ध झाला आहे. ग्रन्थाचें नांव " निर्विकल्प ग्रन्थ " असें आहे. त्याचे एकंदर पंधरा अध्याय असून ओवीसंख्या अवघी ७१६ आहे. ग्रन्थ निःसंशय महत्वाचा आहे. जनीजनार्द-नांची वाणी ठसठशीत आहे, तींत गोडी आहे. प्रस्तुतचा ग्रन्थ लिहिण्यास त्यांनीं सकाळीं आरंभ केला तो तिसरा प्रहरीं ग्रन्थ संपविला, असा ग्रन्थांत उल्लेख आहे. ग्रन्थारंभीं नमनाच्या वगैरे ओव्या नाहींत, याचें मला नवल वाटतें.

कोणे येके अवसरीं । उद्धव आणि श्रीहरी ।
बैसले होते यमुनेतीरीं । स्नान संध्या करीत ॥१×१॥

असा च ग्रन्थाला एकदम आरंभ केला आहे. ग्रन्थ अध्यात्मपर असून उद्धवांनीं अनेक शंका विचारल्या आहेत व श्रीकृष्णांनीं त्यांचीं उत्तरें दिलीं आहेत. ग्रन्थाचें स्वरूप व महत्व लक्ष्यांत यावें म्हणून कांहीं शंका मात्र येथें दर्शवितो, उत्तरें देणें शक्य नव्हे.

(१) उद्धव आणि श्रीहरी यमुनेच्या तीरीं स्नानसंध्या करीत असतां तेथें एका कावळ्यानें येऊन एक बेडुक धरून नेलें. तें पाहून उद्धवांना वाईट वाटलें आणि त्यांनीं प्रश्न विचारावयास आरंभ केला.

शरीरें शरीराचें केलें भक्षण । तरी हें केल्याचें काय पुण्य ।
तुझे कर्तृत्वीं माझें मन । कंटाळलें श्रीहरी ॥ १×५ ॥

(२) पुढें मग भक्तीचा प्रश्न निघाला आहे.

यावरी बोले उद्धव । भक्तीनें आकळिला देव ।
साच कीं हें वाव । सांग तें बा ॥ १ × १३ ॥

त्यावर सकाम आणि निष्काम भक्तीचें फार हृदयंगम विवेचन आहे.

(३) तुम्ही जो सांगितला विचारु । तो मायिक अवघा चराचरु ।
तरी कोणें प्रकारें करूं । भक्ती तुझी ॥ १ × ७३ ॥

असा उद्धवांनीं प्रश्न विचारल्यावरून आत्मज्ञान सांगण्यास भगवंतांनीं सुरवात केली आहे.

(४) देवा येक हेत उपजला । तेणें संदेहो पडला ।
तो फेडी वहिला । मनींचा माझ्या ॥ ३ × ५१ ॥

यमदूत नेती धरूनी । नाना प्रकारें करिती जाचणी ।
हें ऐकियलें कर्णीं । पूर्वापर ॥ ५२ ॥
तरी याचा कैसा भावो । फेडी माझा संदेहो ।
हें सत्य कीं वावो । कृष्णनाथा ॥ ५३ ॥

असा एक सहज च प्रश्न करण्यांत आला आहे.

(५) यावरी उद्धव बोलिला । देवा माझा संदेह सर्व गेला ।
जो जो वृत्तांत सांगितला । ता तो सत्य स्वामिया ॥ ५×१७ ॥
आतां येक पुसतों आपणातें । स्वल्प चि सांगिजे मातें ।
जेणें माझिया चित्तातें । समाधान होय ॥ १८ ॥
देवा अवघा तूं आहेस येक । तरी कां जालासी अनेक ।
अनेक होऊनि लोप । धरितां कां ॥ १९ ॥

हा प्रश्न विचारल्यावरून भगवंतांनीं सृष्टीच्या उत्पत्तिस्थितिलयाचें निरूपण केलें आहे.

(६) उद्धव देवासी बोलिला । सर्व विस्तारु पाहिजे सांगितला ।
प्रेमपान्हा देईं वहिला । श्रीकृष्णनाथा ॥ ६×१ ॥
कृष्णा तूं माझी माउली जरी । तरी स्तान दे प्रेमलहरीं ।
क्षुधा न गेली निर्धारीं । अद्यापि माझी ॥ ६×२ ॥
तुवां ब्रह्मरस पाजिलें दुग्ध । तेणें जालों मी सगद्गद ।
ऐसें बोले उद्धव भक्त प्रसिद्ध । देवाप्रती ॥ ६×४ ॥
देवासी जडली प्रीति । ब्रह्मबोध करी उद्धवाप्रती ।
प्रेमपान्हा ` प्रीतीं । जैसी माउली बाळका ॥ ६×४ ॥

अशा लडिवाळपणानें उद्धवांनीं प्रश्न विचारले आहेत व तितक्या च प्रेमभरानें भगवंतांनीं त्यांचीं उत्तरें दिलीं आहेत.

(७) सर्व जग तूं जालासी हरी । परी माया उपजली कोणे प्रकारीं ।
तें सांग गा मुरारी । श्रीकृष्णनाथा ॥ ७×१२ ॥

असा मायोद्भवाचा प्रश्न विचारला आहे.

(८) भगवंताच्या उत्तरांनीं उद्धवाचें पूर्ण समाधान झालें, तें सांगतांना प्रस्तुतच्या ग्रन्थाचा महिमा सहज च वर्णिला आहे.

यावरी उद्धव बोलिला । देवें जो जो पदार्थ सांगितला ।
तो तो ऐकोनि संतोष जाला । माझिया मनीं ॥८×२७॥

आतां ऐसें वाटतें मनीं । तूं अकर्ता सर्व करूनी ।
फेडिली पृच्छेची शिराणी । माझी स्वामिया ॥ २८ ॥
यावरी बोले वनमाळी । तुवां पुसिलें मंजुळी ।
म्हणोनि निजज्ञानाची खोली । दाविली तुज ॥ ३० ॥
हें ज्ञानाचें हि निजज्ञान । बुद्धीसी हा बोध जाण ।
चित्त अहंकार हरपोन । जाती येणें ॥ ३१ ॥
चांडाळासी होय बोध । येणें नासती भेदाभेद ।
ज्ञानियासी उपजे प्रबोध । ऐसें सांगितलें उद्धवा ॥ ३२ ॥
ज्याचे गांठीं पूर्व पुण्य । त्यासी च हा ग्रन्थ होय श्रवण ।
चांडाळ ते हि तरोन । जातील येणें ॥ ३३ ॥

अशा रीतीनें उद्धवांचें पूर्ण समाधान होऊन ते तटस्थ झाले असतां आणखी प्रश्न विचारण्याविषयीं भगवंतांनीं च त्यांना प्रवृत्त केलें.

मग उद्धवें केली पुसी । देवा प्रळयीं कोठें होतासी ।
तें सांगिजे हृषीकेशी । कृपा करोनी दातारा ॥ ९×१८ ॥

या प्रश्नाचें उत्तर देत असतां सहज एका ठिकाणीं भगवंतांनीं आचाराचा महिमा वर्णिला आहे.

करावा बुद्धीचा प्रकाशु । अवघा देव हा उपदेशु ।
परंतु वर्णावर्णकर्माचा नाशु । करों नये ॥ ९×५२ ॥
ज्या ज्या कर्मासी यावें । तैसें आचारें विचारें वर्तावें ।
तेणें मुक्त व्हावें । सर्वकाळ ॥ ५४ ॥
जो आचारविचारा भंगला । तो कर्मचांडाळ जाला ।
तो रौरवीं पडला । चंद्रार्कवरी ॥ ५५ ॥
आत्मवत् सर्व जाणावें । परंतु आचारातें न भंगावें ।
आचारवर्तणुकी पावावें । परम पद ॥ ५६ ॥
जो आचारासी भंगला । तो चांडाळांत बोलिला ।
यमपुरीचा जाला । भोक्ता अकर्मैं ॥ ५७ ॥

(९) भगवंतांनीं आचाराचें इतकें महत्त्व सांगितलेलें पाहून पुढें मागें कोणाला तरी यावर शंका येणार च म्हणून उद्धवांनीं च विचारलें:—

सर्वां घटीं भगवान । नांदताहे परिपूर्ण ।
तयासी द्वैतपण । कैसें धरावें ॥ १०×२ ॥
अवघा चि देव जाला । तेथें विटाळ कोणासी लागला ।
आचार तरी वहिला । कोणासी धरावा ॥ ३ ॥

उद्धवाचा हा येककार प्रकाराचा प्रश्न ऐकून भगवंतांच्या मनाला वीट आला.

ऐकतां उद्धवाचें वचन । कंटाळले श्रीभगवान ।
ऐसें बोलों नको रे वचन । उद्धव अज्ञाना ॥ १०X४ ॥

अशा प्रकारें उद्धवाच्या प्रश्नाविषयीं तिटकारा दाखवून हि भगवंतांनीं जें उत्तर दिलें आहे, तें मननीय असणार हें उघड आहे.

( १० ) हे सारे प्रज्ञावंतांचे प्रश्न झाले, परंतु जे अज्ञानी आहेत त्यांनीं आपलें हित कसें करून घ्यावें म्हणून त्यांच्या वतीनें हि उद्धव विचारतात:—

यावरी बोले उद्धव भक्त । देवा सांगितलें तें सत्य ।
उमजु नये तयाचें हित । कवणिया प्रकारें होय पैं ॥ १२X४४ ॥

( ११ ) शेवटीं पुन्हां एकदां सामान्यपणें प्रश्न विचारला आहे कीं, मजसारख्यानें हा भवसागर कसा तरून जावा.

यावरी बोले उद्धव । देवा कैसा तरावा भव ।
त्याचा मज उपाव । कृपा करोनी सांगिजे ॥ १३X२१ ॥

अशा कित्येक शंका, उपशंका या ग्रन्थांत आहेत व तितक्यांची समाधानकारक उत्तरें दिलीं आहेत. पंधराव्या अध्यायांत

नित्य स्नानतंध्या करी । हा ग्रन्थ हृदयीं धरी ।
तयासी श्रीहरी । भेटेल निर्धारीं सत्य जाणा ॥ १५X२१॥

हा ग्रन्थ वाचितां । येकांतीं मनन करितां ।
समाधान तयाचे चित्ता । होतसे जाण ॥ २२ ॥

इत्यादि रीतीनें ग्रन्थाचें स्तवन करून जनीजनार्दन ग्रन्थाचा शेवट करितात:—

हा निर्विकल्प ग्रन्थ । असे गीतेचा मथितार्थ ।
जनीजनार्दन येकनाथ । बोलिले असे ॥ १५ X २७ ॥
कार्तिक शुक्ल येकादशी । स्नान केलें यमुनेसी ।
ग्रन्थ पावला अभंगासी । तृतीय प्रहरीं ॥ २८ ॥
भावें करिती श्रवण । ते जीवन्मुक्त होतील जाण ।
त्यांचे वृत्तीचें समाधान । करील देव ॥ २९ ॥
श्रीकृष्ण म्हणे उद्धवराया । तुज जें सांगितलें रे सखया ।
हें ज्ञान भकराया । दुर्जनश्रवणीं न पडो ॥ ३० ॥
जनीजनार्दन म्हणे । हें श्रीकृष्णाचें बोलणें ।
तें परिसावें संतजनें । निर्मळ चित्तें करोनियां ॥ ३१ ॥
इति श्रीनिर्विकल्प ग्रन्थ । श्रीकृष्ण उद्धव संवादत ।
तो संतांचा विनोद अद्भुत । अर्पण त्यासी ॥ ३२ ॥

पहिल्या चवदा हि अध्यायांचा शेवट करतांना वरील ३१ आणि ३२ या च दोन ओव्या आल्या आहेत, परंतु वरील २७ व्या ओवींत "जनीजनार्दन येकनाथ" असें म्हटलें आहे, त्याचा अर्थ काय? जनीजनार्दन आणि एकनाथ यांचा संबंध काय? जनीजनार्दन कोण, केव्हां होऊन गेले? एकनाथ जसें आपणांस "एकाजनार्दन" म्हणवीत, तद्वत् हे आपणांस "जनीजनार्दन" म्हणवीत, असून उभयता हि जनार्दनस्वामींचे शिष्य होते कीं काय? कां जनी-जनार्दन हे च जनार्दन स्वामी होत? अथवा जनीजनार्दन हे एकनाथांचे शिष्य तर नव्हत? इत्यादि अनेक प्रश्न साहजिक उद्भवतात.

रा. राजवाडे यांनी जनीजनार्दनाविषयीं पूर्वी ग्रन्थमाला मासिकांत एक टांचण लिहिलें होतें, तें,प्रो.विजापूरकर यांनीं रा.राजवाड्यांच्या लेखांचें "संकीर्णलेख-संग्रह" म्हणून जें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे,त्यांत आलें आहे. जनीजनार्दन हे बीडचे राहणारे होते, त्यांची वंशपरंपरा अजून बीड येथें आहे, त्यांचें उपास्य दैवत गण-पति असून त्यांनीं गणपतीची स्थापना पैठणाजवळ गंगामसलें येथें केली व ते शक १५२३ च्या श्रावण वद्य ७ स समाधिस्थ झाले, अशी माहिती देऊन त्यांचीं तीन पदें दिलीं आहेत व आपणाजवळ त्यांचीं शें दीडशें पदें आहेत, असें रा. राजवाडे यांनीं त्या टांचणांत म्हटलें आहे.

जनीजनार्दन हे परमार्थांतले मोठे अधिकारी होते, हें त्यांच्या निर्विकल्प ग्रन्थावरून उघड होत आहे. असें असून मला मोठें नवल वाटतें कीं, साधुसंतांचीं चरित्रें गाण्याचा ज्यांना मोठा छंद त्या महिपतिबावांनीं जनीजनार्दनांचा कोठें च उल्लेख केला नसावा, हें काय? वास्तविक असें होऊं नये. आपल्या च समजुतींत कांहीं तरी चूक तर होत नाहीं ना, अशी मला शंका येते. "एकनाथ स्वामींचे गुरु जे जनार्दनस्वामी त्यांच्याहून हे जनीजनार्दन निराळे आहेत, हें प्रसिद्ध आहे" असें रा. राजवाडे आपल्या टांचणांत म्हणतात, पण मला त्याविषयीं शंका येतें. जनीजनार्दनांचा उल्लेख महिपतींनीं केला नाहीं व माझ्या पाहण्यांत ज्या प्रकाशित आणि अप्रकाशित संतमालिका आल्या आहेत, त्यांत हि त्यांचा कोठें निर्देश नाहीं. हें असें कसें व्हावें?*

---

* सन्मणिमालेंत खालील आर्यार्ध आहेतः—

॥ ज्यां वंदिला जनार्दनपंत हि विसरेन संत आय कसा ॥ ७ ॥

आणि ॥ ज्यातें जनीजनार्दन ऐसें बहु साधु जाणते म्हणती ॥ ३४ ॥

या श्लोकार्धांत एकनाथाचा गुरु जनार्दनपंत व जनीजनार्दन ह्या दोन व्यक्ति निरनिराळ्या होत्या असें पंत लिहितात. अर्थात् त्या एक असाव्या, असा जो तर्क रा. देव यांनीं केला आहे तो अप्रतिष्ठित म्हणावा लागतो.

वि. का. राजवाडे

या सर्व शंकांचें समाधान कोणी तरी आणि केव्हां तरी केलें पाहिजे.

शंकर श्रीकृष्ण देव

## १९ शिवसुत-मच्कुंद-कृत श्रीभार्गवचरित्र

मच्कुंदकर्त्यांचें नांव महाराष्ट्रग्रंथकारांत आतांपर्यंत उपलब्ध नव्हतें. प्रस्तुतचा त्यांचा ग्रन्थ श्रीकल्याणस्वामींच्या डोमगांवी श्री. दत्तात्रयबुवांकडे मिळाला. ग्रन्थ ओवीबद्ध असून प्रासादिक आहे. दुःखाची गोष्ट इतकी च कीं, मिळालेली प्रत अपूर्ण आहे. बत्तीस प्रसंग मिळून सरासरी तीन हजार ओवी-संख्या उपलब्ध आहे व आणखी अदमासें इतका च ग्रन्थ असावा. परशुरामाच्या चरित्रांत मुख्यतः वीररसाशिवाय दुसरा कोणता रस असावयाचा ! मुक्तेश्वरांची बरोबरी मच्कुंद करितील, इतकी त्यांची कविता सरस आहे. संपूर्ण ग्रन्थ मिळविण्याची हांव संशोधकांनी बाळगिली पाहिजे.

संरक्षावे साधु जन । आणि दंडावे दुष्ट दुर्जन ।
करावें धर्माचें पाळण । हें अंतःकरण देवाचें ॥ १४४६ ॥

हा हेतु त्या सहाव्या अवताराचा असल्यामुळें त्या वेळच्या महाराष्ट्राला या ग्रन्थाची आवश्यकता वाटावी हें साहजिक आहे.

मच्कुंद केव्हां होऊन गेले हें निश्चयानें सांगतां येत नाहीं, तथापि ते श्रीसमर्थांचे वेळीं असावेत असें वाटतें. प्रस्तुतची प्रत ज्या कागदावर लिहिली आहे तो कागद श्रीसमर्थकालीन आहे, हें निश्चित आहे. कागदाच्या पाठीवर फारशी व मराठी हिशोब लिहिलेला आढळतो. फारशी हिशोबांत कोठें कोठें फसली सन १०७६ व १०८० या दोन सनांचा उल्लेख आढळतो. १०७६ वं १०८० म्हणजे शक १५८८।८९ व १५९२।९३ होय. चालू हिशोबाचे कागद अन्य कामाकडे कोणी लावणार नाहीं, यावरून प्रस्तुतची प्रत १५८८ नंतर पांच पंचवीस वर्षांनीं लिहिलेली असावी असें वाटते. ज्या हिशोबाचे हे कागद आहेत, तो हिशोब खाजगी नसून सरकारी आहे, त्यामुळें त्या हिशोबाला हि ऐतिहासिक महत्त्व विशेष आहे. तात्पर्य प्रस्तुतची प्रत संग्राह्य आहे व मंडळाचें कदाकाळीं अग्निबाधाविरहित गृह झालें म्हणजे त्यांत ही प्रत विराजमान होईल.

शंकर श्रीकृष्ण देव

# २० घोरपडे यांची वंशावळ

श्रीसमर्थ संप्रदायाचे कागद मिळवीत असतां ज्या कित्येक इतर घराण्यांचा या संप्रदायाशीं संबंध पोचतो, त्या त्या घराण्यांचे हि कांहीं कागद उपलब्ध होतात. चाफळास मेढे म्हणून एक घराणें आहे. या घराण्यानें श्रीसमर्थदरबारीं कांहीं काळ कामें केलेलीं आहेत, तेव्हा मेढ्याचें दप्तर पाहात असतां त्यांत घोरपड्यांच्या संबंधानें कांहीं कागद मिळाले. त्यांत घोरपड्यांच्या वंशावळीचे तीन कागद आहेत. या वंशावळींत, आतांपर्यंत उपलब्ध नसलेली कांहीं माहिती आहे व हल्लीं असलेल्या माहितींत दुरुस्ती करावी लागेल अशा कांहीं गोष्टी आहेत. हे तिन्ही कागद मोडींत आहेत. अनास्थेमुळें ते अत्यन्त जीर्ण झालेले आहेत. ते जसेच तसेचे उतरून घेऊन मंडळास सादर करितों.

श्री १/३

यादी घोरपडे याची वौशावळ मूळ जागा उदेपूर श्री सीवाजी महाराज छेत्रपती यांचे कारकीर्दीपूर्वी पादशाईत उदेपुराहून येऊन जांबेची व वागींची व भालवणीची व न्हावीची व पाटीलकी व ईट + देशमुख पादशाईपासून साऊन पाच च्यार डोई वहीवाट केली नंतर शककर्ते श्रीमन्महाराज छेत्रपती अवतार उत्पन होऊन राज्ये काबीज केले त्या समई घोरपडे याचा पुरुष माहलोजी घोरपडे हे महाराजापासी पाचसहे स्वारानीसीं चाकरीस राहीले पुढे काही दिवसांनीं सीव छेत्रपती महाराज शके १६०२ रौद्रनाम सवछंर चैत्र पोर्णमा रवीवारीं कीले रायेगड येथे सीव जाहले त्याचे पुत्र संभाजी राजे ( जे )ष्ठ पत्नी सईबाईसाहेब याचे गर्भीचे आणि कनिष्ठ पत्नी सोईरा ( बाई ) साहेब याचे उदरी राजारामसाहेब रायेगडी होते नंतर संभाजी महाराज यांणी म्हलोजी घोरपडे यांसी स ( रंजामी ) देऊन मुखत्यारी सांगोन सरनोबतीची वस्त्रें दिल्ही आणि किले पनोळेस ठेऊन आपण रायेगडास गेले पुढें राज्यांत फौजा येऊन संभाजीमहाराज मुलुक सर करीत होते इतक्यांत अवरंगजब पादशाह याची फौज चालून आली सबब म्हलोजी घोरपडे महाराजाकडे संगमेश्वरास गेले तेथें पादशहाकडील फौजेची व महाराजाची लढाई होऊन संभाजीमहाराज यासी धरून नेहले त्या गर्दीत म्हलोजीबावा घोरपडे ठार जाहले त्या समई घोरपडे यांसी तिघे पुत्र जेष्ठ संताजी घोरपडे दुसरा पुत्र बहीरजी घोरपडे कनिष्ठ तिसरा पुत्र मालोजी घोरपडे त्या वेळीं संताजी घोरपडे वडील पुत्र म्हलोजी घोरपडे याचे फौजेचा अधिकार जाहला कृपा बहुत संपादली त्या समई ममलकत मदार या किताबाची वस्त्रें दिल्ही. नंतर राजारामसाहेब छेत्रपती यांणी सेनापतीची वस्त्रें संताजीबावा घोर-

पडे यांसी दिल्ही सके १६१० चे साली दिल्ही दुसरा पुत्र बहिरजी घोरपडे यांसी हिंदुराव कितायत दिल्ही तिसरा मालोजी घोरपडे यांसी अमीरुल उमराव हे किताब दिल्ही नंतर राजाराम छत्रपती चंदीस राहान होते काही दिवसा मोगलाच्या फौजा येऊन भुदरगडास वेढा दिल्हा सबब संताजीराव घोरपडे सेनापती वेढा उठवून येणेविसी महाराजांची आज्ञा जाहली त्याजवरून सरंजाम फौज घेऊन सेनापती याणी लडाई मारून वेढा उठविला पुढे कर्नाटक प्रांत सर करीत होते ते समई महाराजाचे दर्शनास आले तेव्हां मर्जी प्रसन्न होऊन आज्ञा जाहली जे तुमचे कुटुंब राहाणेस भुदरगड दिल्हा नंतर कांही दिवस फौजबंदी करून प्रतात त्यान्या करीत होते इतपयान म्हसवडकर माने यांणी दगा फटका करून संताजी बावा सेनापती यांसी शके १६३५ सोळासहे पचतीस साली मारिले नतर ( त्याचे ) पुत्र पिराजी घोरपडे हे महाराज छत्रपतीकडे आले शांतवन करून सेनापतीची वस्रे शके १६३७ साली दिल्ही ते हो सेवा चाकरी करीत स्वामीकार्यावर हलकर्णी का नुल यां मुकामी शके १६५० साली काळ जाहला पुढे त्याचा पुत्र राणोजी घोरपडे लाहान पाच वर्षांचे होते तेव्हा पिराजी घोरपडे याची मातुश्री द्वारका बाई साहेब याणीं नातु राणोजी घोरपडे यांसी घेऊन करवीरास संभाजी महाराज छत्रपती याजकडेस आली त्याणीं सेनापतीची वस्रे सके १६५२ साली दिल्ही नंतर कापसीस द्वारकाबाई साहेब व राणोजी घोरपडे सेनापती घेऊन राहिली नंतर शके १६८५ †साली द्वारकाबाई आईसाहेबाचा काळ जाहला त्याजवर राणोजी घोरपडे सेनापती सके १७०५ साली कैलासवासी जाहले त्याचे पोटी पुत्र वडील स्त्री लक्ष्मीबाईचे पोटी वडील पुत्र मुरारराव व सखाराम बावा व नारायेणराव व द्वारकोजी बावा धाकटी स्त्री आंबीकाबाईचे पोटी पुत्र संताजी बावा व पिराजी बावा व म्हलोजी बावा व जयेराम बावा *

जेष्ठ स्त्रीचे वंशातील नबाजी व नारायण राव याचा नातु नारायणराव आहे

१ जेष्ठ संताजी घोरपडे, यास पुत्र दोन रामचंद्रराव जेष्ठ राणोजी बावा कनिष्ठ रामचंद्रराव याचे पुत्र संताजीराव घोरपडे सेनापती कनिष्ठ बंधु

---

† वैशाख वद्य १२ असा शोध मागाहून कोणी घातला आहे.

* येथे मूळ कागद संपला. पुढील मजकूर ज्यानें वरील कांहीं शोध घातले त्यानें मागाहून लिहिलेला आहे.

१ " मुलीकर सींदे याची कन्या " असा शोध घातलेला आहे.

२ " पिसाळ वाईकर याची कन्या " इत्यादि शोध घातलेला आहे.

३ शोधांत संताजीवर १, पिराजीवर ३, म्हलोजीवर २, जयेरामवर ५ असे अंक घातले असून राघोजीबावा ४ हें नांव नवीन च आहे.

लक्ष्मणराव यास दत्तक रामबावा आजे यास दत्तक दिल्हे राणोजी घोरपडे यास पुत्र येक रघुनाथराव सांप्रत सेनापती जवळ आहेत.

१ माहलोजी बावा हे दुसरे पुत्र च्यार जीवनराव जेष्ठ दुसरे मानसींगराव तिसरे मालोजी चवथे चंदोजी घोरपडे हे हिंदुस्थानी आहे या चौघास पुत्रसंतान आहेत ( हसुरुहेची ) येथें राहतात

१ पिराजी बावा तिसरे यास पुत्र गोविंदराव व आमृतराव हे ( गळतलेस ) सांप्रत आहेत

१ राघोजी बावा चवथे याचे नकल

१ पाचवे जयेराम बावा यास पुत्रसंतान नाही सा। संताजी घोरपडे सेनापती याचे रामचंद्रराव याचेपुत्र लक्ष्मणराव घेतले ते सांप्रत नवलीथल येथें आहेत.

५

शं. श्री. देव

# २१ इचलकरंजीकरांची वंशावळ

इचलकरंजीकर घोरपड्यांची वंशावळ आजपर्यंत कोठें च प्रसिद्ध झाली नसेल असें मला वाटत नाहीं, परंतु ती माझ्या पाहण्यांत आली नाहीं. त्यांच्या वंशावळीचा एक कागद मला चाफळखोऱ्यांत मिळाला. तो मोडी लिपींत असून जसाचा तसा च बाळबोधींत उतरून घेतलेला पुढें देत आहे. त्यावरून इचलकरंजीकरांची वंशावळ अशी मांडतां येते:—



याद्दी स्मरणार्थ नागे महादेव जोशी महणकर ता कुडाल सांवताची वाडी

१ नागे महादेव याणी संताजीराव घोरपडे याजपासी चाकरी करून पुत्र म्हणविले ते नारायणराव घोरपडे संताजीराव सेनापती याणी आपले सरंजाम देऊन का। इचालकरंजी येथे स्थापना केली त्याची वंशावळ

१ मूळ पुरुष नागे महादेव त्यास पुत्रसंतान नाही सबब गोत्र पुरुष याचा मुल दत्तक घेतला त्याचे नांव सदासीवराव त्यास पुढे पेशवे याणी सांचोटी गांव सरंजाम देऊन पुण्यात ठेविले वंश अलाहिदा आहे

१ व्यंकटराव नारायण नागे महादेव यानी दत्तक घेतले वर व्यंकटराव आवरस जाहले यानी बाळाजी विश्वनाथ पेशवे याची कन्या अनुबाई दिल्ही होती

१ नारायणराव व्यंकटेश हे आवरस

१ व्यंकटराव नारायण हे आवरस व यास पुत्रसंतान नाही सबब मूळ सदासिवराव नागे महादेव याचे दत्तक त्याचे पुत्र माधवराव याचा पुत्र दत्तक घेतला

१ नारायणराव व्यंकटेश हे दत्तक याम आवरस पुत्र उभयता जेष्ठ व्यंकटराव व कनिष्ठ केशवराव सांप्रत आहेत "

यांत व्यंकटरावांनी आपल्या चुलत चुलत भावाला दत्तक घेतलेले दिसते.

शंकर श्रीकृष्ण देव

---

## २२ रनाळें येथील शिलालेख

### शक १६६०

खानदेशांत नंदुरबार तालुक्यांत रनाळें म्हणून एक श्रीमंत गांव आहे. गांवाला लहानशी नदी आहे. गांवापासून जवळ च नदीकांठीं, पण प्रत्यक्ष पात्रांत नव्हे, असा एक जिवंत पाण्याचा झरा आहे त्याजवळ शंकराचें देवालय आहे. देवालयाच्या बाहेरच्या बाजूस भिंतींत खालील शिलालेख आहे:—

॥ श्रीगणेशायनमः ॥ षष्ठिभूप ॥
॥ मिते काळयुक्ते याम्यायने ॥
॥ दिने गणेशतीर्थकाशीशश्च ॥
॥ सार्द्ध चाकरोन्मुदा ॥ शुभं भवतु ॥

यावरून हें काशीशाचें देवालय व देवालयांजवळील तीर्थाचीं कुंडें शक १६६० तील आहेत, हें उघड आहे.

शंकर श्रीकृष्ण देव

## २३ सच्चिदानंदकृत अनुभवसार

हा ग्रंथ रा. राजवाडयांच्या 'कऱ्हाड' संग्रहांतील आहे. याचीं ४ प्रकरणें आहेत, व तीं फार स्पष्ट व आस्थेवाईकतेनें लिहिलेलीं आहेत.

ग्रंथीं सच्चिदानंदाचा अनुभव । हें सदानंद रुपेचें वैभव।
ज्यास पाहिजे ब्रम्हानुभव । तेणें चि विचारें अवलोकिजे ॥ ४५ ॥

यांत ग्रंथकार त्याचे गुरू, ग्रंथाचा उद्देश, ग्रंथीं अधिकार कोणास हें सर्व आलें आहे. यांत एक ओंवी महत्वाची आहे ती येथें देतों:-

ग्रंथीं सांगितले प्रकार आचरावे । अनुभवा न ये तरी रागें भरावें ।
उगें च मना येईल तें बोलावें । हे चतुरता असो ॥ ३७ ॥

या वरून ग्रंथ समग्र पाहून त्याप्रमाणें आचरण केल्यानंतर जर अनुभव आला नाहीं तर ग्रंथास बोल लावावा असें एक प्रकारें सच्चिदानंदांनीं आव्हान च दिलें आहे.

पहिले प्रकरणांत वैराग्य होऊन शिष्य गुरूची 'जन्ममृत्यू निराळा' करण्याबद्दल प्रार्थना करीत आहे. दुसरे प्रकरणीं ब्रह्मापासून अहंकारापावेतों उत्पत्ति सांगितली आहे; चतुर्देह, चार अवस्था, पांच कोश, यांचें विवरण निरसन हें तृतीय प्रकरण, आणि जीवब्रह्मैक्य हें चौथें प्रकरण, अशी रचना या ग्रंथाची आहे.

आतां हे सच्चिदानंद कोणते काळांत झाले तें पाहूं या ग्रंथांत एक विशेष महत्वाची ओवी आहे तिच्यावरून च कदाचित् काळ ठरवितां आला तर पाहूं.

ये विषयीं युक्ति प्रयुक्ति । चित्सुधा राजयोगादि ग्रंथीं ।
श्री वामन शेषें बहुधा युक्ति । श्री सच्चिदानंद रुपें बोलिलें ॥ ७ ॥

चित्सुधा, राजयोग, या ग्रंथांचे कर्ते वामन शक १५९५ मध्यें समाधिस्त झाले. त्यांचि मागें श्री हें उपपद लागण्यास एक शतकाची तरी अवधी लागावी, तेव्हां हे सच्चिदानंद १६३२ मध्यें 'आनंदप्रकाश' नामक ग्रंथ करणारे सदानंदाचे शिष्य असावेत अथवा शक १७४३ मध्यें समाधि घेतलेल्या म्हसवडच्या सदानंदाचे शिष्य असावेत. बहुधा दुसऱ्याचे.

गो. का. चांदोरकर

# २४ निरंजन माधवकृत चिद्रत्न



श्रीमत् भवगत्पूज्यपाद श्रीशंकराचार्य यांच्या तीन श्लोकांवर गद्यात्मक ही लहानशी टीका आहे. ही. रा. राजवाडे यांच्या संग्रहांत मिळाली. या ग्रंथाचा विशेष असा कांहीं नाहीं. भाषा शास्त्रीय आहे. या प्रकरणाचे शेवटीं आपले गुरूचें नांव ब्रह्मानंद असें यांनीं दिलें आहे.

गो. का. चांदोरकर

---

# २५ मरळसिद्धकृत निरंजनभेदु



मरळ सिद्धाचा दातारू । संसार निरसोनि जाला मुक्ते श्वरु ।
देही असोनि विदेह जाला योगेश्वरु । गुरुशिष्य समाहा दोन्ही ॥ ९० ॥

येकंदर ओंवी ९०. ही नव्वदावी ओवी. इच्यांत मरळसिद्ध हा शिष्य व मुक्तेश्वर हा गुरु असें उघड दिसतें. परंतु मुक्तेश्वर हें नामवाचक पद आहे किंवा स्थितिवाचक आहे याबद्दल या ओंवीवरून निर्णय होत नाहीं; म्हणून ग्रंथारंभींचे एका ओवीचा उल्लेख करतों.

शांति निवृत्ति क्षमा । हे तव सद्गुरूचीं महिमा । परिस लागल्या पालटे दैन्या । मरळसिद्ध संपन्न मुक्तेश्वराचेनि ॥ २० ॥

यावरून ' मुक्तेश्वर ' हे या मरळसिद्धांचे गुरु होते हें निश्चित आहे.

आतां हे मुक्तेश्वर कोणते ? हा प्रश्न राहतो च. श्री शाहुछत्रपतींचे गुरु एक मुक्तेश्वर होते व दुसरे प्रसिद्ध एकनाथांचे नातु गणलेले. मला वाटतें हे दुसरे मुक्तेश्वर म्हणजे नाथांचे नातु असावे. यास ग्रंथांत कांहीं पुरावा नाहीं, परंतु ओंवीचा अव्यवस्थितपणा जो या ग्रंथांत दिसतो हा १७ वे शतकांत नव्हता. या खेरीज या नव्वद ओवींत रूपकांची जी गर्दी उडवून दिली आहे ती भारतकार मुक्तेश्वरांचे शिष्यास च शोभते श्रीसमर्थांचे शिष्य जे दिनकर रामदासी यांनीं आपल्या ' स्वानुभवदिनकरांत ' योगाचा लय झाल्याचें लिहिलें आहे. या ग्रंथांत तर शिष्यास उपदेश करतांनां दक्षिणोत्तराभिमुख गुरुशिष्य, वज्रासन, कुंडलिनी, पश्चिमपंथ इत्यादि योगांतील विशिष्ट ( शब्दांचा ) स्थितीचा उल्लेख केला

आहे; यावरून हि हा ग्रंथ नाथांचे काळीं त्यांत असलेल्या मुकेश्वरांच्या शिष्याचा असणें अधिक संभवनीय आहे.

ग्रंथांत दशदेहाचें विवरण आहे. 'निरंजनभेदु' हें नांव कां दिलें आहे त्याचें विशेष कारण माझे लक्षांत येत नाहीं.

गो. का. चांदोरकर

---

## २६ शंकरदास ( पूर्णानंद ) कृत शिवपार्वतीपरिणय

श्री एकनाथांचें ' भावार्थ रामायण ' व ' रुक्मिणीस्वयंवर ' यांच्यांता सगुणनिर्गुणाचा अथवा ज्ञानउपासनेचा मिलाफ केलेला आहे हें सर्वश्रुत च आहे. पौराणिक कथाभाग घेऊन तो अध्यात्मपर लावण्याचें काम मराठींत प्रथम एकनाथांनीं केलें आहे अशी आजपर्यंत समजूत होती. त्या समजुतीस विघातक असा कांहीं पुरावा जरी स्पष्टतेनें देतां आला नाहीं तरी नाथांच्या समकालीन पूर्णानंदांनीं हि अशी ग्रंथरचना केलेली आहे हें आज या लेखानें दाखवीत आहें.

' शिवपार्वतीपरिणय' या काव्याचीं कांहीं पृष्ठें रा. राजवाड्यांच्या 'कऱ्हाड' च्या संग्रहांत मिळालीं. त्यावरून एक गोष्ट निश्चित होते कीं, एकाहून अधिक प्रकरणात्मक हें काव्य आहे. कारण, पहिलें पृष्ठ दुसऱ्या च एका प्रकरणाचें असून दुसरे पृष्ठांपासून तों २२ पृष्ठापावेतों एका भिन्न प्रकरणाचीं पृष्ठें आहेत. अशीं एकंदर हीं २२ पृष्ठें आहेत. आरंभ व शेवट दोन्हीं हि नाहींत. पहिलें पृष्ठ हें वर सांगितलेल्या इतर पृष्ठांनीं वर्णित भागाच्या पुढील भागाचें असावें, कारण हीं जीं २१ पृष्ठें आहेत त्यांत विवाह लागला असून ऐरणीपावेतों विवेचन आलें आहे. परंतु येथें अपूर्ण राहिलें आहे. पुढील ' अंबा शिपणें ' पहिले पृष्ठांत आहे. यावरून हीं २१ पृष्ठें प्रथम प्रसंगाचीं असून पहिलें पृष्ठ नंतरचें आहे; असें उघड होत आहे.

कवीनें स्वतःस शंकरदास म्हणविलें आहे परंतु त्यांचें नांव ' पूर्णानंद ' आहे हें उघड आहे.

श्रीसहजानंदमूर्ति ॥ अंबा ( देवी नव्हे तर अंबा शिंपणेसंबंधी पुढील वर्णन असल्यानें ' अंबा ' असें वर्णनाचें दर्शक म्हणून लिहिलें आहे ).

॥ अभंग ॥

प्रत्यक् चैतन्याचें । पूर्ण समाधान । उन्मनी निधान । योगियांचें ॥ १ ॥ अंबा सिंपी याला । पार्वतीवेल्हाळा । सद्गुरू रुपाला । प्रामीवरि ॥ धृ० ॥ मिळा·

ल्या शिवपदीं । उरला देह जरी । प्रारब्धाचे घरीं । प्रतिपाळ ॥२॥ अष्टमूर्ति ब्रह्म। जेव्हां अविनाश । अच्युत देहास । म्हणों ये कीं ॥ ३ ॥ सागरीं लहरी । तैसी देहापरी । उन्मनी नोवरी । सिंपिताहे ॥ ४ ॥ नोवरा मालोजी । मांडीवरी पद । उन्मनी विपाद । देउनीयां ॥ ५ ॥ सुरंगीं रंगली । कुंकुमाची रेखा । पूर्णानंद देखा । नाममात्र ॥ ६ ॥

यांत दोन गोष्टी उघड झाल्या, एक कवि स्वतः 'पूर्णानंद' असें आपलें नांव देतात व गुरु सहजानंदास नमन म्हणून त्यांचा प्रारंभीं उल्लेख करतात. ( यावरून एक शंका येते ती ही कीं पोथीचें अत्यंत जीर्ण स्वरूप व एक च एक अक्षर, शिवाय प्रथम सहजानंदांचा उल्लेख नमन नव्हे. तेव्हां पोथीचे लेखक हि कदाचित् पूर्णानंद स्वतः च असणें असंभवनीय नाहीं. ग्रंथ ' कऱ्हाडास ' मिळाला. यांचे शिष्य जे ' निजानंद ' ते कऱ्हाडीं च उपादिष्ट आहेत तेव्हां पूर्णानंदांचें वास्तव्य ' कऱ्हाडा'स असणें सहज आहे ). सहजानंद शिष्य पूर्णानंद हे रंगनाथ गुरुपरंपरेंतील आहेत हें सांगणें नको च.

यांनीं आणखी हि कित्येक ठिकाणीं आपले गुरूंचा उल्लेख केलेला आहे तो देतों म्हणजे केवळ आरंभींच्या उल्लेखावरून च गुरु निश्चित करण्याचें साहस केलेलें नाहीं असें दिसून येईल.

सहज शिवीं शिवपण नाहीं ॥ १३ ॥
सदीं सद्रूपणाचा भाव । पूर्ण चैतंनी पूर्ण स्वभाव ॥ १४ ॥
पूर्णानंदीं शिवशोभा ॥ २० ॥
सहज सद्गुरू भोजनकर्ता । भक्तपंक्ति समवेत ॥ ४३ ॥
पूर्णानंद पूर्ण धाले । आंचवले संसार ॥ ४४ ॥
दिसतें तितुकया शांती । सहजानंदीं सावधान ॥ ७२ ॥
मग सहजीं सहज निर्धारु । सहज सत्ता प्रकारु ॥ १०० ॥
जे पूर्णानंद भुवनेश्वरी । जे सहज शिवोल्हास लहरी ॥ ११६ ॥

पुरें. ' सहजीं सहज ' हें पदद्वय फार ठिकाणीं आलेलें आहे. असो. तेव्हां सहजानंद शिष्य पूर्णानंदकृत हें काव्य आहे. एकाहून अधिक प्रकरणात्मक आहे, ओवीशिवाय इतर वृत्तें या काव्यांत आहेत. इतक्या गोष्टी येथें सिद्ध होतात.

पूर्णानंदाची ' अवधूतगीता' शक १५३२ मध्यें झालेली आहे. शक १५०६ मध्यें श्रीज्ञानेश्वरी नाथांनीं उज्वलित केली. या अवधूत गीतेंत एक ओवी आहे.

या ग्रंथावरी । जो टीका मऱ्हाटी करी ।
तो जाणावा चातुरी । कर्ता दिगांबरु ॥ ९१ ॥

या ओवीशी नाथाची ( ? ) ओवी

श्रीज्ञानेश्वरा (री) पाठीं । ओवी करील जो मऱ्हाटी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥

ही नाथांची असल्यास ( तंजावर येथील प्रतींत शक १५१२ ची ही ओवी नाहीं म्हणतात ) ताडून पहाणें मौजेचें आहे. पूर्णानंद व एकनाथ दोघांचे हि अध्यात्मपर लाविलेले पौराणिक ग्रंथ व कांहीं ओवी हि सम यावरून काय अनुमान काढावयाचें ! पैठण कोठें ! कऱ्हाड कोठें ! इतकें अंतर असून हि जर समान विचार व समान शब्द ( ओवी ) एकमेकांचे ग्रंथांत उपलब्ध होतात तर परस्परांचे ग्रंथ इतके थोडे अवकाशांत व मुसलमानांच्या भर अमदानींत इतका विस्तार पावत होते हें आश्चर्य नव्हे काय ! यावरून सुचणाऱ्या विचारांचें दिग्दर्शन करण्याचें हें स्थल नसल्यानें येथें च थांबणें बरें.

'शिवपार्वती परिणयांत' खंडोबा हा शिवाचा अवतार व पांडुरंग हा विष्णूचा अवतार म्हणून वर्णन आहे. ओवी सरळ, सुबोध, आटपशीर व प्रसादयुक्त आहे.

गो. का. चांदोरकर

## २७ अंकसंकेत

रा. राजवाडे यांनीं नागपूरकडील आपला संग्रह मला पहाण्यास दिला. त्यांतील एका हस्तालिखित पोथीच्या २३२ व्या पानावर अंकसंकेत दिला आहे. हा अंकसंकेत पेशवाईत चालू असावा असें कदाचित् तत्कालीन पत्रावरून सिद्ध होईल. तो संकेत असाः—

| | | |
|---|---|---|
| १—क्ष | १२—छ | २२—न |
| २—अ | १३—ज | २३—प |
| ३—इ | १४—झ | २४—फ |
| ४—उ | १५—ट | २५—ब |
| ५—य | १६—ठ | २६—भ |
| ६—क | १७—ड | २७—म |
| ७—ख | १८—त | २८—र |
| ८—ग | १९—थ | २९—ल |
| ९—घ | २०—द | ३०—व |
| १०—च | २१—ध | ३१—श |
| | | ३२—ह |

यांत ११ या संख्येस अक्षर नाहीं. ' ढ ' या अक्षरास आंकडा नाहीं, तसें च ङ्, ञ्, ण, प, स, ळ, ज्ञ; हीं अक्षरें मुळीं च दिलीं नसून त्यांची व्यवस्था संकेतांत केलेली दिसत नाहीं. दीर्घ ईकार व उकार यांची हि व्यवस्था केलेली दिसत नाहीं. मराठी राजकीय पत्रांत अंकसंकेनांत लिहिलेलीं पत्रें कधीं कधीं आढळतात असें म्हणतात, तो च संकेत हा असेल कीं नाहीं तें निश्चित सांगणें कठीण आहे.

गो. का. चांदोरकर

---

## २८ विष्णुदास नामा

जसें जसें संशोधन विस्तृत प्रमाणावर होईल तशा तशा कित्येक दृढ परंतु भ्रामक कल्पना नाहींशा होतील; ' विष्णुदास नामा ' चें एक फार च ठोकळ असें उदाहरण याची सत्यता पटविणारें आहे.

नामा (नामदेव शिंपि)व विष्णुदास नामा हे एक च अशाबद्दल प्रथम कल्पना होती. रा. राजवाडे यांनीं विष्णुदास नामा यांचा शक देऊन त्यांस शक १५०० चे सुमारास आणलें.

मीं कपोताख्यानावरून त्यांचे गुरूंचें नांव ' रामभारथी ' आहे असें दाखविलें. आज आणखी एक महत्वाची गोष्ट ( यांचे संबंधीं ) आपणांपुढें ठेवित आहें.

नागपूरचा कांहीं संग्रह रा. राजवाडे यांनीं मला तपासण्यास सांगितला असतां त्यांतील एका जीर्ण बाडांत एके ठिकाणीं ' कामाबाईची आरति ' म्हणून एक प्रकरण सांपडलें हें विष्णुदास नामा यांचें आहे असें शेवटच्या उल्लेखावरून तर दिसतें च परंतु ते ' विप्र ' होते असें हि स्पष्ट होतें. हा उल्लेख अत्यंत महत्वाचा असल्यानें तो येथें देणें बरें:—

देवि कामाबाई पुरवी मनची मनकामना वो ।
न कळे तुझा पार हरिहर चतुरानना वो ।
सिणल्या वेद श्रुति भंगली शेषाची रसना वो ।
विप्र विष्णुदास लागे अंबेच्या चरणा वो ॥

या वरील उल्लेखावरून उघड होत आहे कीं हे विष्णुदास ' विप्र ' होते; नामदेव हे शिंपि होते म्हणून प्रचलित समजूत आहे. तेव्हां या दोन भिन्न व्यक्ति होत्या हें उघड आहे.

आणखी किंचित् प्रत्यंतर पुरावा पाहिजे असल्यास तो हि देतों.

विष्णुदास नामा यांनीं भारत केलें आहे हें सर्वश्रुत च आहे. त्यांतील चक्रव्यूह प्रकरणाच्या पांचव्या प्रसंगाच्या शेवटीं असें आहेः—

दृढभक्तींचा अंगिकारीं । जन्मोजन्मीं
वोळगावा श्रीहरी । न विसंभावा क्षण-
भरी । म्हणे पंडित विष्णुदासु ॥

ब्राह्मणावांचून इतरांस स्वतःला पंडित उपपद धारण करण्याचा अधिकार नाहीं. वरील विप्र पदावरून पंडित हा शब्द सूचक नाहीं असें कोण म्हणेल ?

गो. का. चांदोरकर

# २९ विश्वंभरनाथ

सांप्रदाय चार खरे—प्रकाश, स्वरूप, आनंद आणि चैतन्य—परंतु नाथसांप्रदायाचीं तत्वें या चारी सांप्रदायांत दृग्गोचर होतात. सकृद्दर्शनीं हे चार सांप्रदाय वैष्णव आहेत व नाथसांप्रदाय हा शैव आहे असें दिसतें; परंतु त्या त्या सांप्रदायांचे आदिगुरु कोण याचा विचार केला म्हणजे ते सर्व आदिनाथापासून च आहेत असें शेवटीं दृग्गोचर होतें. लक्ष्मी, ब्रह्मा, विष्णु व सनक हे या चार सांप्रदायांचे आदिगुरु आहेत; परंतु हे हि आदिनाथास गुरु म्हणून समजतात. तसें च नाथसांप्रदायाचा जो मंत्र आहे तो सप्रणव राममंत्र आहे म्हणून म्हणतात. तेव्हां नाथसांप्रदायाचीं तत्वें सर्वत्र उपलब्ध होतात असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या संप्रदायांतील सांप्रदायिकांनीं महाराष्ट्रावर केवढे उपकार करून ठेविले आहेत त्याचा निराळा उल्लेख करण्याचें कारण नाहीं.

असल्या या सर्वगामी विस्तृत व महत्वाच्या संप्रदायाचा इतिहास अत्यंत बोधप्रद व हृदयंगम होईल यांत संशय नाहीं. परंतु तो साग्र उपलब्ध होईल तेव्हां खरें.

या संप्रदायांतील विश्वंभरनाथ हे होते. यांनीं केलेल्या गोपीचंदाख्यानावरून यांचे गुरु नाथनिरंजन होते असें स्पष्ट दिसतें.

बिसंबरप्रभु नाथनिरंजन सबघटपूरन—बास जुः
वै रघुनाथ अनाथके नाथ प्रभु चरन कमल निजध्यास जु ॥

हे निरंजननाथ बहुतकरून श्रीसमर्थकालीन पंढरीस ज्यांचा वास बरा च काल झाला ते च होत असें वाटतें. कारण, मजजवळ जी गोपीचंद आख्यानाची पोथी आहे तिचा लेखनशक १७१९ पिंगल संवत्सर आहे, तेव्हां रचनाकाल अर्थात् पूर्वीचा असला पाहिजे, व शक १६ शेंत प्रसिद्ध असे दुसरे निरंजननाथ झालेले माझे ऐकिवांत नाहीं. निरंजन भट म्हणून कोणी होते अशी अंधुक कल्पना मला येते परंतु नाथसांप्रदायी निरंजननाथाखेरीज दुसरे कोणी असतीलसें वाटत नाहीं.

तेव्हां या विश्वंभरनाथांचा काल शक १६३० चा गणण्यास हरकत नाहीं.

गोपीचंदाख्यान यांत साधारणतः किनरीवाल्यांचे तोंडी जशीं पद्यें ऐकण्यास सांपडतात तशा तऱ्हेचीं पद्यें व कांहीं मराठी भाषेंतील, श्लोक, सवाया, पदें वगैरे अशा मिश्र पद्धतीचें हें आख्यान आहे. पद्यें बरीं आहेत. आख्यान सर्वश्रुत असल्यानें त्याचे पांच अध्याय आहेत याखेरीज कांहीं जास्त लिहिणें नको.

गो. का. चांदोरकर

## ३० हरीपुजदेव

शक १७४० चे पूर्वीचे मराठी काव्यग्रंथ व ग्रंथकार यांच्या संबंधीं जेवढी शक्य असेल तेवढी माहिती मिळविण्याचा प्रयत्न हल्लीं बराच चालला आहे. परंतु तो वऱ्हाडांत जितक्या विस्तृत प्रमाणावर व्हावयास पाहिजे तितका होत नाहीं व तो करण्यास तर पाहिजे आहे अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतका च कीं वऱ्हाडांत प्राकृत–मराठी ग्रंथकार बरेच होऊन गेले आहेत अशाबद्दलचा पुरावा थोडा थोडा अलीकडे उपलब्ध होत आहे, अशी स्थिति असतां तिकडील विद्वान् मंडळाचे सभासद होऊन संशोधनाचें काम अंगावर घेतील तर श्रमविभागाच्या दृष्टीनें काम फार झपाट्यानें होईल; व तसें झालें म्हणजे ७।८ शें वर्षांच्या वाङ्मयावर चांगला प्रकाश पडले. एकदेशी प्रयत्नावरून काढलेलीं प्रमेयें नेहमीं असत्य च असावयाचीं.

हे विचार सुचण्याचें कारण आज माझे समोर ' हरिपुजदेवांचें ' मराठींत लिहिलेलें कार्तिकमाहात्म्य होय. हा ग्रंथ रा. राजवाडे यांस मानभवांचें वऱ्हाडांतील प्रसिद्ध क्षेत्र जें ' ऋद्धपुर ' तेथें मिळाला व तो त्यांनीं मजकडे ठेवण्यास दिला.

या ग्रंथाचे एकंदर एकतीस अध्याय आहेत; परंतु मजजवळ असलेल्या पोथींत १० वे अध्यायापासून अखेरपावेतों च कायते २२ बावीस अध्याय आहेत.

ग्रंथ अपुरा असल्यानें खरोखर जितका विषाद व्हावयास पाहिजे तितका या ग्रंथाच्या अपुरेपणानें होत नाहीं कारण विशेष महत्वाचा–कवित्वाच दृष्टीनें, अथवा कर्त्याचे दृष्टीनें–हा ग्रंथ आहे असें मला वाटत नाहीं.

ग्रंथकर्त्यानें आपला वृत्तांत शेवटीं दिला आहे तो त्यांच्या च शब्दांत येथें दिलेला बरा वाटून तेवढा देतों. परंतु तत्पूर्वी या ग्रंथांत विषय किती आले आहेत त्यांची एक याद देऊन नंतर ग्रंथकारांचा वृत्तांत दिलेला बरा.

१:–गणेश सरस्वति व संत यांस नमन. हा अध्याय उपलब्ध झाला असतां तर कदाचित् संतांची नामावली व तिचेवरून कदाचित् हरिपुजदेवांचा संप्रदाय कळला असता.

२:–चंद्र देवशर्मा अख्यान

३:–चंद्र स्त्री गुणवती इनें कार्तिकव्रत करून आपल्या पतीचा उद्धार केला

४:–शंखासुरोत्पत्ति, वेदहरण

५:–मत्स्यावतार

६:–व्रत, स्नान शौचविधि कथन

७:–कार्तिकस्नान

८:–कार्तिकव्रती जे त्यांस वर्ज्यावर्ज्य

९:–व्रत उद्यापन ब्रह्मस्तवन, तुलसीपूजन

१० ते १८:–जालांधराख्यान, वृंदापतन

१९:–वनस्पति बीजारोपण

२०:–वामदेवाख्यान

२१:–कल्हा नामे भिक्षुक स्त्री तिचा उद्धार

२२:–शीळ सुशील, चहुल यांचा उद्धार

२३:–वामदेवांनीं शीळ–सुशीलावर केलेला अनुग्रह

२४:–जय–विजय आख्यान

२५:–कृष्णावेण्यासंगमीं महाबळेश्वरीं लिंगस्थापना

२६:–पापपुण्यनिर्णय

२७:–, २८:– } —धनेश्वराख्यान

२९:–कार्तिकस्नान उद्यापन

३०:–ज्येष्ठा कनिष्ठा अख्यान. उद्दालक संसारत्याग

३१:–दीपदानव्रत

अशा तऱ्हेचे विषय या ग्रंथांत आहेत. आतां ग्रंथ करण्याची स्फूर्ति ग्रंथकारास कशी झाली तें देतोंः—

उदासवृत्ति होऊन । अंगणांत तुळसीजवळ बैसोन ।
करीत होतों हरिचिंतन । तों अपूर्व वर्तलें ॥
सखारामभट ब्राह्मण । काखेसी पुस्तक घेऊन ॥
कार्तिकमहिमा वाखाणून । गोष्टी करी मजलागीं ॥
तेणें अंतरस्थ जाला जागृत । × × ×
मग त्यां हृदयीं ध्यान केलें । तों महात्मा ध्यानीं बोले ॥
हें चरित्र चांगलें । टीका करी यावरी ॥
मग मीं नमिले ब्राह्मणचरणा । × × ×

यांत ' महात्मा ' हा शब्द आला आहे. पोथी ऋद्धपूरची आहे तेव्हां ' महात्मानुयायी ' हरिपुजदेव ' मानभाव ' तर नव्हत ! असो. आतां गुरुपरंपरादि स्वतःच्या हकीकतीकडे वळूं.

काशिनाथपंत । दीक्षाग्रहणीं गुरु समर्थ ।
विद्याभ्यासीं हि सत्य । गिरमाजी उद्धव जांणीजे ॥
आतां वास्तव्य नगर अलंकावति पीठ सुंदर ।
सांप्रत म्हणति अळजपूर । वऱ्हाडप्रांत जाणावा ॥
तेथें पुजंभट ब्राह्मण । त्याची लक्ष्मीनामे स्त्री जाण ।
ते चि माता मजलागून । तेथें जन्मला हा देह ॥
या देहाचें नाम हरी ।

अशी हकीकत या हरीपंताची अथवा हरीपूजनाची आहे. याचा संप्रदाय कोण, गुरुपरंपरा कोणती, चरित्र काय व आणखी कांहीं ग्रंथ यांनीं केलेत कीं नाहीं व केले असल्यास त्यांचा शक कोणता वगैरेसंबंधीं सध्यां पूर्ण अज्ञान —मला तरी—आहे.

गो. का. चांदोरकर

## ३१ भागवतकार भास्कर

आजपावेतों ज्यांची नांवें भावतकार म्हणून प्रसिद्ध आहेत ते हेः—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ बहिरा जातवेद | ... | ... | ... | १० स्कंद |
| २ लोलिंबराज | ... | ... | ... | १० स्कंद |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ श्रीएकनाथ | ... | .. | .. | १० स्कंद<br>११ स्कंद |
| ४ रामानंद | ... | ... | ... | भागवत |
| ५ शिवकल्याण | ... | ... | ... | १० स्कंद |
| ६ रत्नाकर | ... | ... | ... | भागवत |
| ७ श्यामाराध्य | ... | ... | ... | ,, |
| ८ शिवरामस्वामी | ... | ... | ... | ११ स्कंद |
| ९ जयरामस्वामी (वडगांव) | | ... | ... | १० स्कंद |
| १० ज्योतिपंत महाभागवत | | ... | ... | भागवत |
| ११ माधवसुत | ... | ... | ... | १० स्कंद |
| १२ रघुनाथशेष | ... | ... | ... | १० स्कंद |
| १३ कृष्णयाज्ञवल्कि | ... | ... | ... | कथाकल्पतरु |

याशिवाय, श्रीनामदेवादि संतमंडळी, उद्धव, गोविंददास, गंभीरसुत, मुक्तेश्वर, मुरारी, यशवंत, वामन, विठ्ठल, यांनीं दशमांतील स्फुटप्रकरणावर अभंग, श्लोक, ओवी वगैरे केलेल्या आहेत.

व्यंकट कवीची वेदस्तुति हि उपलब्ध आहे. परंतु भागवत १० स्कंदावर टीका करणारे भास्कर हि एक आहेत हें आजपावेतों माहीत नव्हतें.

कन्नड येथील संग्रहांत दशमस्कंदावर भास्करांनीं केलेल्या टीकेचीं ८७ पृष्ठें मला मिळालीं. त्यांचा आरंभ २८ वे प्रकरणापासून आहे. यांत नंदाची व वरुणाची भेट झालेली आहे; व शेवट ६७ वे प्रकरणांत म्हणजे सत्यभामा, जांबवति यांच्या परिणयांत झालेला आहे.

आदि अंत उपलब्ध नसल्यानें भास्करांच्या चरित्रावर कांहीं च उजेड पडत नाहीं. तेव्हां भाषेवरून काल ठरविण्याचा प्रसंग येतो. यांत हीं जीं पृष्ठें उपलब्ध झालीं आहेत तीं दोन तऱ्हेचीं आहेत. एक जुनीं व दुसरीं आधुनिक व अत्यंत अशुद्ध, परंतु ही कांहीं मोठीशी अडचण नाहीं; कारण लेखन हें रचनेचे वेळीं किंवा नंतर च झालें पाहिजे, तेव्हां जीं जुनीं पत्रें आहेत त्यावरून काल कोणता ठरतो तो पाहूं.

कांहीं रूपें येथें देतों:—

मागुता स्वर्गौनी आणिला । येणें श्रीहरी ॥<br>
गोपि सेविलें कृष्णातें ॥<br>
चरविया मनोवृत्ति ध्यायिजे ॥<br>
मी गेला ॥

माझां मति ॥
गौलिये तिये ॥
सकळै वर्ते ।
जयाच्चिया प्रीतिसहित ।
तेयासि ।
म्हणौनि, पासौनु ।
नोवलति, तुझिया मोहरा,

इत्यादि शब्द व वाक्यप्रयोग, या पत्रांत आढळतात. त्यां च बरोबर 'आरूढ पतिता', 'विरहभ्रमिता' असे संस्कृत सामासिक शब्द हि दिसून येतात.

या भाषेवरून व संस्कृत सामासिक शब्दांवरून भास्कर हे श्रीएकनाथा-पूर्वी ५०।१०० वर्षें च झाले असावेत असें वाटतें म्हणजे यांचा काल १४५०–१५०० या सुमाराचा असावा असें अनुमान निघतें.

याखेरीज अधिक ग्रंथ उपलब्ध होतील तेव्हां निश्चित असें कांहीं तरी लिहितां येईल.

गो. का. चांदोरकर

## ३२ चौऱ्यांयशी सिद्ध

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्या पुण्यक्षेत्र आळंदीस—अलंकापुरीस—समाधि घेतली तेथें 'श्रीसिद्धेश्वरा' चें स्थान आहे हें बहुतेकांस माहित च आहे. श्रीसि-द्धेशांचे अभिमुख महाराजांनीं समाधि घेतली आहे तसे च या स्थानाविषयीं अशी एक आख्यायिका आहे कीं येथें महाराजांच्या समाधिभोंवति 'चौऱ्यायशी सिद्धांचा' मेळा आहे. हे चौऱ्यायशी सिद्ध कोण त्यांची एक यादि एका पत्रावर लिहिलेली मला पैठणास 'श्रीशिवदिनकेसरी' यांचे मठांत मिळाली. ती पुढें देत आहें.

या सिद्धनामावळीचें एक महत्व असें आहे कीं मीं जो ज्ञानेश्वर महाराजांचा 'योग-वासिष्ठ' ग्रंथ नुकता च प्रसिद्ध केला आहे त्यांत पहिले अध्यायांत सिद्धनामाव ळींत यांतील सिद्ध निर्दिष्ट केले आहेत. यावरून कांहीं जरी निश्चित होत नाहीं तरी सिद्धांचा निर्देश करणारे ग्रंथकार 'नाथपंथी' असावे व 'मानभावी' नसा-वेत एवढें अनुमान काढण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं.

गो का. चांदोरकर

श्री

आदि । उमा । मिन । चौरंगि । गोरखि । संति । तंतिलो । चामारि । इळु । लुया । मीळुलुया । डोंबी । सदासोरी । कंकाळीलो ॥ १ ॥ धृ ॥

मीळ गयालो । मीळ गयालो । सिद्ध बोळी प्रसिद्धि । जया स्मरतां होये सिद्धि । महा रस अनुपम्य रि धीलो ॥ छ ॥

वोंडी । कपाळी । गिरिवर । सागर । सर्वभक्षक । हनुमंत । दारिलो ॥ फोकीळ । मेंडुक । अनुभवी । सुतळी । निळ क्षांत । शब्द । वेवाळिलो ॥ २ ॥

मीकि । कुदळी । हाडी । जालांधरी । राउळ । धुधुः कारी लो ॥ मेदिनी । पंकज । घंटा । जेजत । गुंडम । राउळ । चौकीलो ॥ ३ ॥

निर्गुण । जलधों । चर्पटी । चंपक । ढेंकिन । तेली । कुंभारिलो ॥ भद्रिक । नखळी * । कंथई । दंडळी । डोळीलो ॥ ४ ॥

खडकी । नागार्जुन । कान । कनेरी । टेकीन । नाळी । साळीलो ॥ इंदु । चाटी । भाटी । दुखंडी । आदित्य । पाचळी । धोचीलों ॥ ५ ॥

कोकिनी । कांवळी । ढेकी । भाळी । टेटिणी । कुकरी । खुजिलो ॥ पास । विवर्जित । धामस । धोंन्नड । उन्मत्त । चुढिलो ॥ ६ ॥

चोंह्यासी सिद्धनाम स्तविलों । सद्गुरुबोध प्रकाशलो । आदिनाथ नाथी । मछींद्रनाथ पुना । श्रीगोरख गीति । गायिलों ॥ ७ ॥

हे चौऱ्यासी सिद्धनामावळि समाप्त

## ३२ मानसिंगाचें एक पद

हें पद आजपावेनों कोठें च छापलेलें नाहीं. फार गोड आहे म्हणून देतों. मानसिंग कोणता हें कळण्यास साधन नाहीं, तथापि श्रीशिवछत्रपतिसमकालीन असल्यास न कळे. नाथ-सांप्रदायी होता एवढें स्पष्ट च आहे.

श्री

राग ब्याहाग

बिगरी कोन सुधारे नाथबिन । बिगरी कोन सुधारे ॥ छा
बनिबनेका सब कुई साथी : बिगरी काम न आवे रे ॥
भरी सभामो लज्या राखी : दीनानाथ गुसाई रे ॥ १ ॥ बिगरी ॥

---

* येथें बहुधा भद्रि । कनखळी । अशीं नांवें असावींत.

करु बेलकी करु तुमरियां : सब तीरथ फिर आई रे ॥
गंगा न्हाई जमुना न्हाई : तोबि (बि)न गइ कडवाई रे ॥२॥ बिगरी ॥
दया धरमका ज्याला बनाया : समुद्रबीच तिर आया रे ॥
धमांधर्मी पार उतर गये : पापसोन (ब) डुबाई रे ॥३॥ बिगरी ॥
भली बुरी ये दोनो बहिनाः परापरीसो आई रे ॥
नाथ जलंदर मुद्रावालेः मानसिंग जस गाई रे ॥ ४ ॥ बिगरी ॥

गो. का. चांदोरकर.

## ३४ श्रीपतिदास

' गर्भगीता ' हें एक प्रकरण श्रीपतिदासांनीं लिहिलें आहे असा उल्लेख आढळतो. याखेरीज दुसरे प्रकरणाचें कर्तृत्व यांचेकडे दिलेलें आजपर्यंत माहीत नव्हतें.

मजजवळ तीन चार पृष्ठें---आरंभ ३ रे पृष्ठापासून व शेवट ६ वे पृष्ठावर--चोपड्याचे संग्रहांत सांपडलेलीं आहेत. त्या पृष्ठांवरून 'मनश्चंद्रबोध' याचे धर्तीवर मनाचें चरित्र श्रीपतिदासांनीं लिहिलें आहे असें दिसतें.

मजजवळ पृष्ठें थोडीं च असल्यानें व कविता सरस असल्यानें थोडासा लांबट उतारा देतों. हेतु इतका च कीं श्रीज्ञानेश्वरीचीझांक कितीशी त्यांत दिसते हें ऐकणारांस भावावें.

तरि जान्हवि भारि । त्रैलोकीचीं पातकें निवारि ॥
तयेसी न्हाणावें थिल्लरीं । हें केवि घडे ॥
या गगनासी निशाणी । वायोची मोट बांधावि कवणी ॥
नेत्रांत सामावे धरणी । हें केवि घडे ॥
हें घडे येके रीति । परि करूं नेये तुझी स्तुति ॥
या लागि गौन्ये पुडाति । नमन माझें ॥
× × × ×
तरि हे माझी वाग्वल्लि । वागवी आपुल्या रूपेतळीं ॥
तेणें फळैफळे रसाळी । प्रेम अक्षराचीं ॥
× × × ×
तुमचा संतांचा आंकिला । कवणा नव्हे चि पांगिला ॥
शरणांगत या बोला । अन्यथा नाहीं ॥
× × × ×
तव श्रोते म्हणति नको पाल्हाळ । वाग् चालवी कथा-रोळ ॥

१ कडू वेलाची २ तुंबडी

मनाचें चरित्र हळुहळु । साग पा ॥

× × × ×

येथुनि कथारस । श्रोतिं आइका सावकाश ॥
ऐसे बोले श्रीपतिदास । शरणांगत साधूचा ॥

गो. का. चांदोरकर

---

# ३५ कोकशास्त्र

( मराठी )

नुसत्या शब्दांच्या व्युत्पत्त्या दिल्या तर त्यांत हि ज्यांच्या मनाची समता ढळते, अशांच्या पुढें कोकशास्त्राचें विवेचन केलें तर मला वाटतें मला सभ्यतेच्या दापूंनून ते अपंक च करतील, परंतु असें मराठींत एक शास्त्र झालें आहे व तें येरच दिवसांपूर्वी मला उपलब्ध हि झालें आहे; आणि या ग्रंथांतील विषय कोणते तेवढेच दिल्यानें कदाचित् मोठासा प्रमाद होईल असें वाटत नाहीं. कारण ग्रंथकर्त्यानें पुराण, इतिहास, यांतील आधार आपल्या विषयास दिले आहेत.

याचें एकंदर ( ४ ) चार प्रकरणें असून ओवी संख्या ३०१ आणि पृष्ठें २१ आहेत. यांतील एक पृष्ठ मात्र गेलें आहे, बाकी ग्रंथ साग्र आहे. भाषा बरीच जुनी म्हणजे १३ शें १४ शेंतील आहे.

थोडासा मासला पहा

आतां भवानिया दिधला आयासु । मज जाला मतिप्रकाशु ॥
आतां आसने सांगिजेसु । श्रोतियांप्रति ॥

प्रश्निलें असें हि एक रूप यांत आलें आहे.

ग्रंथाचा शेवट असाः—

संतांचा सेवकु चराचरीं । शास्त्राची भरोवरी ॥
ग्रंथ करूनी क्षितिवरी । विस्तारला केंवि ॥
मी संतांचा दासु । मज असे आयासु ॥
सुरस सौरसु । भवानियेचा ॥
पूर्वी होता पांचाळ कुळीं । आतां जन्म विप्रकुळीं ॥
त्या खुणा जवळी । वर्तत असती ॥

जन्म तरी विप्रकुळीं । दृष्टांतु पहिला जवळीं ॥
जें कां सर्वा काळि आगळीं । भवानीं वरु दिधला ॥
विप्रकुळीं राजहंसु । पीडाराम (पिंडीराम ?) नाइकाचा पुत्रु ॥
विप्राचा दासु । सैब नावें ॥
म्हणौनि साही शास्त्रें सौरसु । जाणे हा नव्हे विरसु ॥
भर्वसा मानिजेसु । कोक कामेश्वरु म्हणे ॥
पुढील विस्तारु । सांगिजेल सविस्तरु ॥
तुज दिधला वरु । प्रसन्न मूर्ति ॥
दोन्ही कर जोडुनि म्हणतु । कवि असे विनवितु ॥
म्हणे येथुनि ग्रंथु । परिकरु असे ॥
माये जाला कामीक रसु । हा चि विस्तारिजेसु ॥
आई तुमचा सौरसु । त्यां निपजविला ॥
माये तुं माझी जननी । ग्रंथायासु दिधला मनीं ॥
म्हणौनि ग्रंथु मेदिनी । विस्तारला ॥
पीड्या येस नाईकाचा सुतु । रामनाइकाचा सेतु (?) ॥
निपजविला ग्रंथु । तुमचेनि आधारें ॥

उतारा लांब च लांब झाला खरा पण तसा देण्यांत दोन हेतु आहेत. एक भाषेचा थोडासा परिचय व्हावा म्हणजे त्यावरून काळाची थोडी कल्पना व्हावी; व दुसरा मला त्यांतील बऱ्याच ओवींचा अर्थ कळत नाहीं. ग्रंथकार कोण व त्याची जात द्विज कशी हें मला मोठें गूढ पडलें आहे.

पिडा नाईक, राम नाईक, येस नाईक, सैब, पांचाळकुळी, हे शब्द वाचले म्हणजे मनांत शंकांचें काहूर उठतें. दुसरें असे कीं.

पुढील विस्तारू । सांगिजेल सविस्तरू । असें म्हटलें खरें परंतु ग्रंथ तर तेथें च संपविला आहे.

तिसरें एक शंकेचें ठिकाण आहे तें असें:—

येथें एक 'कोक कामेश्वरू' हें नांव आलें आहे, तसेंच पहिल्या प्रसंगाच्या अखेर हि आलें आहे.

ऐसा हा जाला नरु । सांगितला चौ पुरुषाचा प्रकारू ॥
पुढा कोक कामेश्वरू । बोलैल तें ऐका ॥

तेव्हां कोककामेश्वरू ही पदवी तर नव्हे, पण ती दिली कोणी व कोणास ? कारण दुसरे प्रसंगाचे शेवटीं असे आहे.

म्हणे अनतु पीढा । विस्तारू सागा पुढा ॥
जाणत्यासी गुढा । पडों नें दी ॥
येथुनी संकळित । सांगों ग्रंथींचे भेद बहुत ॥
कसीक रसाचे सांगत । भेद अनंत पीढा ॥

तिसरे प्रसंगाचे शेवटीं असेंच आहे. म्हणे पीडा विप्रदास मातु ।

अशीं अनेक नामें आलीं आहेत. त्यांतून मला जो मार्ग सुचतो तो असा.

येस नाइकाचा सुत राम नाईकाचा नातू (!) जो पिडानाईक तो च अनंत व तो च कोककामेश्वरु. यानें कोकशास्त्राचे तीन प्रसंग लिहिले. चौथा अगर चौथ्याचा कांहीं भाग, याचा च सुत (!) सैब नांवाचा त्यानें रचून ग्रंथ पूर्ण केला. एरवीं या सैबाचें प्रयोजन काय हें कांहीं कळत नाहीं.

पण इतकें खरें कीं हे ग्रंथकार १३शे शतकांतील असावेत.

ग्रंथांतील विषयाचे उतारे देऊन त्यांच्यांशीं वाचकांचा परिचय करणें शक्य नसल्यानें नुसता विषयनिर्देश करतों.

प्रथम प्रसंगांत चार जातींच्या पुरुषांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. ते पुरुष अश्व गज खर व नर.

नंतर भिन्न पुरुषाचे व भिन्न स्त्रीचे ठायीं ऋतुपरत्वें भिन्न कालीं भिन्न स्थळीं मदनाचा प्रादुर्भाव होतो याचें विस्तृत वर्णन दिलें आहे.

यानंतर आसनांचा विस्तार केलेला आहे, निरनिराळ्या आसनांचें निरनिराळ्या प्रकृतींत भिन्न परिणाम दिले आहेत.

नंतर कांहीं वशीकरणप्रयोग देऊन स्त्रीपुरुषांत हार कोण खाईल याचें स्थूल दृष्ट्या आकलन करण्याचीं साधनें दिलीं आहेत.

आणि शेवटीं या संसारांत राहून स्त्रीपासून सुटले असे फार थोडे तेव्हां त्यांत मिळेल तेवढें सौख्य कां घेऊं नये इत्यादि सामान्य विचार देऊन ग्रंथाची समाप्ति केली आहे.

शक ११ शेंत आचार व शक १२ शेंत आणि नंतर ब्रह्मज्ञान यांचा इतका विस्तृत प्रवाह वाहत असतां हि मराठी ग्रंथकारांचें लक्ष्य या विषयाकडे हि होतें यावरून त्यांच्या बुद्धीची व्यापकता स्पष्ट नजरेस येते. मात्र इतकें खरें कीं ब्रह्मज्ञान व इतिहासपुराणादि ग्रंथसंभारांत असले ग्रंथ अगदीं तुरळक दिसतात व तसें असणें योग्य च आहे व होतें. हा च ग्रंथ जर शक ११ शें च्या तत्पूर्वीचा असता तर त्यावरून कांहीं निराळी च प्रमेयें निघालीं असतीं. असो.

ग्रंथ अखेर शेरा असा आहे.

क्रोधन नाम संवत्छरेः उत्तरायेणे वसंतमासेः क्रुस्ण पक्षेः नवमी तीथीः सोमवारेः तदीनी ग्रथ लिखिते नारायेणः संपुर्ण स्मासः

क्रोधन संवत्सर ११८७ पासून तों १७०७ पावेतों गणीत करून पाहिलें परंतु चैत्र महिन्याच्या वद्य पक्षाच्या नवमीस सोमवार केव्हां हि येत नाहीं. रविवार येतो मंगळवार येतो परंतु सोमवार येत नाहीं. परंतु त्यांत विशेष नाहीं कारण हा लेखनशक आहे.

गो. का. चांदोरकर

~~~~~~~~~~~~~~

## ३६ मेस्तक

र. राजवाडे यांनीं शके १८३३ व १८३४ मध्यें हेमाडपंती मेस्तक व मेस्तक पुस्तक अशीं सभेपुढें मांडलीं आहेत. या काळांत जमाखर्चांची फारशी जरूरी राहिली नाहीं, तशांत मेस्तकाचा व मोडीचा अत्यंत निकट संबंध आहे, तेव्हां दोन नमुने सभे पुढें असल्यावर तिसऱ्याची विशेष अवश्यकता नाहीं, तथापि आज आवश्यकता कोणत्या ग्रंथाची आहे व कोणत्या ग्रंथाची नाहीं हा उद्देश धरून सभा स्थापन झाली नाहीं. पूर्वकालीं कशाची आवश्यकता भासली हें पहाणें आहे. सध्याच्या काळाशीं एका दृष्टीनें फारच थोडा संबंध आपले संस्थेचा आहे. म्हणून आणखी एक मेस्तक आज आपले पुढें ठेवींत आहें.

मोडीचें व मेस्तकाचें साहचर्य आहे असें ग्रंथकार च म्हणतो

हे लिपि विद्या सरस्वति । अगा जाली कैसी प्राप्ति ॥
रुपा करून हेमाडपंतीं । जगा भातुकें दीधलें ॥
समसिराचें अक्षर । वळण घन वर्तुळाकार ॥
मोडि अभ्यासिति चतुर । प्राप्त विद्या श्रीमंता ॥

परंतु असें उतारे देण्या ऐवजीं आतां ग्रंथास च आरंभ करतों.

गो. का. चांदोरकर

श्री गणेशायनमः । आधिं नमन श्रीगणनाथा । गौरी हरा चिया सुता । चरणिं ठेउनिया मांथा । साष्टांग माझा प्रणिपात ॥ १ ॥ जमाखर्चाचे मेस्तक । व्यापारकृत्य सकळिक । भावगर्भ यथोक्त । ज्ञानी लेखक जाणाति ॥ २ ॥ कागदासि सिकस्त करावि । तीन रकाने रेखा वोढावि । त्यासि मुशद्दर म्हणावि ।
~~~~~~~~~~~~~~

जमा बेरिज ॥ ३ ॥ तया मुशद्र जमेस । नग बाब ऐन जीनस । सद्रिचिया आसनास । अनुक्रमे लिहिजे ॥ ४ ॥ नगदाचिया विस्तारा । होन रुपये मोहरा । फल्या हरिग वरा । प्रता वसतमि पुतळिया ॥ ५ ॥ खाळ खुर्दा नग दाणा । ऐन लिहिजे जिनसाना । ऐनाचा विस्तार जाणा । यथाविधि ॥ ६ । ऐसी किति ये कैली वजनी । रास चतुष्ट देवकुनी । सुमारी गजमोजनी । कापड दीति लिहिजे ॥ ७ ॥ इया मुसद्र जमाचिया आसना । द्वै हार्फा चिया गणना । प्रथमा हर्फ जाणावा । ऐनुल जमा ऐसी जाणा ॥ ८ ॥ दुसरी हर्फ हा आमल । दुबारा जमा येईल । याची विलार कळेल । ऐनुल जालीयावरी ॥ ९ ॥ हाके ऐनुल जमा सद्र । ठाव टाकिजे एक अक्षर । ऐन जीनस नगद सार । जमेप्रमाणे लिहिजे ॥ १० ॥ एक हार्फाचि विस्तार । दोन दफा हे साचार । एक दफा परगणे मजकूर । दुजी दफा ते विज्ञाति ॥ ११ ॥ पुजेवी जाफती चे विवरण । जिनस प्रमाण । येथें असिलें पाहिजे ॥ १२ ॥ दो अक्षराचा ठाव ठाकोनि । दफा ते परगणा घडताति ॥ १३ ॥ ये कर्ते बाकी बकाया । दुजा कर्ते साल मजकुरया । तिसरे अक्षर टाकुनिया । कर्ते बाकी बकाया लिहिजे ॥ १४ ॥ कर्ते बाकी सन वातसी सालेसी। साल गुद्स्ता लिहिजे । तपशीलिसि ॥ १५ ॥ या पृथक पृथक आसनी । मजुम बाकी लिहुनी । गावगन्ना तसलीमात जाणोनि । फाजील मुशारा लिहिजे ॥ १६ ॥ एक कर्ते आसन जाले । दुजे साल मजकुर आसन आले । तीनी अक्षरें ठाकून लिहिजे । कर्ते साल मजकूर जमा ॥ १७ ॥ कर्ते साल मजकूर आसनी । ऐन साल मजकूर । बीत लिहूनि । मुस्तकाचल बीत जाणोनि । साल गुद्स्ता नामुष खत ॥ १८ ॥ ऐन सालमजकुरासी । महा ( ला ? ) निहाय कमाविस । महाला निहायेच्या विस्तारास । दोन आसने येताति ॥ १९ ॥ ऐन महाल व शेरिया । ऐन महाल विस्तारिया । महसुल बाजे पटिया । बित मुशद्र हि आसन ॥ २० ॥ दोन बीत येक मुशद्र । दोन मुशद्र येक बीत । आसन आसन चढत । कर्ते आसन प्रमाण ॥ २१ ॥ आसन माल महसुल । तया बीत परगणे येतील । मुशद्र गांव घडेल । यथान्यायें ॥ २२ ॥ गावास जामाबंदीप्रमाणें । खोल सहक इनाम जाण । सद्दीलवार हि संपूर्ण । कुळरुजू पाहावें ॥ २३ ॥ वसुलास आधार यथार्थ । बागाईत जिराइत । मोहर्फा व बलुते । पांढरगण ही लिहिजे ॥ २४ ॥ जमा वसुल बाकी काढवि । गांवाची घडणी करावि । बेरीज प्रजाची साधावि । हे महसुली आसन ॥ २५ ॥ बाजे बठिया महल असति । मोहिगे जमानी म्हणति । बाजे पटिया महसुली जाउनी मिळति । ऐसे आसन महाला निहाय ॥ २६ ॥ ऐन महाल एक आसन । द्विधा दिवान शरिया जाण । नावा जिनस परिपूर्ण । शरिया लिहिति ॥ २७ ॥ दिवान शरीया ऐन माहाल । माहाला नीहाये म्हणी सकळ । यावरी कमावीस प्रबळ । विस्तार सकळ ऐकिजे ॥ २८ ॥ जकातीचे अगलग । मस्त्वा हुडा

उन्मा मार्ग । पैसा रुका यथासांग । निकाल म्हण न गळे ॥ २९ ॥ बैलाची भरताडी । भुस किराणा भरि आवडि । दींडे बांधोनि कापडि । जिनस पाहूनि हासल ॥ ३० ॥ मयत मवेसी गुन्हेगारी । मार्गी जात ( गात ) येरी गोरी । चोरु नेली निशाचरी । ते मार्गी सांपडेल ॥ ३१ ॥ भेटी घेतां गांवगन्ना । थोडा बहुत घांसदाणा । मावणुक नागवणे दफीना । सेरणी सांडाया बहु झाडे ॥ ३२ ॥ मासले बटा रसवाली । किफायत जिनसाना जाली । नंदी तुमडी गेली । ते सांपडली वस्तभाव ॥ ३३ ॥ जळचर उदरीचें । बीडालि गवचे । नाव टोकरा ताफीयाचे । नदी उतराया द्रव्य ॥ ३४ ॥ बद आमल कुळवंत । निपुत्रिक धनवंत । वतन कीजे अमानत । जे मागुन घेत कायांमुळे ॥ ३५ ॥ हुताना शराना । कमवजन नुकसान । केली पैदास्त जाणा । न पेरितां धान्य पिकलें जें ॥ ३६ ॥ देवयात्रा वेशानिका । लिंगधारण जवीस डाका । पाट करीयाचा टका । तस्करानें तस्कीम दिधली ॥ ३७ ॥ कोलाचा बाजार । प्रत्यकि बैसका जुपेदार । छावा सिंगोटि ठेवणे द्वार । बाजारी हसिल घेति ॥ ३८ ॥ ऐसी जाली कमावीस । जाउन मिळे माहालास । माहाल कमावीस । ऐन सालमजकूर घडतसे ॥ ३९ ॥ ऐन साले मजकुराची संगती । मस्तु कबील जाउनी मिळती कर्ते साल मजकुर घडाति । दोन्ही मिळोनिया ॥ ४० ॥ कर्ते सालमजकुर भांत । कर्जे बाकी सालगुदस्ता । हे दोन्ही येक दफात । परगणे मजकूर झडतीसी ॥४१॥ द्वैत,फात इजाफत । या ऐका वृत्तांत । आसन घालुन यथोक्त । विधिपूर्वक लिहिजे ॥ ४२ ॥ परसुभा पर महाल । पर किल्लाचे येईल । मोहसचियानें जे निघेलं । खावंद देईल रोजमुरा ॥ ४३ ॥ कर्ज दिल्हें तें घ्यावें । व्याज येईल स्वभावें । तया गिरिस्त म्हणावें । बाजगस्ति लिहिजे ॥४४॥ मुशारियाचें फाजील । सोतूवन ( सोतूवन ? ) गाई वसुल । खर्च पुडलिया येईल । मुबादले जमा ॥४५॥ हे येक दफातें इजाफाति । द्विधा परगणे मजकूर । दफाते हे दोन्ही हार्फ मिळाति । एक ऐनुल जमा ॥ ४६ ॥ येथुन हसिल अमल । तया विस्तार जाणवेल । खरेदी जिनस करितिल । धान्य कापड वगैरे ॥ ४७ ॥ नाना जिनस विकले । फरोखत अभिधान आलें । धान्य जानंति सेर बोले । कर्दुन हि लिहिजे ॥४८॥ या कर्दुनाचें लक्षण । मोहोरा रुपये होन । ऐसे इतुके देऊन । रुपये खुर्दा घेईजे ॥ ४९ ॥ रुपये देऊन मोहोरा घेणे । त्या नाव बस्तन म्हणणें । धान्य कांडणें दळणें गाळणें । त्या नांव दिमामेल ॥ ५० ॥ जिन सोगिर लोह नगारा । कर्दुन तीन भाग । कैलाचें वजन सांग । वजनाचे केल केले ॥ ५१ ॥ मापाचे वजन केले । धान्य मुबादला घेतले । रुजु हार्फे म्हणावे ॥ ५२ ॥ हार्फे हासिल आमल महिमा । द्विधा हार्फ ऐनुल जमा । हे दोन्ही एक मुश्दर जमा । सदरीची बेरीज ॥ ५३ ॥ मुश्दर जमाचे सदर । तया हर्फे दोन्ही विस्तार । हार्फे येकदफा तसारा । द्वै संख्या

जाणिजे ॥ ५४ ॥ येक दफातें कर्ते दोन्हि । दोन बीते कर्ते जाणुनि । द्वय मुश्-दर बीते म्हणोनि । यथान्याय लिहिजे ॥ ५५ ॥ हे जमेची मर्यादा । लेखिकी लिहिजे सुबुद्धा । ज्ञानी समजे अर्थ भेदा । सर्व विजयी जो ॥ ५६ ॥ हे लिपि विद्यानिधान । हेमाडपंता परिपूर्ण । तो स्वामी कृपाळुवा होऊन । सकळा जना तोषविलें ॥ ५७ ॥ बहुविद्या अभ्यास फार । जाणत्यामाजि धुरंधर । भाग्यलक्ष्मि अपार । कुळीं कुळपुत्र विजई ॥ ५८ ॥ पूर्वविद्या अपार । पंडित बोलिले साचार। तो चि अन्वय विस्तार । अर्थ विवरणें लिहिलें ॥ ५९ ॥ तुम्हां समर्था लेख-कासि । विज्ञापना माझि येसी । हरि आत्मज त्र्यंबकासि । चुकीसी क्षमा किजे ॥ ६० ॥

ऐका खर्चाचे सदर । रेखा वोढिजे मुश्दर । तया हर्फे दोन साचार । आ-सनें घडताति ॥६१॥ न तव ऐन जिनस । जमेप्रमाणें खर्चास । लिहिजे सदरास । यथान्याय अनुक्रमे ॥ ६२ ॥ येक अक्षराचा ठाव टाकुनि । हर्फे ऐनल खर्च लेहून । द्विधा हर्फे सर्फे अमल जाणून । हे विवरण पुढें ऐकिजे ॥ ६३ ॥ हार्फे ऐनल खर्चा विस्तार । दोन दफा निर्द्धार । व दफाते साधुन अक्षर । आसनि कामि करावि ॥ ६४ ॥ येक दफात रुजु दिवान । दुजी दफा ते मुजाफति जाण। मुजा-फतीचें लक्षण । पुढें बोले ॥ ६५ ॥ दिवान रुजूचे अंग भूत । द्वय संख्या आसन-कर्ते । नतृवर वानायक कर्ते । द्वयकर्ते महाल मजकूर ॥ ६६ ॥ कर्ते नतृवरवाना आसन । तया तीन अक्षरे ठाव टाकून । ऐसें आमन लेहून । तया विस्तार दोन्ही थील ॥ ६७ ॥ तहवल शाहीरुबित । ऐसा नत्सरवाना घडति । तया तह वेलिचा वृत्तांत । विस्तार बहुत ऐकिजे ॥ ६८ ॥ हजूर पाठविले विरसाल । कालगुजारी देतील । त्याचे व्याज एरल अवैसपे ॥ ६९ ॥ कारखाने अठरा । ऐका त्यांचा विस्तार । पागा हाति उंटे कोठि धटि करूनि ॥ ७० ॥ जामदार व पोते साल । आपदारोसि फराश साल । नौबती तेवज शाल । तोफा यंत्रे दारूचि ॥ ७१ ॥ सीले बाले हत्यारे । माणिक मोति जवाहिरे । लोहबंदी दीपाकारे । श्वापदे शिकार बहुतापरि ॥ ७२ ॥ कारखाने अठरा जाण । सैन्य लागोड संपूर्ण । किले इमारति जाण । सुन्हद् धानियाचे ॥ ७३ ॥ जाली तहवेली परिपूर्ण । ऐका शाहीर विवरण। त्या शाहीरुची देणे आसन । बदल मुशा हि ( रे ! ) खेरीज मुशाहिरा यास ॥७४॥ तया मुशाहिरा नावनविसी । ज्ञानी लेखी परियेसी । सबदार कारकुनासी सिलेदा-रासीहि लिहिजे ॥ ७५ ॥ पावलोक हाशम खाने थोर जया काम । बारगिर महावत कर्नाई धर्म सारवान उटणि आरूढे ॥७६॥ रेजेदार जामदार । भालदार सराफदार। जिलेदार आपदार नालबंद । सकळ दिवटे ॥ ७७ ॥ हिलाल दार्जे । कावाडी । मर्दाना । अगरगटि । छत्रिधरि । सेडेधरि । भोई धावति सिबिकेचे ॥ ७८ ॥

खासदार बाणदार । महालदार । रिकेबदार । गोलंदाज । फरासदार । सिकलगार । अफराद हे ॥७९॥ जासुद काठीचे पाइक । सकल जाणावे पावलोक । अश्वारूढ गजादिक । बैसणार सिबिकेचे ॥ ८० ॥ माहादर मह्रा पावति । बदल मुशारा हि तया म्हणति । खेरीज मुशाहिऱ्याची स्थिति । यथा निगुति सांगेन ॥ ८१ ॥ अन्नछत्र नंदादीप । नाण परोसि उमप । गोसावी जे कां करिति तप । छत्र अग्रारे वहुतेसि ॥ ८२ ॥ मुर्वतीचे सोयरे । धमाचे घाकार । शाही शिरे कागद कोरे । दारु गोळिया जाजम ॥८३॥ मुशार खेरीज द्यावे । तितुके खेरीज ल्याहावे । ऐसे शाहिरु जाणावे । हे एक आसन ॥ ८४ ॥ तद्वेळ शाहिरु नतवण वाण । येक कर्ते जालि जाणा । द्विधा कर्ते माहाल गणा । महाल मजकूर त्या नांव ॥ ८५ ॥ आसन कर्ते हालीचे । तया दोन बीते साच । एक बीत मुशाहिऱ्याचे । बाजे खर्चाचे द्विधा बीत ॥ ८६ ॥ ऐका मुशाहिऱ्याचे लोक । सरदार कारकुनादिक । सिपायी उमदे पावलोक । दारुक यंत्री हुकमेचे ॥ ८७ ॥ जासुद तहसीलदार । जवळील रि जमतदार । स्थलो स्थली कमाविसदार । सनदि चाकर लिहावे ॥ ८८ ॥ हा तपसिल मुशारियाचा । विस्तार बाज खर्चाचा । ऐकिजे ॥ ८९ ॥ जाजम सदरिचे । दिवटिया तेलाचे । शाही कागदाचे । झेंडा निशान हि लिहिजे ॥ ९० ॥ हे हि सनदेचे लिहावे । शाहणे जाणति स्वभावे । सनदे खेरीज न द्यावे । कोणास हि काहि ॥ ९१ ॥ बाजे खर्च मुशाहरा । हे कर्ते महाल मजकूर । हे शासन निर्द्धार । कर्ते परत्व रवा मेळविजे ॥ ९२ ॥ नक्तखरवाना महाल मजकूर । दिवना रुजु निर्द्धार । हकदफाते साचार । द्विधा दफाते मुजाफाति ॥ ९३ ॥ ऐन दफाते मीनकबेले । द्विधा आसन येतिल । ऐन दफाते घडेल । तया विस्तार ऐकिजे ॥ ९४ ॥ पर सुभा जे नटले । गांव लावणी सर्ज दिधले । येतले फेडिले २ त ( बीत ! ) कर्जे । दादना कर्ज दिधले ॥ ९५ ॥ पर किल्ला जे दिधले । कीं बंदीखानास खर्च पडला । द्रव्य तसिलमात ठेविले । दात कुल जाले न उगवे ते । ९६ ॥ हे ऐन मुजाफाति केवल । आता ऐकिजे मीन केवल । मुजरा द्यावा म्हणउन । घेतले गुदस्ता द्रव्य र प ति चे ( ! ) ॥ ९७ ॥ साल मजकुरी मुजरा दिजे । त्या नांव मीनकवळ म्हणिजे । हे दफादे मुफाति जाणिजे । ऐन जमीन केवळ ॥ ९८ ॥ प्रथम रुजु दिवान दफाते । यासिं मिळे दफाति मुजाफाति । हे दोन्ही ऐनल खर्च घडति । हे येक हार्फ जाणिजे ॥ ९९ ॥ द्विधा हर्फे सर्फे अमल । यासि रुजु हासिल अमल । तर्फ अमल विस्तारले । नाना परिचे आशन ॥ १०० ॥ जिनस खरेदी करावे । द्रव्य बेरीज ल्याहावे । पोटी जिन्नस घालावे । विचारुनिया । १०१ ॥ फरोसत्तव जीनस विकले । जिनस बेरीजेस आले । द्रव्य पोटी लिहिजे । यथान्याय ॥ १०२ ॥ इयावरी बस्तन । पोठी मोहोरा लिहून । तेरिजे रुपये जाण उन । बस्तन म्हणिजे या नावं ॥ १०३ ॥ सावध ऐकिजे कढून । रुपये पोटी लेहून । मोहोरा

बेरौज आणुन । कर्द्दन म्हणिजे या नावं ।। १०४।। वजनाचे कैल कैलाचें वज
मापार्चे वजन । मापी करूनियां ॥ १०५ ॥ ऐकिजे विस्तिमेल । पोटी कणिव
तांदुळ । तेल । बिरेजे गहु साळि तिळ । इया विस्तमेल जाणावे ।। १०६ ॥ रास
कर्द्दन यथासांग । जिनस खोगीर लोहनग । वळीवदोर चमांग । हे रासकर्द्दन
जाणावे॥१०७॥ हे हर्फ सर्फ अमल । यास ऐन खर्च मिळेल । हें हर्फावें न घडतिल
खर्च येक सदर॥१०८॥ येथून खर्च परिपूर्ण । लेखक ऐसी संपूर्ण । अर्थ अन्वय
पाहून । जमाखर्च लिहिजे ॥ १०९ ॥ रेखा मर्यादा समजिजे । दक्षिण वाम
तेजिजे । नीमिर काना टाकिजे । पेशानी समजिजे त्या नावं ॥ ११० ॥ ऐका
दक्षिणभागातें । विशानीहुन उतरते कोण्हि म्हणावे । त्यातें । हे खतावणी ऐसी
॥ १११ ॥ मधील दोर कानियासि बीत म्हणावें । त्यासि वायहुनि तिरकानि ।
यासि मुशदर म्हणावें ॥ ११२ ॥ मुशदर बितामधिल । ते कीरेदार बालिजेल ।
दोरकाने जिल्हे जिल्हे जील्ही । बीति लिहिजे ॥ ११३ ॥ वाम रकाना सोडिजे ।
पुढें तीन रकाने रेखा वोढिजे । हे न बोलिलि जे रेखा ऐसी ॥ ११४ ॥ रेखा
वोढिजे तीन गुणा । दक्षिणे लाविती चिगाणा । वामांगि तो सिगाणा । हे नाम
जाणिजे ॥ ११५ ॥ वामाहुनि तरे इरे बैस । चढतिया इसलास । लिहिजे । रकाना
बितास । चंयान्ही कोणा लिहिजे ॥ ११६ ॥ वामभागि न्यून करिता । ऐक अक्षर
हर्फे किता । द्वय अक्षर दफाता । त्रय अक्षरकर्ते ॥ १७ ॥ ऐसि जे आसने एकै
सदर । कोनी पिशानी मुशदर । हर्फ दफा कर्ते सार । बीत जिल्हे वरकाने
॥ १८ ॥ सीन बीगाणा चौगुणा । इरेबे इसलास करून जाणा ।
कि गुदार मध्यम आसना । सर्व संपूर्ण हि आसने ॥ १९ ॥ पाहूनि पीवळी बरू ।
कुष्मांड बीज टाक । अकार ती बोटाचा आधारू । धरून लिहिजे ॥ २० ॥
द्वादश आंगोळिया जाण । असावे बरुचे प्रमाण । शुभ्र सदर कागद जाण ।
उत्तम शाहि असावि ॥ २१ ॥ सम सिराचे अक्षर । वळण घन वर्तुळाकार। मोडि
अभ्यासिती चतुर । प्राप्त विद्या श्रीमंता ॥ २२ ॥ रोजकीर्द रोज नामा । सिलक
बाकी पोत जमा । हे बहुत कामा येति ।। २३ ॥ सिका सनद गौही कबज ।
लांच घेता धरि लाज । प्रबुद्ध लेखकासि समज । देता मोहजबा दुःख नाही ॥२४॥
हे लिपि विद्या सरस्वति । जगा जालि कैसि प्राप्ति । कृपा करुनि हेमाड पंति ।
जगा मातुकें दिधलें ।। हें ।। २५ ।। व्यापार करिति सकळ जन । जनास विद्या
ही रक्षण । जे अभ्यासिति परिपूर्ण । धन्य जगीं पुरुष ते ॥ २६ ॥ पूर्वं संस्कृ-
ताचा अर्थ । बोलत आले समर्थ । त्या गहनासा सूक्ष्म पदार्थ । यथा न्याय
सांगितला ।। २७ ।। नाना विद्या भूमंडळि । येकाहून येक आगलि । तेथें किमर्थ
हे बोलि । जेणे समजा तुम्ही ॥ २८ ॥ बीजाचा हा तरुवर । तैसा हा विस्तार ।
परि बीज तें सार । तद् न्याय ॥ २९ ॥ निपुण ज्ञानि भाविक । तुम्हा समर्थाचा

सेवक । हरि आत्मज त्र्यंबक । दासानुदास असे ॥ इतिश्री मेस्तक लेखक विद्यार्थी सल्पोय बीजवृक्ष न्यायसंपूर्ण मस्क शके १७११ सौम्य नामाब्दे वैशाख वद्य ३० समाप्तं रवौ सुमुहूर्ते शुभं भवतु कन्नडनिवासि विश्वनाथ लक्ष्मीधर शिवहरि सूनुना विनायकेन स्ववंश परंपरा पठनार्थं परोपकारार्थं संपादितं॥ यत् तत्तथास्तु ॥

# ३७ श्री सोपानदेवांचे हरिपाठ

रा. त्र्यंबक हरि आवटे यांनीं जें एक गाथापंचक म्हणून प्रसिद्ध केलें आहे त्यांतील पहिली गाथा श्रीज्ञानदेव महाराजांची आहे व तिच्यांत आरंभ श्री निवृत्तिनाथाच्या अभंगापासून करून अंत चांगदेव महाराजांच्या अभंगांत केला आहे. किंमतीच्या दृष्टीनें हें पंचक बहुजनसमाजास किती हि संग्राह्य असलें तरी आंतील विषयाकडे नजर दिली म्हणजे रा. आवटे यांचा प्रयत्न अत्यंत अपुरा आहे असें म्हणणें जरूर होतें. परंतु मागें एक वेळ मीं दर्शविल्याप्रमाणें पूर्ण असा प्रयत्न कोणत्या संतकवीच्या चरित्राचे बाबतींत झालेला आहे ? श्री ज्ञानेश्वरमहाराजांपासून तों श्री तुकाराम महाराजांपावेतों म्हणजे शक ११ शें तें शक १६०० पावेतों झालेल्या सर्व संतांच्या चरित्रांचे बाबतींत सर्व ग्रंथकारांनीं बहुशा गतानुगतिकत्व च स्वीकारलेलें दिसतें. चिकित्सक दृष्टीनें सत्य व भाव यांत निवड केलेली कोठें हि नजरेस पडत नाहीं.

रा. आवटे यांनीं या पंचकापैकीं १ ले गाथ्यांत श्रीनिवृत्ति, श्रीज्ञानेश, श्रीसोपान व श्रीमुक्तामाता आणि चांगदेव यांच्या संग्रह केलेल्या कवितेंत फक्त श्रीज्ञानेश्वरांचा च काय तो एक हरिपाठ दिला आहे. इतर संतांचा हरिपाठ आहे कीं नाहीं याबद्दल उल्लेख हि त्यांनीं केलेला नाहीं.

आज उपलब्ध असलेल्या माहितीवरून या सर्व संतश्रेष्ठांचा निदान एक एक तरी स्वतंत्र असा ' हरिपाठ ' असावा असें अनुमान काढण्यास हरकत दिसत नाहीं. ( ' हरिपाठ पंचक ' म्हणून एक लहानसें पुस्तक हि प्रसिद्ध झालें आहे. ) एका जुन्या मठांतील कागदपत्रें गळाठा म्हणून पडलेलीं चाळीत असतां त्यांत श्रीसोपान देवांच्या ' हरिपाठां'च्या दोन प्रती मला आढळल्या. दोहोंचा मेळ घालून पहातां त्या दोन्ही प्रती परस्परापासून अगदीं भिन्न आहेत असें दिसून आलें. तेव्हां एका हरिपाठाचें ऐवजीं श्रीसोपानदेवांनीं दोन ' हरिपाठ ' केले होते असें सहज च निष्पन्न होतें. या दोन प्रतींपैकीं एक प्रत अपूर्ण असून दुसरी पूर्ण

आहे. अपूर्ण प्रतींत १३ अभंग असून पुढच्याचीं दोनच चरणें आहेत. दुसऱ्यांत २३ अभंग असून हा ग्रंथ पूर्ण आहे.

या खेरीज आणखी कांहीं त्रुटित पत्रें सांपडलीं आहेत. त्यांतील पाठ या दोन प्रतींतील पाठाहून हि भिन्न आहेत. हा जरी एखादा स्वतंत्र 'हरिपाठ' नसला तरी पहिले दोन तर अगदीं स्वतंत्र आहेत हें उघड दिसतें. थोडा मासला देतों:—

## प्रत १ ली.

आरंभः— पृथ्वि सोवळी आकाश सोवळें । मन हे ओवळें अभक्ताचें ॥ १ ॥
ब्रह्म हें गोवळें न देखों वोवळें । असो खेळे मेळें येहि जनीं ॥ २ ॥
ब्रह्मांड पंढरी सोवळी हे खरी । तरिसि निर्धारी येक्या नामें ॥ ३ ॥
सोपान अखंड सोवळे प्रचंड । न बोले वितंड हरीविण ॥ ४ ॥ १ ॥

मध्यः— गोविंद माधव हा जप आमुचा । नाहीं प्रपंचाचा आम्हां लेशु ॥ १ ॥
गोविंद स्मरणे नित्यता धारणे । हरीनाम पठणें मोक्षमुक्ति ॥ २ ॥
न लगे चि तीर्थें । एक गोविंद चि पुरे । वेगि कृष्णधुरे । वोळगे सदा ॥३॥
सोपान सांगे गोविंद स्मरण । नित्यता पै ध्यान गोविंदाचे ॥ ४ ॥

अंतः— आवडीचे मार्गें प्रवृतीचे नेघे । नाम मार्गें निघे वेगी रया ॥ १ ॥
नाम परब्रह्म । नाम परब्रह्म । नित्य राम राम जपिजसु ॥ २ ॥
अंतरीच्या सुखें बाहेरील्या वेशे । परब्रह्म सुखे जपतसे ॥ ३ ॥
सोपान निवांत रामराम मुखांत । नेणें दुजी मात हरीवीण ॥ ४ ॥

## प्रत २ री.

आरंभः— या जनार्दना पाठे । जाईजे वैकुंठ । हरीनाम गोमटे मुखीं घेई ॥ १ ॥
वायांचि तुं भ्रमसि । कां रे गुणरासि । वेगीं केशवासी । भजत जाये ॥२॥
शरीर पोसिसी । काचाडे उपसीसी । हे नये कामासी । अंतीं तुज ॥३॥
सोपान सांगे मातु । ऐके तुं दृष्टांतु । हरी हा मुखांतु । जपे वेगीं ॥ ४ ।

मध्यः— कां करिसी हव्यास । व्यर्थ हे टवाळ । सकळ माया जाळ । भजन नव्हे ॥१॥
करी ब्रह्मार्पण । हेतु मन हारी । उद्धरसी लोकरी । नाममंत्रें ॥ २ ॥
अंतीचिये वेळे । सांडितील तुज । परि न म्हणती काज । तरी ब्रह्म होये ॥३॥
सोपान म्हणे । हा मार्ग सोपा न । सकळ ब्रह्मार्पण । आम्हां करी ॥४॥

अंतः— मन आधि मुरडी । वासना ते खंडीं । विठ्ठल ब्रह्मांडीं । येक आहे ॥ १ ॥
मन हें सोविलें । शुचि तुं करी । तुज निरंतरी । हरीपाये ॥ २ ॥
विवेक वैराग्य । ज्ञानाचे पै भाग्य । सोविळा आरोग्य । हरी देखा ॥ ३ ॥
सोपान म्हणे । मी सलगीचा सोविळा । नित्य वेळोवेळा । स्मरे हरी ॥४॥

यावर दिलेल्या विवेचनावरून येवढें ध्यानांत येईल कीं, या संतांच्या बाब-तींत अद्याप संशोधनाच्या द्वाराशीं हि आपण गेलों आहों कीं नाहीं हें अनिश्चित आहे तेव्हां त्यांच्या चरित्रलेखनाचा उपक्रम एव्हांशींच कोणी करणें हें साहस होईल.

यां तील तेरा अभंगाचा अपूर्ण असा जो 'हरिपाठ' आहे त्यांतील १२ अभंग रा. आवट्यांनीं 'उपदेश' या सदराखालीं दिले आहेत. एक अभंग नवीन आहे.

गो. का. चांदोरकर

---

## ३८ कान्हो-त्रिमलदास

(शक १३५०)

खानदेशांत एका गांवीं शोध करीत असतां 'पाताळ कांड' या नांवाचें एक प्रकरण सांपडलें. या प्रकरणाचीं एकंदर पृष्ठें ५८ असून ओवी संख्या ९७१ आहे. ग्रंथ 'सके १६२६ तारुन (तारण) नाम संवछरे आडा (आषाढ ?) सुद १५ घटिका ८ ते दीवसी संपुर्न हस्ता अक्षेर वीप्र म × × × सुमाउजी' या दिवशीं व या विप्राच्या हस्ताक्षरें लिहिला गेलेला आहे.

'पाताळ कांडांत' रामकथा वर्णन केलेली आहे. या वरून व आंतील संदर्भावरून हा श्रीमद्रामायणाचा एक भाग आहे यांत संशय नाहीं. इंद्रजिताच्या मरणानंतर सुलोचना इनें सती जाण्यापूर्वीं आपले उदरीं असलेला गर्भ सागरांत टाकला व तो 'गिल गिल' आणि 'शाशि' या दोन मत्स्यांनीं गिळला आणि त्या-पासून 'पाताळ केतु' व 'आलोट केतु' असे दोन पुत्र उत्पन्न झाले. त्यांनीं श्रीरामसंस्थापित बिभीषणास हांकून देऊन लंकेचें राज्य बळकाविलें. पुढें इंद्र, ब्रह्मा, महेश, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न आणि लवांकुश यांच्याशीं त्यांचा समर होऊन त्यांत पाताळकेतु व अलोटकेतु यांचा जय झालेला आहे. शेवटीं श्रीरामाची व त्यांची गांठ पडून शत्रुघ्नानें-ज्याप्रमाणें श्रीकृष्णसूचनेनें भीमानें जरासंधाचा वध केला-त्याप्रमाणें श्रीरामाच्या सूचनेनें पाताळकेतूचा वध केला आहे; आणि श्रीरामानें जो एक बाण सोडला तो असह्य होऊन अलोटकेतु पराङ्मुख होऊन जो पळत सुटला तो अद्याप आकाशांत ध्रुवास प्रदक्षिणा घालीत आहे व श्रीराम-बाण त्याचे मागें आहे; बाणास श्रीरामाची आज्ञा कीं 'अलोटकेतु' सन्मुख झाला कीं त्याचे ललाटाचा वेध त्यानें करावा. वैऱ्यांचा पराभव करून श्रीराम बिभीषणास पुनः लंकापति करून अयोध्येस परत आले.

हा असा थोडक्यांत कथा भाग आहे.

नवरस नारायणाचे भारतांतर्गत जसें शल्यपर्व विचित्र कथाभागाचें आहे तसें ' कान्हा ' चें हें रामायणगत ' पाताळकांड ' आहे. नारायणानें आपले कथेस पद्मपुराणाचा आधार आहे म्हणून दिलें आहे तसा कान्हानें मात्र कोठें हि दिलेला नाहीं. या कथेचें मूळ कशांत आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. श्री वाल्मिकी अथवा एकनाथी रामायणांत ही कथा नाहीं असें स्मरतें. जशी कान्होची तशी च नवरस नारायणाची भाषा १४ शें शकांतील भासते. कान्होची मला या दोहोंत अधिक जुनी वाटते. नारायणानें श्रीकृष्णास मंत्रविद्येत प्रवीण केलें आहे, कारण दग्ध झालेल्या भीमास त्यानें नुसत्या मंत्रित विभूतीनें सजीव केलें आहे; कान्होनें विष्णूस जंगम बनविलें आहे.

मग काये करी तो विष्णु । जंगम वेश धरूनी । ५ X ५१

या अंतर्गत रचनेवरून श्री एकनाथापूर्वी व श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या नंतर म्हणजे या तीनशें वर्षांत केव्हां तरी कान्हो त्रिमलदास झाले आहेत.

पान ४१ वर शिक्का हा शब्द आलेला आहे, हा शब्द फारशी असल्यानें शक १३ शें पासून शक १५ शें चे आरंभा पावेतों ही रचना झाली असली पाहिजे हें उघड आहे.

शक १४०० मधील महालिंगदास यानें आपल्या विक्रमबत्तिशींत ९६ कुळींचे राजे यांचा उल्लेख केलेला आहे. तसेंच युद्धांत स्थैर्य व प्रजापालन यांचा हि त्यानें उल्लेख केलेला आहे. कान्हानें हि शाहाण्णव कुळींचे राजांचा उल्लेख केला आहे.

तसेंच

विद्यांमाजि सुविद्या । धनुर्विद्या ॥
परद्रव्य आणि परनारी : मंत्रभेदु न विचारीः
जो प्रजेचें पीडन करी : समवादें ॥
इत्यादि तत्कालानुसार उद्गार काढले आहेत.

साउंमा, पांखरवोडे, असमसाहास, भाउवा ( भावे या संशोधनाचें रूप ), अवघवे (अवघे) इत्यादि पुरातन व चमत्कारिक रूपें या प्रकरणांत पहाण्यास सांपडतात. श्रीज्ञानेश्वरींचे भाषेची किंचित् झांक या रचनेंत आहे.

राहोमुपे (खीं ? संस्कृतरूप) सांपडलीः जैसी चंद्रकळा झांकोळलीः
तैसी कुमारी बाळी : दीसत असे ॥
ना तरि पतंगाचिया पडिभरा : माजी दीपसिखा पडलिया सुंदराः
किं महा मोहाचिया अंधकारा : आत्मज्योति ॥

म्हणौनि, निघौनिया, सोखौनि, हीं रूपें जरी आढळतात तरी ही रचना १३ शें पूर्वीची नाहीं हें हि तींतील इतर रूपांवरून च सिद्ध होत आहे.

वर दिलेल्या एकंदर विवेचनावरून 'कान्हो' हे नवरस नारायण व महालिंगदास यांच्या किंचित् पूर्वी झाले असावे असें मला वाटतें. आतां त्यांच्या कालाविषयीं निश्चय काय होतो तो पाहूं.

आतां नमीन श्रीगुरू : ज्यानें ठेविला मस्तकीं अभयंकरू :
पाषाणासी अंकरू : आणिला जेणें ॥
कृपा यैसी तयाची : भ्रांति फिटली संवसाराची :
गोडी परब्रह्माची : दाखविली तेणें ॥
**पिला पाठकु संताचा दासु : जया वडवाळसिद्धाचा उपदेशु :**
**तेण मतिप्रकाशु : दिधला मज ॥**
\+ \+ \+ \+
**तो आमचा तारु : वडवाळसिद्ध त्याचा आज्ञागुरु :**
**तेणें बुडतां भवसागरु : उतरले आम्हासी ॥**

यावरून गुरू परंपरा अशीः—

**वडवाळ सिद्ध नागेश**
|
पिला पाठक
|
त्रिमल
|
कान्हो.

अथवा

वडवाळ सिद्धनागेश
|
**पिला पाठक**
|
त्रिमलदास — कान्हो. (पाठक ? ).

तेव्हां पिला पाठकाचे प्रशिष्य अथवा शिष्य कान्हो होते यांत संशय नाहीं; व कदाचित् ते पाठकाचे वंशज हि असतील, म्हणजे ते स्वतः पाठककुलोत्पन्न हि असतील. श्रीज्ञानेश्वर महाराजांचे समकालीन पाठक घराणें होतें व तें नाथसांप्रदायी होतें हें आपण मानतों, हे कान्हो ( पाठक ? ) हि नाथसांप्रदायी होते हें उघड दिसत आहे. आतां वडवाळ सिद्ध नागेश यांचा काल शक १२९० — १३४० हा सध्यां गणतात. तेव्हां कान्हो ( पाठक ? ) यांचा काल शक १३५० अगर १३८० चा असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं.

तेव्हां एक प्रश्न उत्पन्न होतो तो असाः—

शक १८३२ च्या ( भा. इ. सं. मंडळाच्या ) अहवालांत पान ७२ वर रा. राजवाडे यांनीं केंडूरकर पाठकांचा वंश दिला आहे. तोः—

कान्हो–१२१२
|
हरिपाठक
|
नामापाठक १३००

कान्हा पाठक हे श्री ज्ञानेश्वर समकालीन, म्हणजे शक १२१२ तील, असें गृहीत धरलें तर प्रस्तुतचे पिलापाठकाचे शिष्य अथवा प्रशिष्य कान्हो ( पाठक ? ) हे पाठक च असल्यास, व बहुधा ते पाठक असावेत असें मला वाटतें, ते प्रथमच्या कान्होहून भिन्न असावेत. परंतु दोन कान्हो होते. असा उल्लेख कोठें नाहीं. तसें च कान्हो पाठक हे श्री ज्ञानेश्वर समकालीन होते हें कशावरून ? या प्रश्नाचा निर्णय अद्याप निःसंशयतेनें झालासें मला माहित नाहीं.

'वडवाळ सिद्ध नागेश' यांच्या 'संकट हरिणी' ग्रंथावरून शक १३१३ मध्यें ते हयात होते असें रा. देवांच्या लेखावरून दिसतें;* कारण तो त्यांचा ग्रंथ तेव्हां संपला आहे. याच वडवाळांचें शिष्य पिलोबा पाठक व त्यांचे शिष्य अथवा प्रशिष्य ( चिरंजीव अथवा नातु ) कान्होबा. तेव्हां १३ व १४ शें शकांतलि हे असणें च निश्चित होते. तसेंच त्यांच्या प्रस्तुतच्या ग्रंथांत येणाऱ्या फारशी शब्दांवरून हि लें च सिद्ध होतें, तेव्हां श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या समकालीन कान्हो पाठक होते असें जों पावेतों निर्णित नाहीं तों पावेतों ते शक १३ शें नंतर असणें अधिक संभवनीय आहे. ( येथें हे कान्हो 'पाठक' होतें. असें मी गृहीत धरलें आहे हें विसरलों नाहीं ). असो. निश्चित असें सध्यां कांहीं च नाहीं. या च प्रश्नास दुसरी एक बाजू आहे ती अशीः—

शक १८३५ चे वार्षिकइतिवृत्तांत रा. देवांनीं वडवाळ सिद्धनागनाथ, यावर एक टिपण दिलें आहे. त्यांत त्यांनीं–संकट हरणी शिवग्रंथाचे शेवटीं जो शेरा दिला आहे व ज्याचे आधारानें मी वर दिलेलें ( प्रश्न विषयक ) विवेचन केलें आहे तो शेरा असा आहेः—

मिती मार्गेश्वर वद्य बीज । गुरुवारीं लिहिला सहज ।
लिहितां स्वात्मकार्य माझें । करी अज्ञाना ज्ञानसिद्धि ॥

शके तेरासे तेरा १३१३।

( शके १३१३ चे मार्गशीर्ष वद्य २ स गुरुवार येतो ).

या ओवीचे अर्थावरून 'संकटहरणी शिवग्रंथा'चा रचनाकाल च शक १३१३ असावा असें वाटत नाहीं. विशेषतः 'लिहिला' आणि 'लिहितां स्वात्मकार्य' या शब्दांवरून तो लेखनशक असावा, असें विशेष तऱ्हेनें मनावर

* शके १८३५ वार्षिकइतिवृत्त पृष्ठ ४० पहा.

बिंबतें, आणि तसें जर असेल तर मग 'रचनाकाल' तत्पूर्वीं जावा. तसें च ज्या ग्रंथाचा लेखन शक १३१३ असून नुसत्या त्याच्या लेखनानें च 'अज्ञानासी ज्ञानप्राप्ति व्हावी' इतकी त्या ग्रंथाची योग्यता भासूं लागण्यास एक शतक अगर त्याहून हि अधिक काल जाणें अशक्य नाहीं. तेव्हां वर दिलेला जर रचना काल नसेल तर मग पाठकांची परंपरा अशीः---

वडवाळ सिद्ध नागेश
|
पिला पाठक
|
त्रिमल पाठक (!)
|
कान्हो पाठक (!) १२१२
|
हरि पाठक.
|
नामा पाठक.

आणि श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे कान्हो पाठक हे समकालीन होते असें म्हणणें हि अयुक्त होत नाहीं.

तेव्हां संशोधकापुढें हा एक प्रश्न च आहे म्हणावयाचा.

गो. का. चांदोरकर

## ३९ शिवराम स्वामींचें अष्टावक्र

रा. देव यांनीं आपल्या तंजावर येथील श्रीसरस्वतिमहालांतील ग्रंथसंग्रह या लेखांत शिवराम स्वामींच्या अष्टावक्र* या ग्रंथाचा उल्लेख केलेला आहे. त्या तेथें अंत दिला आहे तो असाः---

हा ग्रंथ तीशावरि जाण दोनी
श्लोकाप्रति श्लोक चि देशवाणी ।
श्रीनाथदेवा वदवि सुखाचा ।
दयाळ राजा शिवरामजींचा ॥ १७ ॥

---

* शके १८३५ वार्षिकइतिवृत्त पृष्ठ ८ पहा.

| | | |
|---|---|---|
| (६) २×४३ | वंयत्वें | वैयत्वें |
| (७) २×४४ | वंदनासि | वंदित्यासिं |
| (८) २×५३ | स्वाम्निं | स्वामि |
| (९) २×५५ | सख्याची | सेव्याची |
| (१०) | रूप | आदरू |
| (११) २×५७ | नाहींपणाची | आहेपणाची |
| (१३) २×६१ | होतु | नो होतु |
| (१२) २×५८ | पूर्णते तरि आधारू | पूर्ण तरी आंधारू |
| (१४) ४×१६ | शिंपे | वासिपे |
| (१५) ४×३२ | न असावेया | असावेया |
| (१८) ५×५ | उणी | गुणी |
| (१९) ४×४३ | न शिवतीं | नाशिवंत |
| | इत्यादि | इत्यादि |

सहजानंदांनीं 'ज्ञानप्रदीप' हा ग्रंथ प्राकृतांत केला आहे तशींच यांचे नांवांचीं बरींच प्राकृत पदें हि आहेत अशी माझी समजूत आहे.

तेव्हां श्रीमुकुंद राजाप्रमाणें प्राकृत रचनाकार सहजानंद यांनीं संस्कृत रचना केली हें लक्षांत ठेविलें पाहिजे. एक मात्र निर्णय आधीं झाला पाहिजे तो हा कीं रंगनाथांचे पणजे गुरु–परात्परगुरु—जे सहजानंद ते च हे आहेत कीं नाहीं. या प्रश्नाचा निर्णय करणें यांच्या बऱ्याचशा ग्रंथांची उपलब्धि झाल्यावांचून होणें नाहीं.

सहजानंदींत यांनीं जी गुरुपरंपरा दिली आहे ती अशीः—

"श्रीमान्समस्तजगदानंदतुंदिल आदिगुरुः शिवादिनाथ तस्य मत्स्येंद्रनाथ स्ततो मेनीनाथ स्तस्य स्वयंप्रकाश इति शिष्यतिलकोऽभूत् तस्य च विमलानंदनाथ स्तस्य श्रीसदानंद नामा तस्य श्री मल्ललितानंद स्तस्य शिष्येण मया सहजानंदेन रचितेयं व्याख्यानुभवामृतमयी सहजानंदीति" इत्यादि

या परंपरेंत व वर दिलेली पूर्णानंदांनीं आपल्या गुरूची–म्हणजे आपली–दिलेली परंपरा यांत बरेंच अंतर आहे. असो.

ग्रंथ संबंध संस्कृत गद्यांत आहे. मात्र आरंभीं नमनाचे ३ तीन व अंतींचे धन्यवादाचे ७ असे १० श्लोक आणि प्रत्येक प्रकरणाचे आरंभीं प्रकरण विषय-

दर्शक एक एक असे श्लोक आहेत. आदि अंतींचे फार गोड असल्यानें ते येथें देतों. म्हणजे ग्रंथाचे आदि अंत हि कळतील:--

श्रीज्ञानेश्वरचरणकमलेभ्यो नमः ॥

श्रीमन्निवृत्तिचंद्रं रूपासुधाब्धिं नमामि गुर्विंद्रम् ।
यस्मादृपद्मसंगात्स्वांतं शिष्येंदुहंसतां याति ॥
ललितानंदनामानं नत्वा श्रीगुरुपुंगवम् ।
अनुभवामृतव्याख्यां कुर्वे सज्जनतोषिणीम् ॥
रसिकामात्रुका देवा श्चिदव्य्यनुभवामृतम् ।
भजंते नैव दैतेयाः प्रपंचज्ञानगर्दभाः ॥

' गर्दभ ' शब्दावर थांबणें बरें.

अंतः--

धन्योहं धन्योहं नित्यसदानंद मात्र पूर्णोहं ।
उत्तीर्णः श्रीगुरुतो नोत्तीर्ण तत्सतांपदाब्जरजः ॥
किमभाणि गौरवं तत्कियदिति नोवेद्मि किंतु मत्तोस्मि ( ? ) ।
तृप्तो स्ति किं परागे भ्रमरो हंसश्च मुक्ति मौक्तिकतः ॥ २ ॥
भो नाथ दीनबंधो सत्यज्ञानामृतापगा सिंधो ।
त्वच्छरणमात्र धन्यः कति कति मान्यः सनाह मधुनासम् ॥ ३ ॥
जगदंब श्रीमुक्ते चिद्रविबिंबे दयावलंबेन ।
चरणं निदेहि हृदि मे ज्योतिष्मद्राजमान ममृतकरम् ॥ ४ ॥
श्रीज्ञानेशे भगवन् साक्षा द्गीता पि तर्जयतितरां ।
यत्कृपया पशुमहिषं श्रुतिवत्कारं पठन् श्वसद्वेदः ॥
ज्ञानाधिकारभाजां यततां सोपानमंतरेण किल ।
न भवेत्स्वरूपसिद्धिः सोयं सोपान सद्गुरुर्जयति ॥
प्रणमामि मुक्तिबालां सकलां कैवल्यसिंधुकल्लोलाम् ॥
आवताररत्न गोलां भक्तविलोलां चिदर्कहेलां ताम् ॥

इदानीं नमोनः श्रीगुरवे नमः सभ्यः तत्सेवके भ्यो नम इति.

या श्लोकांवरून साधारणतः टीकाभाषेची कल्पना येईल.

श्रीमन्निवृत्तिनाथांस आरंभी नमन करून इतर बंधूंस अंतीं नमन केलें आहे. हें निराळें सांगणें नको च.

गो. का. चांदोरकर

---

# ४१ विठा ( रेणुकानन्दन )

सदरहु संत कवि फार उच्च दर्जाचे कवि होते असें त्यांच्या ५।७ पदांवरून दिसतें. कन्नड येथील संग्रह चाळीत असतां ६ पत्रें अत्यंत जीर्ण झालेलीं व वरींच अशुद्ध लिहिलेलीं उपलब्ध झालीं. त्या सहा पृष्ठांतील अपूर्ण पदें सोडलीं म्हणजे पूर्ण अशीं ५।७ च राहतात. परंतु तीं सुद्धा यांच्या कवित्वाची साक्ष पद-विण्यास पुरेशीं आहेत.

माझे यादींत यांचे नांवापुढें भ. विजयांत ५७ अध्यायांत यांचा उल्लेख महिपति बुवांनीं केला आहे म्हणून टीप दिलेली आहे. या खेरीज यांच्या चरित्रा संबंधीं अगर ग्रंथासंबंधी अधिक माहिती नाहीं.

रा. राजवाडे यांनीं यांचा शक १५०० दिलेला आहे. तो ठोकळमानानें व त्यांची कृति उपलब्ध नसतां अवांतर उल्लेखावरून दिलेला आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे पुष्कळ बिनचूक आहे असें दिसून येईल.

पुढें मासल्याकरितां म्हणून दिलेल्या व मजजवळ असलेल्या पदांवरून एक गोष्ट सहज लक्षांत येते ती ही कीं यांची वर्णन शैली श्री ज्ञानेश्वर महाराजांचे धर्तीवर असून प्रसादयुक्त आहे, व त्यांत सृष्टीसौंदर्याचें वर्णन अप्रतिम तन्हेनें केलेलें आहे.

यांचा आणखी अधिक ग्रंथसंग्रह सांपडल्या वांचून यांच्या चरित्रावर चांगला उजेड पडावयाचा नाहीं.

विठा

( रेणुकानन्दन )

यैसे प्रसन्न श्रीगुरूनाथ । जेणें मस्तकीं ठेविला हात । शरीराच्या खुणा असे सांगत । परमार्थ पातलया ॥ १ ॥ देखों गेलों जी सहज । मन संतोषाचें भोज । जें जें चिंतित होतों गुज । तें प्रत्यक्ष मज दाविलें ॥ २ ॥ काये सांगो कासया सारिखें । नाना वर्ण नाना वेखें । नाना अनुपम्य सुखे । मज मी देखें मज माजि ॥ ३ ॥ नाना वाद नाना वाद्ये । नाना घोष नाना शब्द । नाना रूप नाना भेदं । नाना सादे कोंदलेसे ॥ ४ ॥ नाना परीचीं बोलणीं । नाना विध अलंकार लेणीं । नाना परीचीं पाहाणीं । नेणों केसेनि दृष्टि भरलीं ॥ ५ ॥ विठलीं विठल भेदला । आदि पुरुषीं मिनला । रेणुका नंदन सुखिया जाला । मग राहिला निज सुखें ॥ ६ ॥

काई अनागत सोसि बापा । साही चक्रवर्ति गेले आईक पां । येकें तु निर्धारें राहे पां । पुढें पाहे पां काये होईल ॥ १ ॥ द्वादश सूर्यो कळा तपाति । मेरु मांदार हे पै चळति । सप्त सागर येकवाट पै मिळति । चंद्र मावळति आणि तारा ॥ २ ॥ क्षिति प्रवर्तैल बुदूबुदाकारु । आकार्शी अवकाश निराकारु । सकळैक खुंटति व्यापारु । सचराचरु मुख्य करुनि ॥ ३ ॥ द्वैत अद्वैतीं जिरति । वेद बीजींची मुरति । जेथि तेथिची गा श्रुति । सामावति नादंबिंदु ॥ सोहं ठाई शून्य ठाकति । आपपरातें चोरिति । याही पराति नुफरे माति । जे सिधांति वाषाणें ॥ मि माझें ये दोन्हि नाहीं । विठ्या रेणुकानन्दना पाहि । मग उरैल जें काहि । तें सकळ हि आदिपुरुषु ॥ ६ ॥.

अधट अधिकारू केल्या । अवगुण फेडावा लागेगा । बाप स्वतंत्रपणाचे सावेव । दृष्टांतु सांगणें लागे रया । कैसा पालटु रे पालटु रे । कावल कैवल्य रातले । शरदि छाया विसरोनियां रितु वारुषिये पातले रे ॥ द्रुम दुर्गंध विसरोनिया दृति मषासिर ( ? ) होउनि राहिले रे ॥ प्रतीति प्रसन्नदायक श्रीमंतासासन घातले रया ॥ २ ॥ इत्यादि.

या पद्यांतील भाषा रचना वगैरे दासोपंताचे कालची अथवा त्याहून हि किंचित् जुनी अशी दिसते तेव्हां विठा रेणुकानंदन हे १४००–१४५० चे सुमारास हि अथवा किंचित् आधीं झाले असावेत.

गो. का. चांदोरकर

## ४२ श्रीवटेश्वरांची समाधि

( संशोधकांस पृच्छा )

सासवडास जे कोणी गेले असतील त्यांस श्रीसोपानदेवांच्या समाधीच्या किंचित् मागचे बाजूस अत्यंत रमणीय ठिकाणीं ' श्रीवटेश्वराचें ' भव्य व सुंदर देवालय पहाण्यास मिळालें असेल. जितकी ती समाधी जुनी आहे तितकें च हें देवालय हि जुनाट बांधणीचें दिसतें. त्या देवळाचा विस्तार, त्याचा प्राकार व नदीपासून त्याचें संरक्षण व्हावें म्हणून जिचे कडे विशेष लक्ष्य दिलें आहे अशी मजबूत बांधणी हीं लक्षांत घेतलीं म्हणजे त्या स्थानाबद्दल पूर्वकालीं अत्यंत आदर असावा असें अनुमान सहज च निघतें. अद्याप हि एकान्त म्हणून

केवळ नव्हे तर दैवत म्हणून हि त्या देवळाचा आश्रय भाविक व एकान्त प्रिय साधू करतात.

मीं सासवडास गेलों तेव्हां एका बहुश्रुत माणसानें,–कदाचित् ते मठाधीश हि असतील–मला सहज संभाषणांत सांगितलें कीं श्रीसोपान आणि वटेश्वर यांनीं येथें बरोबर च समाधि घेतली.

हें त्या गृहस्थाचें सांगणें मला त्यावेळीं अनेक निराधार आख्यायिकें पैकीं एक असेलसें वाटून मीं तिकडे दुर्लक्ष्य केलें व त्याबद्दल पुढें भाषणरूपानें माहिति ही काढली नाहीं. आतां ती फार मोठी चूक झाली असें वाटूं लागलें आहे असो. इत्यर्थ इतका च कीं सासवडास अशी एक आख्यायिका आहे कीं श्रीसोपान व वटेश्वर यांनीं तेथें बरोबर च समाधि घेतली आहे.

आतां या आख्यायिकेस पोषक कांहीं आहे कां पाहूं:—

श्रीपुण्यस्तंब–पुणतांबे–येथें मुधेश चांगा यांची समाधि असून वटेश्वर चांगा (?) यांची तापीतीरीं 'चांगदेव' येथें आहे अशी आख्यायिका आहे. मुधेश चांगा हे शक १४२७ मध्यें समाधिस्त झाले असून वटेश्वर (?) चांगा यांनीं शक १२१८ मध्यें समाधि घेतली.

परंतु आजपर्यंत ज्यांस श्रीज्ञानेश्वरसमकालीन समजताहेत व ज्यांच्या अभंगांस श्रीज्ञानेश्वरकालीन इतिहासास प्रमाणभूत मानतात ते नामदेवराय याबद्दल काय म्हणतात पहा:—

रा. आवटे यांनीं छापविलेला गाथा (नामदेवमहाराज) पानें २५४। २५५।२५६।२५७।२५८।२५९।२६०. यांवर श्रीसोपानदेवांनीं सासवडास (संवत्सरग्रामनीळपर्वत कऱ्हातीर) समाधि घेतल्यावर

प्रतिपदे देव निघाले बाहेर। केला नमस्कार समाधीसी ॥

कारण

चांगा म्हणे माझी करा बोळवण। घेऊनि नारायण समागमे ॥

या हेतुप्रमाणें

दिवसानुदिवस चालिले सत्वर। पहावें गोदातीर म्हणोनियां

अशा घाईनें मार्गक्रमण करीत असतां

पाहिला कचेश्वर पाहिली ती गोदा। आली प्रतिपदा माघ मास.

नामा म्हणे देवा जावें पुण्यस्तंबा। मनोहर जागा सिद्धेश्वर.

यावरून सिद्धेश्वर हे पुणतांब्याचे गोदातीरावरील स्थान आहे व ते हल्लीं हि तेथें आहे व त्याचा च हा उल्लेख आहे हें उघड आहे.

पुढें तेथें आल्यावर

दशमीचे दिवशीं ठेविलें प्रस्थान ।

दशमीला प्रस्थान ठेऊन सिद्धेश्वरासमोर मंडप घातला.

धन्य पुण्यस्तंब धन्य गंगातीर ।

अशा तऱ्हेचे उद्गार काढून हे नामदेवराय त्या पुण्यक्षेत्राचे धन्यवाद गातात.

अशा तऱ्हेची समाधी घेण्याची तयारी झाल्यावर चांगदेवांनीं
चवदाशे वर्षे शरीर केलें जतन । नाहीं अज्ञानपण गेले माझें ।

परंतु शेवटीं

अभिमानें आलों श्री अलंकापूरीं । अज्ञान केलें दुरी मुक्ताईनें ॥

तेव्हां हे पुण्यस्तंबास समाधि घेणारे श्रीमुक्ताई शिष्य व चवदासें वर्षे राहिलेले वटेश्वर (?) चांगदेव च होते असें नामदेवरायांचें मत उघड होत आहे. आणखी पहाः--

धन्य गोदातीर आदि हे अनादि ।
उकरिली समाधि यथासांग ॥
निशिसर्व कीर्तन वद्य माघ मासीं
व्रत एकादशी गोदातीरीं ॥

माघ वद्य ११ ही वटेश्वर चांगदेवाच्या (?) समाधीची तिथी आहे.

गोदातीरी महोत्सव चांगदेवा । पूर्ण तूं
विसावा पांडुरंगा । समाधि भोंवते उभे
साधुसंत । उतरले आंत चांगदेव ॥

अशा तऱ्हेनें नामदेवरायांच्या मतानें गोदातीरीं श्री सिद्धेश्वरासंन्निध पुण्यस्तंबग्रामीं माघ वद्य एकादशीस श्रीमुक्ताई शिष्य चांगदेव यांनीं समाधि घेतली.

नामयाचे पुत्र नारा विठा गोंदा ।
जागा झाडी महादा समाधीची ॥
समाधीचे पाळीं निवृत्ति वनमाळी ।
अंतरी कळवळी मुक्ताबाई ॥

यावरून मुक्ताबाई शिष्य जे ते च हे अशाबद्दल आतां कांहीं शंका राहिली कां ? असेल तर आणखी पहा.

निवृत्तीनें मिठि विठोबाच्या गळा।
आणिकांच्या डोळा अश्रु येति ॥
गेले योगिराज राहिले ठायीं ठायीं।
आतां मुक्ताबाई जाईल कीं ॥

यानंतर मुक्ताबाई जावयाच्या असें श्रीनिवृत्तिनाथ म्हणतात. तेव्हां श्री मुक्ताबाई शिष्य, चवदाशें वर्षे वाचलेले चांगदेव हे पुण्यस्तंबीं समाधिस्थ झाले असें श्रीनामदेवराय म्हणतात असें त्यांचे म्हणून प्रचलित असलेल्या अभंगावरून दिसतें.

तेव्हां शक १४२७ मध्यें ज्या मुधेश चांगांनीं पुणतांब्यास समाधि घेतली त्यावेळचे अथवा त्या नंतरचे हे नामदेव होते हें उघड आहे. असो.

या शक १४२७ मधील वर्णनांत (शक १४२७ हा शक ऐतिहासिक दृष्ट्या सिद्ध झाला आहे असें मला वाटत नाहीं तथापि तो च सध्यां घेऊन चालूं) श्री निवृत्ति, श्री मुक्ताबाई, विठा नारा महादा, गोविंदा, परिसा भागवत वगैरे शक १२०० तील मंडळींचीं नांवें आणल्यामुळें सर्व घोंटाळा झाला आहे खरा (नारा विठा म्हादा गोंदा हे १४०० मधील नसतील कशा वरून! कारण हे कोणत्या 'नामयाचे पुत्र') परंतु एक अत्यंत महत्वाची गोष्ट या वर्णनांत आहे ती लक्षांत घेतली म्हणजे वर्णनकाराची फारशी चुकी नसून आम्हीं च गैरसमजुतीनें तर्क करतों असें स्पष्ट दिसतें.

कसें तें पहाः—

नामदेवांनीं या सर्व अभंगांत म्हणजे 'चांगदेवांचें नमन' व 'चांगदेवांची समाधि' यांवरील अभंगांत कोठें ही चुकून सुद्धां वटेश्वर चांगा असें म्हटलेलें नाहीं. त्यांनीं सर्वत्र चांगदेव, चांगोबा, योगीश्वर असे शब्द वापरले आहेत. वटेश्वर चांगा यांनीं पुण्यस्तंबीं समाधि घेतली असा कोठें हि उल्लेख नाहीं. तेव्हां श्रीनिवृत्ति, श्री मुक्ताबाई, परसा, विसोबा, यांचा जरी उल्लेख आहे व त्यामुळें हे चांगदेव जरी १२०० शेंतील भासतात तरी त्यांस नामदेवांनीं वटेश्वर असें कोठेंच म्हटलें नाहीं. याचें च प्रत्यंतर लागलींच आपणांस दिसतें. जसें येथें चांगदेवांचें नमन आहे तसें च पान २५२ वर वटेश्वरांचें नमन आहे. म्हणजे वटेश्वरांचें नमन पान २५२ वर व चांगदेवांचें नमन पान २५७ वर आहे. दोहोंतील अभंग भिन्न आहेत. यावरून वटेश्वर व चांगदेव हे नामदेवरायांनीं भिन्न गणले होते, हें उघड होत आहे. (नाथ सांप्रदायाचा हा आचार च दिसतो कीं समाधि घेण्याचें पूर्वीं उपास्यास नमनपर स्तोत्र गावयाचें व) ज्या चांगदेवांनीं पुण्यस्तंबास समाधि घेतली ते कांहीं वटेश्वर नव्हत. मग वटे-

श्वरांनीं समाधि कोठें घेतली ? आपण तापीतीरीं ' चांगदेव ' ग्रामीं घेतली असें म्हणूं. नामदेवराय तसें म्हणत नाहीं. ते काय म्हणतात तें पहा:—

रा० आवटे यांचा गाथा ( नामदेवरायांचा गाथा ) पान २४८ पासून २५३ पावेतों.

देव म्हणे नाम्या मार्गशीर्ष गाढा ।
जावें सासुवडा उत्सवासी ।
सोपानासी आम्हीं दिधले वचन ।
चला अवघे जण समुदाय ॥

श्रीज्ञानेश्वरांचे समाधीनंतर सर्व मंडळी सासवडास आली. तेथें

निर्झर जीवन वाहती निरंतर । तेथें वटेश्वर उतरले ॥

त्या सासवडास जवळ च इंद्रनीळ पर्वत असल्यानें निर्झर निरंतर वाहणारे असें पाहून वटेश्वर उतरले. वटेश्वरांचें हें नांव येथें प्रथम आलें.

वटेश्वरें वृत्तांत सांगितला सकळ ।
पूर्वी आमचें स्थळ याच क्षेत्रीं ॥

यांत पूर्वी शब्दाचें स्वारस्य पूर्ण इतिहास कळल्यावांचून लक्षांत येणें नाहीं. असो पुढें चला. अशा या पुण्य रम्य व मनोहर क्षेत्रीं आल्यावर

सोपान वटेश्वर करिति एकांत ।
कळलें मनोगत नामा म्हणे ॥

करिती हें बहुवचनी ( द्विवचनी ) रूप लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सोपान वटेश्वर पातले समोर ।
केला नमस्कार निवृत्तीसी ॥
म्हणे मुक्ताबाई जाती दोघेजण ।
ऐसें नारायणें बुझाविलें ॥
गंधर्वा आणि देवा कळला वृत्तांत ।
जाती उभय समाधीसी ॥

तेव्हां संवत्सर ग्रामीं आल्यावर श्रीसोपान व वटेश्वर यांनीं श्रीनिवृत्तीस नमस्कार करून समाधी घेण्याची परवानगी मागितली व आतां हे दोघे हि समाधिस्थ होणार अशी श्रीमुक्ताबाई व देव गंधर्व यांची खात्री झाली.

परंतु वटेश्वर येथें च समाधिस्थ झाले हें कशावरून ? तें अद्याप पहाणें आहे. तें पाहूं:—

सोपान वटेश्वर उभे ठेले पुढति ।

पंचारत्या होती आनंदानें ॥
नारा विठा महादा पाठविला गोंदा ।
झाडावया जागा समाधीच्या ॥

' समाधीची ' नव्हे ' समाधीच्या ' असें बहुवचनीं म्हटलें आहे.

परिसा भागवत चांगदेव हातें ।
आणिलें साहित्य समाधीचें ॥

येथें चांगदेव व ' वटेश्वर ' यांचा भेद नामदेवरायांनीं स्पष्ट केला आहे. कशावरून ? तें पहाः—

सोपान वटेश्वर सोंवळे झाले सांग ।
निवृत्ति पांडुरंग पूजियेले ॥

ज्यांस समाधि घेणें आहे, ते स्नान करून शुचिर्भूत होऊन सोंवळ्यानें समाधीस बसतात, हें ज्यांनीं हीं समाधि प्रकरणें वाचिलीं असतील त्यांस निराळें सांगणे नको. वटेश्वर सोंवळे ( श्रीसोपान देवाबरोबर ) होतात व चांगदेव ( परिसाबरोबर ) साहित्य आणतात. पुढें आणखी पहा

एके ठायीं मिळाले परब्रह्म गवसून ।
वटेश्वर सोपान मध्यभागीं ॥
वटेश्वर सोपान घेतले वोसंगळा ।
माळा घाली गळा पुंडलीक ॥
सोपान वटेश्वर पूजिति आवडीनें ।
संगति निधान पांडुरंग ॥
कळवळी मग देहभान ।
वटेश्वर सोपान सोंवळे झाले ॥

येथील बहुवचनी प्रयोग लक्षांत घेण्यासारखे आहेत. परंतु येवढ्यानें च खात्री होणार नाहीं म्हणून आणखी थोडें पुढें चला :—

उभयतांनीं नमन केलें यथासांग ।
अर्थी ( आम्हीं ? ) पांडुरंग साह्य केला ॥

येथें जर एकटे श्रीसोपान देव च समाधिस्थ होणार होते तर वटेश्वरांनीं नमन करण्याचें कारण काय ? येथें ' नमन ' हे विशिष्ट नमन आहे. नुसता नमस्कार नव्हे; व हा विशिष्ट अर्थ उघड आहे कारण या अभंगाच्या आधीं ' श्रीसोपान देवाचें नमन ' व ' वटेश्वराचें नमन ' म्हणून दोन नमनाचे भिन्न अभंग आहेत, तेव्हां

उभयतांनीं नमन केलें यथासांग ।

हे समाधींत जाण्यापूर्वी जें विशिष्ट नमन करावयाचें असतें तें नमन उभयतांनीं केलें व त्यावरून दोघांस हि समाधिस्थ होणें होतें हें उघड आहे. परंतु पुढें याहून हि स्पष्ट आहे:—

समाधि पायरीवर वटेश्वर सोपान ।
मागितला मान पांडुरंगा ॥

हा मान कोणता ?

प्रतिवर्षीं भेटि देऊं उभयतां ।
अलंकापुरीं जातां उत्सवासीं ॥

तुम्हां दोघांस हि मी अलंकापुरीं जातां भेटी देईन ही देवाजवळून त्यांनीं भाक घेतली. येथें उभयतां हें पद आहे.

पांडुरंगा संगें गेले कृपेश्वर ।
सोपान वटेश्वरा बैसविले ।
सोपान वटेश्वरें केला नमस्कार ।
उतरले पार भवसिंधू ॥
सोपान वटेश्वर सुखधामीं शेजा ।
करिताती पूजा समाधींची ॥

यावरून 'श्रीसोपान व वटेश्वर' यांनीं संवत्सर म्हणजे सासवड ग्राम, कऱ्हातीर व निळपर्वतपाठार पाहून आपसांत एकान्त केला व वटेश्वरांनीं त्या क्षेत्राची पूर्वीची (?) ओळख सांगून तेथें च आम्हांस समाधि घ्यावयाची म्हणून श्रीनिवृत्तींची आज्ञा घेतली आणि नंतर एके च ठिकाणीं अथवा त्या च ग्रामीं भिन्न ठिकाणीं परंतु एका च तिथीस समाधि घेतली. एकंदर अभंगांच्या श्लोका वरून

समाधि पायरीवरी वटेश्वर सोपान एका च ठिकाणीं व एका च वेळीं या दोन्हीं योगिराजांनीं आपला देह ठेविला असें स्पष्ट दिसतें.

या सर्व अभंगांत नामदेवरायांनीं वटेश्वरांस चुकून ही चांगदेव म्हटलेलें नाहीं.

हा विचार मला सुचण्याचें कारण 'वटेश्वर व चांगदेव' यांचीं भिन्न नमनें नामदेवरायांनीं दिलीं आहेत व तीं तशीं मला एका जुन्या हस्तलिखित प्रतींत पहाण्यास मिळालीं, तेव्हां रा० आवट्यांचा गाथा पहात असतां त्यांत हि हा भेद स्पष्ट केलेला दिसला. तेव्हां असें कां म्हणून विचार करीत असतां सासवडच्या माझ्या टिपणींत 'वटेश्वरांच्या' समाधीच्या आख्यायिकेची नोंद आढळली. तेव्हां हीं भिन्न नमनें—वटेश्वरांचें सासवडास व चांगदेवाचें गौतमी तीर सिद्धेश्वर सन्निध पुण्यस्तंबीं—सासवडची आख्यायिका, तेथील वटेश्वरांचें देवालय, व अभंगांचा स्पष्ट अर्थ यावरून मला जे विचार सुचले ते येथें नमूद केले आहेत. म्हणून

संशोधकांस माझी अशी पृच्छा आहे कीं वटेश्वरांचें समाधिस्थान कोणतें ! माझ्यामतें संवत्सरग्राम.

गो० का० चांदोरकर

---

# वटेश्वरांची समाधि

## भाग २ रा

पहिल्यानें श्रीवटेश्वरांचें समाधिस्थान कोणतें या बद्दल जनप्रवाद व प्रत्यक्ष ग्रंथाधार हीं दिलीं; आतां आजपर्यंतच्या समजुतीनें मी काढलेल्या प्रमेयास काहीं बाध येतो कां पाहूं. असें करणें म्हणजे खरोखर प्रमाण व्युत्क्रम आहे हें मी जाणून आहे असो.

प्रथम निळोबाराय. यांनीं चांगदेव चरित्र लिहिलें आहे. परंतु जें मिश्रण महिपतिबावांनीं व नामदेवांनीं केलें आहे तें च निळोबारायांनीं केलें आहे महिपतिबुवा व नामदेव यांच्यांत हि फरक आहे तो पुढें देतों च.

निळोबांनीं मुळीं आरंभ च असा केला आहे

नारायण डोहो पुण्यक्षेत्रग्राम ।
वस्ति ग्रहस्थाश्रम मुधोपंत ॥

ह्मणजे त्यांनीं 'मुधेशचांगा' यांची परंपरा देऊन नंतर श्रीनिवृत्ति, श्रीज्ञानेश्वर यांची भेट दिली आहे.

जाली भेटी तो चि विश्रांतिचा वट ।
छाया घनदाट बैसावया ॥

याच चांगदेवांस निळोबांनीं चांगा केशवदास व चांगा वटेश्वर म्हटलें आहे-

दर्शनें चि यांच्या स्वरूप साक्षात्कारु ।
चांगा वटेश्वरू सुखी केला ॥
मग केशवदास चांगा म्हणती ज्ञानेश्वर ।
तुज असो बडिवार नामाचा या ॥

यावरून मुधेश चांगा किंवा वटेश्वर चांगा याचें नांव केशवदास चांगा हें श्रीज्ञानेश्वरांनीं ठेविलें असं होतें.

हा सर्व घोटाळा (!) हि कबुल केला असता, जर निळोबांनीं हें चरित्र समाधि पावेतों दिलें असतें तर. परंतु 'श्रीगुरूप्रसाद' 'व श्रीगुरू पूजन' एवढें

करून च निळोबाराय थांबले. तेव्हां हे मुधेश केशवदास किंवा वटेश्वर चांगा समाधिस्त कोठें झाले हे कांहीं च निश्चित होत नाहीं. तेव्हां निळोबांची साक्ष फक्त पूर्वी मुधेश व वटेश यांचा कसा घोटाला होता एवढ्या पुरती च ग्राह्य आहे.

यानंतर श्रीएकनाथांनीं चांगदेवांचा वटेश्वर चांगा व नुसता चांगदेव एव-ढाच उल्लेख केला आहे. त्यांत ' मुधेश ' किंवा ' केशवदास' हीं उपपदें लावि-लेलीं नाहींत.

घाळलीला केली जगीं ख्याति मिरविली ।
चांगयांची हरिली चौसष्ट कळा ॥
कळा पासष्टावी ज्ञानदेवें दाविली ।
सांगयाची विराली अहं ममता ॥

तशांत यांनीं ' चांगदेव चरित्र ' लिहिलें नसल्यानें असल्या प्रासंगिक उल्लेखांचा विचार करण्याची विशेष अवश्यकता नाहीं.

दुसरे चरित्रकार (निळोबानंतरचे) महिपतिबुवा,यांना माहिती देणारे 'मुधेश चांगांच्या ' वंशांतील स्वतःच्या समकालीन असल्यानें यांनीं ' वटेशचांगा ' व ' मुधेशचांगा ' यांच्यांत भिन्नता स्पष्ट केली आहे. परंतु दोहोंत अंतर फक्त ६ महिन्यांचें ठेविलें आहे, मुधेश हे वटेश गुप्त झाल्यावर अवघे ६ महिन्यांनीं प्रादुर्भूत झाले.

' तोरणमाळ ' ( खानदेशांत पश्चिमेस तळोदे तालुक्यांत सातपुड्याचें हें एक शिखर आहे ) येथें श्री गोरक्षनाथ असतां त्यांची भेट वटेश्वरांनीं घेतली व त्यांस त्यांनीं विनंति केली:--

ऐसा घेऊनि आमुचा वर । मग घरासि गेला तो द्विजवर ॥
तें पासूनि निदिध्यास थोर । लागला साचार आमुचा ॥
नियम केला असे त्यासी । अकरा वर्षे लोटली ऐसी ॥
षण्मास उरले अवधीसी । यास्तव स्वामीसी निवेदिलें ॥

तेव्हां नारायण डोही ( नगर जिल्हांत ) उत्पन्न झालेले व शक १४२७ त समाधिस्थ झालेले मुधेश चांगा यांच्यांत व वटेश्वरांत महिपतिबुवांच्या मतें अवघा ६ महिन्याचा अवधि.

तेव्हां

जगासि दुर्मुख म्हणोनि दुर्मुख ।
संवत्सर देख समाधीसि ॥

म्हणून ज्याचा उल्लेख उद्बोधनाथांनीं केला आहे त्या संवत्सरीं म्हणजे १२१८ त अथवा नामदेवरायांच्या चांगदेव समाधी वरून १२१९ त जे चांगदेव

समाधिस्थ झाले त्यांच्या समाधींत व १४२७ त समाधिस्थ झालेल्या मुधेशाच्या प्रादुर्भवांत अंतर सारें ६ महिन्याचें असणें संभवनीय दिसत नाहीं. म्हणजे पहिले वटेश जर १४०० वर्षांचें तर हे मुधेश २०० वर्षांचे परंतु यांच्या दोनशें वर्षांचा कोठें उल्लेख आढळत नाहीं. असो.

'वटेश्वर चांगा यांच्या समाधि संबंधी आपलें चरित्रांत महिपति–बुवा नामदेवांनीं उल्लेख केल्याप्रमाणें पुण्यस्तंबाचा तर उल्लेख करीत नाहींत परंतु श्रीनिवृत्ति श्रीपांडुरंग इत्यादि समाधीचें वेळीं होते असें हि त्यांनीं प्रतिपादन केलें नाहीं.

त्यांनीं फक्त एवढें च वर्णन केलें आहे—

मग तेथूनि षण्मास पर्यंत । चांगदेवें देह केला गुप्त ॥
योगेश्वराची अघटित स्थित । लीला दाखवित जनातें ॥

या ओवींतील 'तेथूनि' यांचें स्पष्टीकरण त्यांनीं असें केलें आहे—

मग पावोनि तापीतीर । श्रीवटेश्वर नामियेला ॥

तेव्हां तापीतीरीं वटेश्वरीं मुधेश चांगोबाच्या पूर्वीं सहा महिने वटेश चांगदेवांनीं आपला देह गुप्त केला असें महिपतिबुवांचें म्हणणें आहे.

वटेश चांगदेवांचे चरित्र महिपतिबुवांचे शब्दांत अगदीं थोडक्यांत असें:—

खानदेशांत

तापी पयोष्णि संगमी जाण । दाट लागलें कर्दळी वन

येथें मरूद्गण उतरले व डोळे मिटून तप आचरूं लागले. तेथें वरुण गांवचे (खानदेशांतील यासंगमाजवळचे वरणगांव) दोघे विप्र । उभयता बंधु सहोदर यांचें शिष्य झाले. पुढें वाटीची कथा आणि नंतर श्रीज्ञानेश्वर दर्शन.

विश्रांति वटाखालीं जाण । निवृत्ति ज्ञानदेव सोपान ।
मुक्ताबाई गुणनिधान । चांगयाकारणें भेटति ॥

तेथें उपदेश झाला नंतर

चांगदेवासि जाहला उपदेश । मग आज्ञा मागोनि
ज्ञानदेवास । वटेश्वरा पातले ॥

आणि तेथें 'मुधेशचांगा' यांच्या अवताराची तोरणमाळीं (खानदेशांत च) व्यवस्था लावून आपला देह वर सांगितल्याप्रमाणें गुप्त केला. यावरून उघड अनुमान निघतें तें असें—महिपति–बुवांस मुधेश चांगाची प्रत्यक्ष कुलपरंपरागत हकीगत कुलोत्पन्न अशा सुसंस्कृत माणसाकडून कळल्या कारणानें पुण्यस्तंबास जी समाधि आहे ती मुधेशाची आहे हें त्यास निश्चित झालें.

पुण्यस्तंव गोदातीरीं । केशवाची मूर्ति स्थापिलीयावरी ।
चांगा केशवदास निर्धारीं । कवित्वांतरी बोलिले ॥
द्वादश वर्षे लोटिलीं ऐसीं । मग तेथें च
चांगदेव बैसले दिव्यासनीं । समाधिस्त होतसे योगेश्वर ।

तेवढी नामदेवरायाची चुकी वुवांच्या नजरेस आली, परंतु नामदेवरायांनीं वटेश्वर व चांगदेव, यांच्यांत जो फरक केला आहे तो श्रीनिवृत्ति आदि करून १२ शेतील पुराण संतांचा दोही समाधीचे वेळीं जो उल्लेख केला आहे त्यावरून वुवांचे ध्यानीं आला नाहीं; व त्यामुळें वटेश्वरीं च वटेश्वर चांगदेव गुप्त झाले असें त्यांनीं मोघम म्हटलें. तसें नसतें तर वटेश्वरांच्या अथवा चांगदेवाच्या समाधीच्या वेळीं नामदेवरायांनीं जो उल्लेख निवृत्ति नाथादिकांचा केला आहे ( चांगदेवाचे वेळी चुकीचा ) तो, वटेश्वर हे श्रीज्ञानेश्वर उपदिष्ट होते असे जाणून हि नामदेवराया प्रमाणें वुवांनीं कां नाहीं स्वीकारला ? दुसरें असें कीं त्यांची कालगणना चुकीची असल्यानें फार तर १३शे तील असलेले मुधेशांचे वेळीं श्री निवृत्तिनाथ कोठील ! पण वटेश तर सहा महिने आधीं होते अशी त्यांस माहिति मिळालेली, त्यामुळें १२ शेंतील श्रीनिवृत्तिदिकांचा वटेशांचे समाधीचे वेळीं उल्लेख न करतां

मौनं सर्वार्थसाधनम् ।

धरणें वरें असें त्यांस झालें असावें. मुख्य गोष्ट हि कीं श्रीसोपानांच्या समाधि प्रसंगीं वटेशांच्या समाधीचा जो उल्लेख आहे तो कोणाचे लक्षांत न आल्यानें हा सर्व घोटाळा खुद्द नामदेवांचा (चांगदेव मुधेश विसरून श्रीनिवृत्तीस पुण्यस्तंवास समाधीचे वेळीं आणण्याचा ) होऊन तेथपासून बरोबर उपपत्ति न लागल्यानें ती च चूक पुढें होत गेली.

यावर एक शंका अशी.

श्रीसोपानांच्या समाधीचे वेळीं वटेशांच्या समाधीचा उल्लेख नामदेवानींच केला आहे व पुण्यस्तंवाचा हि उल्लेख नामदेवांनीं च केला आहे तेव्हां संवत्सर व पुण्यस्तंव यांचा भेद दाखविणाऱ्या नामदेवांची तरी अशी गैरसमज कशी व्हावी ? प्रश्न बरोबर आहे पण त्याचें उत्तर अगदीं थोडक्यांत एका च प्रश्नांत आहे.

मुधेश चांगदेवाच्या समाधीचें — पुण्यस्तंव येथील, वटेशांच्या वेळीं पुण्यस्तंवास कांहीं समाधि नव्हती च — वर्णन करणारे नामदेवराय कोणते शकातील ? अर्थात नंतरचे. तेव्हां दोन प्रमेयें संभवनीय. एक तर दोन नामदेवरायांनीं दोन समाधी वर्णनें केलीं–पुराण नामदेवरायांनीं श्रीसोपान व वटेश्वर यांचीं–अथवा नंतरच्या नामदेवांनीं 'सोपान वटेश्वर' हीं जोड पूर्वींच्या अभंगांतील न समजून व दोन चांगदेव झाले हे न माहित होऊन 'चांगदेव समाधि' रचून त्यांच्या मतानें

[

पूर्वींच्या अपुऱ्या समाधींची पूर्तता केली. या खेरीज तिसरा तर्क संभवत नाहीं. माझ्या मतें पहिला विशेष संभवनीय आहे. असो.

महिपतिबुवांनीं वटेश्वर तापीतीरीं वटेश्वरीं गुप्त झाले असें जें वर्णन केलें आहे त्यास प्रत्यक्ष असा कोणता हि पुरातन आधार नाहीं. वटेश्वरास फक्त ' तापी तीरनिवासी ' इतकें च इतरत्र म्हटलेलें आढळतें. तेव्हां बुवांनीं या वर्णनास कोठील आधार घेतला हें कळत नाहीं. परंतु पुढील ग्रंथकारांनीं त्याचा च अनुवाद मात्र केला आहे.

खानदेशांतील चांगदेव आपल्या जन्मभूमीस—तापी पयोष्णीसंगमीं—येऊन गुप्त झाले असें कदाचित् बुवांचें अनुमान असावें. चांगदेव हें जन्मभूमी अथवा वसविलें ह्मणून नांव पडलें असावें. कसें हि असो महिपतिबोवांच्यापूर्वी श्रीसोपान वटेश्वरांच्या संवत्सर ग्रामींच्या समाधीसंबंधी असलेल्या प्रत्यक्ष उल्लेखाचा अशा च प्रत्यक्ष पुराव्यानें उलगडा होई पावेतों

वटेश्वर यानीं संवत्सर ग्रामीं च समाधि घेतली
हें निश्चित आहे. †

गो. का. चांदोरकर

## ४३ शिवकल्याणांचा एक संस्कृत ग्रंथ

श्रीमुकुंदराजांचें महाभाष्य, सहजानंदांची श्रीअमृतानुभवावरील टीका असे दोन प्राकृत कवींनीं संस्कृतांत ग्रंथ केलेले आपल्या समोर आज पावेतों आले आहेत. पहिला रा. राजवाड्यांस उपलब्ध झाला, दुसरा मला झाला आज

---

† टीपः— हें विवेचन करतानां सहज एक गोष्ट नजरेस आली ती येथें नमूद करतों.

महिपति बुवांनीं मुधेशचांगा याचा समाधि शक ' १२४७ क्रोधन संवत्सर ज्येष्ट शुा ७ भानुवासर पुष्य नक्षत्र ' असा दिला आहे. शक १२४७ ला क्रोधन संवत्सर येतो, ( त्यावर्षी वैशाख अधिक मास आहे. ) परंतु ज्येष्ट शुा ७ स गुरूवार येतो व नक्षत्र पुनर्वसु येतें.

कै. ह. प. भिंगारकरबुवा यांनीं हा शक १४२७ दिला आहे. तिथी ती च व या च शकाचा अनुवाद ह. प. पांगारकर यांनीं केला आहे. १४२७ स हि क्रोधन संवत्सर आहे; परंतु ज्येष्ट शुा ७स मंगळवार येतो. तेव्हां दोन्ही शकांतील तिथीस वार जुळत नाहीं.

या च प्रतीचा तिसरा एक संस्कृत ग्रंथ (प्राकृत कवींचा) आपले पुढें ठेवित आहे. तो शिवकल्याण यांचा होय.

श्रीशंकराचार्यांची ' अपरोक्षानुभूति' आपणां सर्वांस विश्रुत आहे च. जगन्नाथकृत अथवा शिवरामकृत अपरोक्षानुभूतिटिका हि आपले पहाण्यांत असेल, परंतु शिवकल्याणांनीं या ग्रंथावर संस्कृत टीका केलेली आजपावेतों उपलब्ध नव्हती.

ही पोथी कारंजास जो कांही संग्रह रा० राजवाड्यांस उपलब्ध झाला त्यांत होती. या पोथीची लांबी १। फूट असून रुंदि ६ इंच आहे. पृष्ठें एकंदर १२ आहेत प्रत्येक पृष्ठावर ओळी पुढून मागून मिळून २८ आहेत. प्रत्येक ओळींत सुमार १५ ते १७ शब्द आहेत, ह्मणजे एकंदर ग्रंथ ३८६४० सुमार आहे.

शिवकल्याणांची गुरुपरंपरा सर्वश्रुत च आहे. तथापि या निबंधाचे परिपूर्तेतेकारितां येथें देतोंः—

श्रीमुक्ताबाई—वटेश्वर —चक्रपाणि — विमलानंद — चांगा केशवदास—जनकराज—नृसिंह—हृदयानंद— विश्वेश्वर—केशवराज —हरिदास —परमानंद नित्यानंद—शिवकल्याण. ( १५५७ हयात )

शिवकल्याणांचे गुरु जे नित्यानंद ते त्यांचे गुरु असून पिते हि होते. त्यांचे पूर्वाश्रमींचें नांव ' त्रिमल्ल '. असो.

शिवकल्याणांचे दैवत, पंढरीनाथ होते हे हि आपण जाणत च आहों. त्यांनीं आपल्या अनुभवामृतावरील नित्यानंद दिपिकेंत श्रीविठ्ठलाचा दैवत म्हणून उल्लेख करून, ती टीका पंढरी क्षेत्रीं समाप्त केल्याचा हि खुलासा केलेला आहे. या वरील विवेचनाचें स्मरण ठेवून आपण सांप्रतचे अपरोक्षानुभूतीकडे वळूं.

सदर ग्रंथाचा आरंभ असा आहेः—

नमः परमशांताय परानंदविलासिने ।
नित्यानंदनिकताय रुक्मिणीपतये नमः ॥
जगदंकुरकंदाय कंदर्पप्रशमात्मने ।
नितंबन्यस्तहस्ताय विठ्ठलाय नमोस्तुते॥
भजेहं करुणामूर्तिं मंगलायतनं हरिं ।
नित्यानंदमगाधां ( धं ) तं नित्यतोभीष्टसिध्ययें ॥

यानंतर श्रीमत् शंकराचार्यांस नमन करून वर गुरुरूपी श्री विठ्ठलास नमन केलें होतें तरी आतां प्रत्यक्ष गुरूंस नमन आहे.

नित्यानंदं गुरुं नत्वा सत्कृत्वासकलागमान् ।
स्मृत्वाथ सकलान् साधून् क्रियते हरिकीर्तनम् ॥

यावरून या अपरोक्षानुभूतिविवरणास शिवकल्याणांनीं ' हरिकीर्तन' म्हटलें आहे हें उघड आहे. तथापि हें मुग्ध न ठेवितां त्यांनीं जें या हरीकीर्तनासंबंधीं स्पष्टीकरण केलें आहे तें त्यांचे च शब्दांत देतों:--

किं तद्धरिकीर्तनम् इतिचेत् जननमरणार्णवमग्नानां प्राणिनां परमकरुणया-कलितेन भगवदाचार्येण या तदुत्तारणोपायभूताऽपरोक्षानुभूतिः सूत्रार्थभूतां विर-चिता पूर्वं तस्याः विवृत्तिः केनापि हृदिस्थेन प्रेरितेन मयाश्रीमन्नित्यानंदचरणानु-चरेण यथा लब्धामत्या क्रियते ॥

तेव्हां शिवकल्याणांनीं हें केवळ हरिकीर्तन केलें आहे. प्राकृत कवींची एकीभूत झालेली विद्वत्ता व लीनता पाहून सकौतुक आल्हाद होतो. याचा च आणखी मासला पहा:--

ग्रंथान्ते शिवकल्याण ह्मणतात:--

एवमस्मिन् संसारे जननमरणाग्निनिचये दीर्घेन ( ण ! ) कालेन संतप्ताः संत इहामुत्रफलभोगविरक्ता ये निश्रेयसकांक्षिणस्तेषां करुणया कलितेन श्रीमद्भगवता-चार्येण शंकरेण प्रणीतेयं सुरसरित् तापोपशमनिह्यपरोक्षानुभूतिस्तत्र तस्यानुकंपयैव भीमातटकृतविलासविग्रहश्रीमन्नित्यानंदानुचरानुचरेण मया तच्चरणांबुजपराग-सुरसगंधितमनसा शास्त्रादिव्युत्पत्तिविहीनतयैव केवलया भक्त्या प्रेरितेन कृतमिदं विवरणं तत्प्रीतय एवास्तु न कदाचिद्दृभाये त्योम् ॥

यांतील सुलभार्थरचनेचें कौतुक करावें कां विनयानें थक्क व्हावें हें च कळत नाहीं.

ग्रंथांतील भाषेचा मासला आपले पुढें मांडला आहे च. या तऱ्हेच्या रच-नेचा च सर्व ग्रंथ आहे त्यामुळें तो समजण्यास अत्यंत सुगम झालेला आहे.

प्रथम मुळांतील श्लोक देऊन त्यांचें खाली त्याचें विवरण दिलें आहे,

शिवकल्याणांनीं अंतिमश्लोकांत आपले नांवाचा मोठ्या खुबीनें निर्देश केला आहे तो देऊन हें विवेचन संपवितों.

नित्यानंदं सदा शांतमद्वैतं शिवमव्ययम् ।
स्मृत्वायं रचिताह्यर्थ स्तस्यैव शिवसंज्ञया ॥

गो. क. चांदारकर

# ४४ नवरस नारायण मानभव होते काय !



या कवीविषयीं परंपरेवांचून विशेष माहिती अद्याप उपलब्ध होत नाहीं. आपल्यास स्मरण व्हावें म्हणून यांची गुरुपरंपरा खालीं देतों:--

श्री दत्त—मुनि देव— नागार्जुन — कवेश्वर ( कवीश्वर ) —पटवर्धन-योगेश्वर—जानु भोज—मुकुंदराज— शारंगधर— मुनि येल्हनु — ( नवरस ) नारायणु.

या गुरुपरंपरे वरून हे कोणते संप्रदायांतील याचा सकृत् दर्शनीं कांहीं बोध होत नाहीं. परंतु नुकतें च एक ' वर्णन साम्य ' माझे नजरेस आल्यानें या परंपरेवर व तद्द्वारा यांच्या संप्रदायावर अस्पष्ट उजेड पडतो असें मला वाटतें, तें ' वर्णनसाम्य ' आपले पुढें ठेवतों व नंतर मला सुचलेला विचार हि आपले पुढें मांडतों.

नारायणांनीं ' शैल्य ( ? ) पर्व ' रचिलें आहे. कवीचें म्हणणें कीं, पद्मपुराणाचा त्याचे कृतीस आधार आहे, परंतु त्यानें या काव्यांत जें चमत्कारिक वर्णन केलें आहे त्यास आधार पद्मपुराणांत मला कोठें आढळला नाहीं. असो.

या शैल्य ( ? ) पर्वाच्या सातव्या प्रसंगांत कवीनें असें वर्णन केलें आहे कीं अश्वत्थाम्यानें ' वडवानळ ' बाण सोडून भीमास भस्म केलें.

पृथ्वीवरी अग्नि प्रज्वलित । हृदयीं ज्वाळा येउनि झोंबत ।
ऐसा उभाचि जळत । वीर भीमसेनु ॥ ५४ ॥
मन हातींची गदा पडळी । नव ही द्वारा ज्वाळा रुंधली ।
मग पडला भूमंडळी । महावीर तो ॥

अशा तऱ्हेनें भीमास 'वडवानळ' अस्त्र सोडून अश्वत्थाम्यानें रणीं भस्म केलें.

अशा या चमत्कारीक वर्णनास आधार कोठें हि मला आढळला नाहीं. परंतु असें च वर्णन अथवा गोष्टीचा उल्लेख मला अलिकडे वाचण्यास सांपडला. कांहीं मानभावांच्या पोथ्या माझे हातीं आल्या त्यां पैकीं एका पोथीचे शेवटीं एक पद आहे. त्यांत उल्लेख आहे तो असाः—

द्रौपदीसी नग्न करीतां सभेसि धाउनि यसि ।
तुं वस्त्र तिला पुरविसी ॥

रण भूमिसी भीम जळाला तूं त्याला उठविसी ।
हें न कळें कवणासी ॥

येथें भीम रणभूमीचे ठिकाणीं जळाल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. ही पोथी मानभवांची असून तिचा मुख्यभाग सांकेतिक लिपींत लिहिलेला आहे. शेवटची चार पांच पानें रूढ देवनागरी लिपींत लिहिलीं आहेत. शेवटचे पानावरील लेख सांकेतिक लिपींत आहे. आज पावेतों ही पोथी मानभावांच्या च ताब्यांत होती, निदान माझे हातीं मानभवांकडून आली. या वर दिलेल्या हकीकतीवरून मधील ११२ पानांवरील लिहिलेलीं पदें मानभवांचीं आहेत यांत शंका नाहीं. विशेष कारण असें कीं, या पदांपैकीं एक श्रीकृष्णावर व दुसरें श्रीदत्त-जन्मावर आहे. हीं दोन्ही दैवतें मानभवांस मान्य आहेत. आणि याखेरीज इतर दैवतांचा उल्लेख यांत नाहीं.

तेव्हां मानभवांत भीम जळाल्याची कथा प्रचलित आहे अगर होती यांत संशय नाहीं.

नवरस नारायणानें आपल्या शैल्यपर्वांत या च कथेचा उल्लेख केला आहे इतकें च नाहीं तर त्या प्रसंगाचें सविस्तर वर्णन केलें आहे.

या कथेस आमचे पुराणांत कोठें हि आधार असल्याचें माझे वाचण्यांत अगर ऐकण्यांत नाहीं, तेव्हां या कथेचा सविस्तर उल्लेख करणारा 'नवरस नारायण' हा मानभव असावा असें सिद्ध होऊं पहातें.

दुसरा एक पुरावा असा आहे कीं याचे गुरुपरंपरेंत 'नागार्जुन' म्हणून एक मुनिदेवाचा शिष्य म्हणून दिलेला आहे. चक्रधराचा नागदेव भट्ट म्हणून एक शिष्य होता. व त्यास मानभव नागार्जुन म्हणतात असा एक प्रवाद माझे कानीं आहे. तेव्हां अशा या सूचक परंपरेचा जर कांहीं वर दिलेल्या अनुमानसिद्धीकडे उपयोग होण्यासारखा असेल तर तें हि विचारार्ह आहे. माझे मतें 'नवरस नारायण' हा मानभव होता.

गो. का. चांदोरकर

## ४५ मानभावांची सांकेतिक लिपि

आपल्या मंडळाच्या शके १८३२ व १८३५ या दोन वर्षांच्या अहवालांत या लिपीचें रा० राजवाडे यांनीं उद्घाटन केलें आहे.* त्यांत कांहीं कमीपणा

* शके १८३२ अहवाल पृष्ठ ७८; शके १८३५ वार्षिकइतिवृत्त पृष्ठ ५८ व ६० पहा.

राहिला आहे असें नाहीं, तथापि त्यांनीं जीं अक्षरें दिलीं नाहींत तीं व इतरत्र जे अन्य संकेत उपलब्ध होतात ते येथें देतों.

खानदेशांत बहुधा प्रत्येक खेड्यांत मानभवांचा एखादा मठ आढळतो व आतां जरी त्याचे अनुयायांत क्वचित् च साक्षर असा भेटतो तरी तेथें थोडा फार संग्रह सांपडतो च. धुळ्यापासून थोडे अंतरावर असा एक मठ आहे, त्यांतील कांहीं पोथ्या एका गृहस्थानें आणून दिल्या. त्यांचा संकेत कांहींसा भिन्न असल्यानें तो येथें देत आहें. या पंथांतील ग्रंथांचे भिन्न भिन्न असे १०।१२ संकेत आहेत म्हणून जनवार्ता आहे. तिच्यांत कांहीं सत्य असल्यास जितके ग्रंथ मिळतील तितके या लोकवार्तेच्या दृष्टीनें तरी हवे आहेत. वाङ्मयाच्या, तत्वज्ञानाच्या व इतिहासाच्या दृष्टीनें या पंथाचे ग्रंथ कितपत महत्वाचे आहेत हें आज जरी सांगतां येत नाहीं तरी त्यांतील चरित्रग्रंथांवरून तत्कालीन माहिती मिळावी अशी आशा आहे. परंतु एक गोष्ट येथें नमूद करून ठेवावीशी वाटते ती ही कीं, जैनांच्या ग्रंथांप्रमाणें मानभवांच्या ग्रंथांचें हि आलोचन अत्यंत जागरूकतेनें केलें पाहिजे नाहीं तर भलते च ग्रह होण्याचा संभव आहे.

मानभवांच्या कोणत्या हि संकेतांत कांहीं अक्षरां पावेतों शिस्त असते व इतर थोडीं अक्षरें बेशिस्त असतात; हें कसें तें खालीं दिलेल्या यादीवरून दिसून येईल. एखाद दुसरें अक्षर लागलें म्हणजे कांहीं अक्षरांचा उलगडा होतो, तरी सुद्धां ग्रंथांचें वाचन लेखकानें शक्य तितकें दुर्बोध करून ठेविलें असतें. कांहीं शब्द नुसते संकेतसूचक असे लिहिले असतात व कांहींच्याबद्दल तर नुसत्या खुणा असतात. तेथें संदर्भ च काय बोध करील तो खरा. मला मिळालेल्या पोथ्यांतील लेखक याच्या हि पलिकडे गेलेला दिसतो. त्यानें वाक्यांतील काहीं शब्द व शब्दांतील कांहीं अक्षरें असंकेतिक म्हणजे नेहमींचीं वापरलेलीं आहेत, त्यामुळें वाचन अधिक दुष्कर झालें आहे. ही अशी प्रवृत्ति या पंथांत कां झाली याचें कारण कांहीं कळत नाहीं. केवळ दुर्बोधता म्हणावें तर तसें नाहीं. कारण एखाद्या दिवसाच्या श्रमानें हें वाचन सुबोध होतें. आंतील विषयाचें दुर्बोधत्व म्हणावें तर तसा विषय प्रतिपादन केलेला अद्याप एक हि ग्रंथ माझे पाहण्यांत नाहीं—( मीं ग्रंथ हि फारसे पाहिले नाहींत तेव्हां कदाचित् हें म्हणणें धार्ष्ट्य हि होईल हें कबूल केलें पाहिजे ). तशांत विषयाची दुर्बोधता सुबोध लिपींत लिहिल्यानें गोप्याची लालसा तृप्त होत नाहीं असें नाहीं. मग ही संकेतप्रवृत्ति कां झाली कोणास ठाऊक !.

## संकेत

| लिखितः— | अर्थबोधः— | लिखितः— | अर्थबोधः— |
|---|---|---|---|
| अ ( =ԋ ) | = र | न | = ण |
| इ | = ह | प | = च |
| उ | = क्ष | फ | = छ |
| ए | = ए,य | ब | = ज |
| क | = य | भ | = झ |
| ख | = र | म | = स |
| ग | = ल | य | = क |
| घ | = व | र | = ख |
| ङ | | ल | = ळ |
| च | = प | व | = घ |
| छ | = फ | श | = श |
| ज | = ब | ष | = इ |
| झ (२) | = भ | स | = म |
| ञ | = म | ह | = उ |
| ट | = त | ळ | = ग |
| ठ | = थ | क्ष | = भ |
| ड | = द | ज्ञ | |
| ढ | = ध | ०। | = य |
| ण | = न | ।। | = भ |
| त | = ट | खालीं टिंब | = उकार |
| थ | = ठ | जसें ऴन | = गु( गू )ण |
| द | = ड | अनुस्वार अक्षरांत दिलेला असतो. | |
| ध | = ढ | जसें, ङीळाळ | = हींगोळ |

गो. का. चांदोरकर

# ४६ श्रीकराचार्यांचेदोन शिक्के

श्रीराजाराममहाराजांच्या कारकीर्दीत व नंतर श्रीकराचार्य हे " पंडितराव " होते ही गोष्ट प्रसिद्ध आहे. चाफळचे उपाध्ये यांजकडे व उंब्रजच्या मठांत जे

कागदपत्र उपलब्ध झाले आहेत, त्यांवरून असें दिसतें कीं, राजाराममहाराजांच्या कारकीर्दींत श्रीकराचार्यांचा जो शिक्का असे तो नंतर त्यांनीं बदलला. राजाराम-महाराजांच्या वेळीं त्यांचा शिक्का असा असेः—




तसें च त्या वेळीं मोर्तब असे तो असाः—




मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड पंधरावा त्यांत पृष्ठ २०७ २१० वगैरे ठिकाणीं शिक्का दिला आहे तो असा आहेः—




परंतु तो बरोबर नाहीं. " भजनाप्तसमुन्नतेः ॥ धर्मसं " हीं अक्षरें मला हि एकदम लागलीं नाहींत व त्या शिक्याचीं दहा वीस पत्रें मिळालीं आहेत तीं न

मिळतीं तर वरील अक्षरें संदिग्ध च राहतीं. परंतु दहा वीस पत्रांवरील शिक्के एकत्र करून मी जो शिक्का वर दिला आहे, तो बरोबर आहे, याविषयीं मला शंका उरली नाहीं.

राजाराममहाराजांच्या पश्चात् शके १६२२ तील व शके १६२६ तील श्रीकराचार्यांचीं पत्रें उपलब्ध आहेत, त्यांत शिक्का आहे तो असा:—




हा शिक्का महत्वाचा आहे, कारण त्यांत इतिहास आहे. श्रीकराचार्यांच्या वडिलांचें नांव नृसिंह पंडिताचार्य होय. रा० ब० पारसनीस यांच्या माजी भारतवर्ष मासिकांत रा० कृष्णाजी विष्णू आचार्य कालगांवकर यानीं कांहीं "जुन्या ऐतिहासिक गोष्टी" दंतकथांच्या आधारानें दिलेल्या आहेत. त्यांत त्यांनीं अशी एक आख्यायिका दिली आहे कीं, शंकराच्या वरप्रसादानें नृसिंहांना विद्या व विद्वान् संतति हीं प्राप्त झालीं. ह्या आख्यायिकेला या शिक्यांत आधार सांपडतो. नृसिंहांना पंडिताचार्य ही पदवी काशीच्या पंडितांनीं दिलेली होती. श्रीकराचार्य राजदरबारीं पंडितराज होण्यापूर्वीं च त्यांना पंडित ही पदवी होती, असें हि या शिक्यावरून निष्पन्न होत आहे.

हा दुसरा नवीन शिक्का श्रीकराचार्यांनीं योजिला त्यावेळीं पूर्वींचा "शुभंभवतु" मोर्तब बदलून त्याऐवजीं



असा मोर्तब सुरू केला. राजाराममहाराजांच्या मृत्यूनंतर मराठी साम्राज्यावर मोठें च संकट ओढवलें होतें. अशा संकटसमयीं ज्याच्या वरानें श्रीकराचार्यांचा जन्म झाला त्याची करुणा त्यांनीं भाकावी, हें युक्त च होय.

शंकर श्रीकृष्ण देव

## ४७ महाराणा अरिसिंह याचा एक ताम्रपट

हा ताम्रपट वे० रा० पुरुषोत्तम गणेश शास्त्री नानल यांस पुण्यांत एका कासाराकडे मोडींत आलेला मिळाला. तो त्यांनीं भा. इ. सं. मंडळा मार्फत प्रसिद्ध करण्याकरितां रुपा करून मजजवळ दिला. सदर ताम्रपटाचा छाप टिप-कागदावर घेऊन तो ताम्रपट मालकाकडे परत दिला आहे.

महाराणा अरिसिंह ह्यानें मेवाड येथें विक्रम संवत् १८१८ ते १८२८ पर्यंत राज्य केलें. अरिसिंह याजबद्दल जेम्स् टॉड् यानें केलेल्या "ॲनॅल्स् ॲण्ड आन्टि-क्विटीज् ऑफ राजस्थान" नांवाच्या पुस्तकांत भाग १ पानें ३९७ ते ४०६ मध्यें सविस्तर माहिती दिली आहे. ताम्रपटांतील भाषा मेवाडी मारवाडी आहे. सरकारी आर्किऑलॉजिकल् सर्व्हे ऑफ् इंडिया खात्याचे सुपरिंटेंडेंट रा० देवदत्त रामकृष्ण भांडारकर यांचे मार्फत जयपुराहून पंडित रामकर्णजी यांजकडून सदर ताम्रपटाचें भाषांतर करून आणविलें. मूळ ताम्रपटांतील मजकूर व त्याचें मराठी भाषांतर खालीं दिलें आहे. ताम्रपटावरील राजचिन्हें भाला व सही हीं पहाण्यासारखीं आहेत.

श्रीरामो जयति

श्री गणेस प्रसादातु श्रीएकलिंगप्रसादातु

सही

१–॥ महाराराजाधिराज महारांणा श्री अरसिहजी आदे.
२–शानु पींडत वीसना महादेवकस्य सराय, माजी चां-
३–पावतजीरी तीं महे धरती वींगा २५ पचीस सुदी ऊद-

४–क आघाट करे श्रीरांना अर्पण करे दींधी लागंत वी-
५–लगत घरच वीराड घर ठाम दाण मापा सुदी रुपया ५००
६–रा हासल सरव सुदीरे असरे करे दीधी सो घा ( यां ) थी वा(चो)लण
७–वीगत वीगा———————————————होगर नाही
८–१० महाराजा सुदीरसींघरी वाडीरी जायगा
९–१५ पीछोलीरा वाभणारी ज ( जा ) यगा सर ( रा ) यरे पछोकडे दख-
————————————————————णाऊ

१०– स्वदत्ता परदत्तांवा यहरांते वसुघरा षस्टी व्रष सहस्राणी वीस्टाय!
११ जायते क्रमिः[ ॥* ] प्रत दुये साह अमरदास देपरा लीषत पचली गी-
१२ रघरलाल गुलाबौत सवत १८२४ वर्ष असाढ वदी १२ शऊ

## मराठी तर्जुमा—

महाराजाधिराज महाराणा श्री अरिसिंहजी यांनीं या लेखावरून पंडित विसना महादेव यांस माजी चंपावतजीचे धर्मशाळेनजीकची २५ बिघे जमीन धर्मादाय दिली असे. नाक्यांचें उत्पन्न, इतर कर व इमारतींचें भाडें ह्या भर्व बाबींचें वार्षिक उत्पन्न अदमासें रु० ५०० चें आहे. ह्यास कोणी हिला हरकत करूं नये. ह्या जमिनीचा तपशील असाः—

१० बिघे, महाराजा सुंदर सिंहरजी यांचे वाडीपैकीं १५ बिघे, पिछोली येथील ब्राह्मणांच्या मालकीजमिनीपैकीं धर्मशाळेच्या दक्षिणेकडील भागचे अंगास आहे.

जो कोणी आपण स्वतः अगर दुसऱ्यानें दान दिलेल्या जमिनीचा अपहार करितो तो ६०००० वर्षें नरकामध्यें कृमियोनींत असतो.

लेखकाचें नांव अमरदास देपरा व खोदणाराचें नांव पंचोली गिरधारलाल गुलाबैतो ( गुलाबा याचा मुलगा ). संवत १८२४ आषाढ वद्य १२ रविवार.

गं. ना. मुजुमदार

## ४८ ब्रह्मदेवकृत शैवशक्ति ग्रंथ

भारत–इतिहास–संशोधक–मंडळाच्या शके १८३४ च्या वृत्तांत पान ३०४ वर " आळंदीची पंचक्रोशी " या मथळ्याखालील लेखांत पहिल्या कलमांत रा०

* सदरहु बाड मंडळाचे हजर असलेल्या सभासदांस दाखविलें आहे.

द० वा० पोतदार यांनीं " शिवसांप्रदायी नामदेवानें उल्लेखिलेला हा ' शैवागम ' किंवा ' शैवशास्त्रग्रंथ ' ( अ० ७०८ ) कोणता ?, अशी पृच्छा केली आहे.

श्री० नानासाहेब चंद्रचूड यांच्या अमूल्य हस्तलिखित ग्रंथसंग्रहापैकीं एका बाडांत अनेक साधुसंतांचीं अभंग, पदें, किरकोळ प्रकरणें वगैरे लिहिलेलीं आहेत. सदर बाडांत विशेष हा आहे कीं, जेथें जेथें मोकळी जागा सांपडली तेथें तेथें दुसऱ्या मनुष्यानें संतनामभजन लिहिलेलें आहे. कांहीं सत्पुरुषांचे आईबाप, गुरु, परिवार, देश वगैरेसंबधीं सुद्धां उल्लेख केलेले आहेत. अशा उल्लेखांपैकीं वरील पृच्छेस उत्तर देण्यास उपयोगीं पडण्याजोगे उतारे खालीं देत आहे.

१ " वैशाशेक्ती ब्रह्मदेव ग्रंथकर्ता ज्ञानदेव देवाधिदेवा ज्ञानदेव ॥ "

२ " शैवशक्ती ग्रथ वणन ब्रह्मदेव ज्ञानदेव याचे पुर्वि आळदीचे केले ॥ आळंकावंतीचे केले "

या उल्लेखांवरून ज्ञानदेवापूर्वी होऊन गेलेल्या ब्रह्मदेव नांवाच्या कवीनें ज्यामध्यें आळंकावंतीचे अथवा आळंदीचें वर्णन केलेलें आहे असा शैवशक्ति नामक ग्रंथ रचला असें अनुमान काढण्यास हरकत दिसत नाहीं. " ज्ञानदेव याचे पुर्वि " या कालदर्शक शब्दांवरून शैवशक्ति ग्रंथकर्ता ब्रह्मदेव विधाता नसून ज्ञानदेवाप्रमाणें कोणी तरी संतकवी असावा हें उघड दिसतें. मात्र हा ग्रंथ संस्कृत किंवा प्राकृत आहे हा बोध होत नाहीं. सदरहू बाड सुमारें शेंसवाशें वर्षांपूर्वी लिहिलेलें असावें.

गं० ना० मुजुमदार

## ४९ शिवागम

मी गेल्या चैत्र महिन्यांत मंडळापुढें ब्रह्मदेवकृत शैवशक्ति ग्रंथ यावर टांचण वाचलें. त्यांत शैवागम म्हणजे शैवशक्तिग्रंथ असावा असें लिहिलें आहे. परंतु तदनंतर मला निंबगांव येथें वे० रा० अच्युतशास्त्री खेडले यांजकडे एक हस्तलिखित पोथी मिळाली. तीमध्यें संस्कृत प्राकृत सुभाषित श्लोक असून पुढें संस्कृत आत्मबोध आहे व शेवटीं श्री एकनाथकृत आनंदलहरी दिलेली आहे. पैकीं आत्मबोध प्रकरणाच्या शेवटीं

इति श्रीशीवागमे महायोगेश्वरविराचितं हरिहरसंवादे आत्मबोधं संपूर्ण ॥

याप्रमाणें लिहिलें आहे. त्यावरून नामदेवांनीं उल्लेखिलेला " शैवागम " हा या च नांवानें ग्रंथ असावा असें आतां वाटूं लागलें आहे.

गं. ना. मुजुमदार.

## ५० शामजीसुत कृष्ण

श्री० नानासाहेब मिरीकर, अहमदनगर, यांनीं शामजीसुत कृष्णविरचित प्राकृत ओवीबद्ध वेताळपंचविशीचे २१–२४ प्रसंग पूर्ण व २५ वा अपूर्ण असा ग्रंथ मला दिला. सदर ग्रंथाचे पहिले २० प्रसंग गहाळ झालेले आहेत. हा कवी केव्हां व कोठें झाला याबद्दल कांहीं च समजत नाहीं. २१ – २४ प्रसंगांचे शेवटीं असलेल्या ओंव्या खालील प्रमाणें आहेत--

ऐसें ह्मणतां जान ॥ वेताळ गेला उडोन ॥
पुढें सांगे कथन । शामजीसुत कृष्ण ॥ २१/१३६ ॥
ईति श्री वेताळपंचेविशी । बाविसावि कथा ऐसि ॥
पुढें ऐका कथेसी । शामजि कृष्ण ह्मणे ॥ २२/९६
ईतुकें ऐकोन वचेन । वेताळ गेला पळोन ॥
पुढें ऐका अनुसंधान । शामजीसुन कृष्ण ह्मणे ॥ २३/८४ ॥
ईतिश्रीवेताळ पंचेविशी । चोविसांवी कथा ऐसी ॥
पुढें ऐका कथेसी । शामजीसूत कृष्ण ह्मणे ॥ २४/१६६

पोथीचें लिखाण व कागद यावरून ती सुमारें २०० वर्षांपूर्वी लिहिलेली असावी असें वाटतें. काव्यसंग्रहांत श्यामात्मज, शामसुत, यांचीं प्रकरणें, पदें वगैरे आलीं आहेत परंतु तो वरील कवीहून भिन्न असावा किंवा नसावा, ह्याचा निर्णय होणें आहे.

गं. ना. मुजुमदार.

## ५२ नामा पाठक–विरचित नामरत्नमाला

ज्ञानेश्वरसमकालीन प्रसिद्ध कान्हो पाठक याचा नातु नामा पाठक यानें केलेलें नामरत्नमाला नांवाचें प्राकृत ओवीबद्ध प्रकरण मजजवळील बाडांक ४ यांत आहे. ओंवीसंख्या ९९ आहे. यांत नामाचा महिमा वर्णिला आहे. नामा पाठक याचा काल शके १३०० असावा असें रा० वि. का. राजवाडे यांचें म्हणणें आहे. ( शके १८३२ चा अहवाल पान ७२ पहा. )

आदि:--

नारद म्हणे हानुमंतासी । वारे येकी कथा परीयेसी ॥
भक्ताकारणे ह्रशीकेशी । निर्गुण गुणवंत पै जाला ॥ १ ॥

माहाजीवन्मुक्त ज्ञानी । जे स्वरूपी राहीले नीराभीमानी ॥
देहे हा वींदे ( ह ) करुनी । तेणे चक्रपाणी उत्तीर्ण जाला ॥ २ ॥

अंतः--

ऐसी हि आनंदलहरीकथा । की ते ज्ञानाम्रतसरीता ॥
तेथें नामा पाठक होता । त्यांसी प्रसाद दीधला ॥ १७ ॥
नाम दीधले उदंड । पुरवीले मनीचे कोड ॥
जन्मोजन्मी आती उदंड । हा ची प्रसाद मज द्यावा ॥ १८ ॥
नामा पाठक किंकर ब्रती । प्रसाद मागे कृष्णा ( प्रति ) १९
मुखी नाम हृदई मुर्ति । संतसंगती मज द्यावी ॥ १९ ॥
ईति श्रीनामरत्नमाला संपूर्णमस्तु ॥

गं. ना. मुजुमदार

## ५२ रामदासकृत स्वरोदय

हें प्रकरण वे० रा० सिद्धेश्वर विष्णुशास्त्री चित्राव, पुणे, यांनीं मजकडे दिलें. याचीं पृष्ठें ४३ असून ओंवीसंख्या ३५२ आहे. श्रीसमर्थ व हे रामदास अगदीं भिन्न असावेत असें प्रकरणांतील भाषेवरून उघड होत आहे. तथापि श्रीसमर्थांच्या संप्रदायापैकीं च हे होते हें निर्विवाद आहे. यांत चंद्रसूर्याचीं कार्यें, सुषुम्ना, चिंताप्रश्न, तत्वज्ञानउत्पत्ति, नाडीज्ञान, संवत्सरफळ, मेषसंक्रांत, पंचतत्व-परीक्षा, यक्षप्रश्न, स्त्रीप्रश्न, गर्भप्रश्न, रोगप्रकरण, छायापुरुष, प्राणायाममुद्रा, मृत्यु-लक्षण, कालज्ञान वगैरे बद्दल विवरण आहे. रचनाकाल अथवा लेखनकाल दिलेला नाहीं.

**कवीचा नामोल्लेख—**

संक्रमणि निर्फळ जाणा । साधकि आणावे मना ।
रामदास बोले खुणा । परउपकारालागी ॥ १६३ ॥
लहान थोरा ठाई जाइजे । कि बहुतामाजी बैसिजे ।
तरि पृथ्वितत्व पाहिजे । रामदास म्हणे ॥ १७३ ॥
महासिद्ध साधुसंत । स्वरज्ञाने कीर्तिवंत ।
तया तापे अनुवादत । स्वयमेव रामदास ॥ ३५१ ॥
इति स्वरोदयग्रंथ । संमत शिवपार्वती संवाद ।
टीकार्थ रामदासकृत । ग्रंथ संपूर्ण येथुनि । ३५३ ॥

स्वरज्ञान कोठून आलें व टीका करण्याचें कारणः—

सत्य गुरुपुत्र गुरुदास । असे तो घड़ रस ।
माझ्या रामराया सुरस । वोपिला श्रीवसिष्ठे ॥ ७ ॥
तो ग्रंथ संस्कृत । कोणा न कळे वेदांत ।
म्हणउनी रामरूपे प्राकृत । वोव्या रचियल्या ॥ ८ ॥
हे स्वरज्ञान पूर्विच होते । ते कथन जाहाले महादेवाते ।
तेथुन प्राप्त ऋषिते । दत्तात्रयासि सर्व ॥ ३०६ ॥
नवीन केला नाहिं ग्रंथ । वसिष्ठें वापिला दाशरथीस ।
यथामति प्राकृतार्थ । प्रबंदरचना ॥ ३२७ ॥

हा ग्रंथ जगाचें कल्याण । व्हावे म्हणून केला जाण ।
याचे करिता विवरण । विज्ञान होय ॥ ६३९ ॥

**कवीची उपासनाः—**

श्रीदाशरथि राम । आमुचे उपासनाधाम ।
परि ये ग्रंथि विचार सूगम । पाहिला पाहिजे ॥ ४ ॥
मरुत उदरी मारुति । म्हणउनि आमुचि उपासना ती ।
जन्म याचा महत्तत्वी । उमजोन पाहा ॥ ३४३ ॥

**दासबोधाबद्दल उल्लेखः—**

स.तास ( ? ) बावी । प्रबंधि । वोवि घेतलि दासबोधी ।
साधुजानि कृपानिधि । अवडि बोल परिसावें ॥ ३२८ ॥

कवीनें आपल्या गुरूचा नामोल्लेख केलेला नाहीं.

म. ना. मुजुमदार

## ५३ पूर्णब्रह्मकृत रसप्रकरण

नागेश पंडित जोजार याचा कनिष्ठ मुलगा पूर्णब्रह्म यानें केलेलें प्राकृत श्लोकबद्ध रसप्रकरण निंबगांव ( तालुका खेड ) येथें मिळालें. यांत सोनें तयार करण्याचा विधि दिला आहे. श्लोकसंख्या २३ आहे. पोथीचा लेखनकाल शके १७११ आहे. त्यावरून हा पूर्णब्रह्म कवी शके १७११ चे पुर्वी होऊन गेला असावा हें उघड आहे.

**आदिः—**

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥

भलां दाता ... इतर वनिता मानिल मनीं ।
अधर्माला साधी परि धन न पाहेल नयनी ॥
सदा चिंतीं चित्तीं हरिहरदयासिंधुचरणा ।
तया धातुर्वादें करून उपजे जाण निपुणा ॥ १ ॥

अंतः—

जोजार जाण उपनाम अगस्ति गोत्रीं
नागेश पंडितमणी रुचि वेदशास्त्री ॥
त्याचा कनिष्ठ सुत तो कवि पूर्णब्रह्में
वंदूनि रामचरणा कथि हेमवर्णे ॥ २३ ॥
॥ इति श्री रसप्रकर्णं ॥ श्री विश्वेश्वरार्पणमस्तु ॥
॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

शके १७११ सौम्यनामसंवत्सरे आषाढ शुद्ध अष्टम्यां जुंनरपुरे जयरामेण लिखितं ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

रसप्रकरणावर संस्कृतांत प्रायः रचना सांपडते. प्रस्तुत स्थलीं रसप्रकरणावर मराठी श्लोकबद्ध रचना आहे. ह्मणजे रसप्रकरणावर मराठींत ग्रंथरचना झाली होती, असें ह्यां श्लोकांवरून ह्मणण्यास आधार होतो.

गं. ना. मुजुमदार

## ५४ सोहं सुदर्शन

हें प्रकरण हैबती या साधूचें आहे. साधुमजकूर मराठा असावा असें नांवावरून दिसतें. लेखक शिष्ट मराठी भाषा बोलणारा नाहीं. प्रकरणाची अशुद्ध भाषा हैबतीची च मूळची आहे किंवा मूळच्या शुद्ध भाषेचा अपभ्रंश कोण्या अशिष्ट लेखकानें केला आहे ह्याचा निश्चय करण्यास सध्यां साधन नाहीं.

गं. ना. मुजुमदार

सोहुं सुंद्रार्शेण

श्रीगुरुनाथायेनमा ॥ छ ॥ॐ आत्मायारामायेन्मा ॥
ॐ हुं सोहुं ब्रह्मं हे ध्यांन ॥ ॐ हुं सोहुं ब्रह्मं नीर्गुनं ॥
ॐ हुं सोहुं सद्गुरु राम नीरांजेनं ॥ सोहुं शेब्द हा सद्गुरुनाथहो ॥ १ ॥
ॐ हुं सोहुं ब्रह्मं संमी ब्रह्मां ॥ ॐ हुं सोहुं ब्रह्मं आत्मया रामा ॥
ॐ हुं सोहुं ब्रह्मं आवीनासा मेघशामा ॥ सोहुं कल्पधामा भेट मज देन ॥ २ ॥
तुच सांव शेक्ती सदासीवा ॥ तुची कृष्ण रुक्मीनी कृष्ण देवा ॥
तुची सगुन नीर्गुन जालासी केसवा ॥ राधा रुक्मीनीच्या रमना ये ॥ ३ ॥

ॐ हुं सोहुं ब्रह्मं ब्रम्हांड नाईका ॥ आहुं सोहुं ब्रह्मं भक्तरक्षका ॥
ॐ हुं सोहुं ब्रह्मं लक्षुमीनाईका ॥ विन्नंती माझी अैका ॥ गोवींदाहो ॥ ४ ॥
ॐ हुंकार हा शेब्द ॥ सोहुं सुद्रासैन सोहुं शेब्द ॥
ॐ हुं सोहुं ब्रह्मं ब्रह्मानंद ॥ सोहुं शेब्द ब्रह्म भेदाभेद ॥ ५ ॥
सोहुं शौद्राज्ञन ज्याच्या हातीः ॥ तोची जाणा कृष्ण श्रीपती ॥
च्यान्ही वेदशाश्र पुरान गर्जती ॥ ॐ हुं सोहुं ब्रह्मं संमाधी हे ॥ ६ ॥
ॐ हुं सोहुं ब्रह्मं हे शुद्रासैन ॥ ॐ हुं ब्रह्मं ब्रह्मे नीर्गुन ॥
सोहुं ब्रह्म जाने श्रीकुष्ण ॥ सोहुं निशांन दंतात्रीयाच ॥ ७ ॥
हा परब्रह्मं सोहुं यांन कुंतातां ज्यासी करी वंदन ॥ चौ सुंन्याचे सार बीज पुर्न ॥
सीव विस्नुचे देवा आचरन ॥ सोहुं ध्याण हे सोहुं गीता ॥ ८ ॥
सोहुं ब्रह्मं ध्यान गंगा गीता ॥ सोहुं ब्रह्मं भगवत पार्था ॥
ॐ हुं सोहुं ब्रह्मं ध्याण सर्व मुत्ळे दाता ॥ शुन्य ध्यान हे सोहुं ब्रह्मं हे ॥ ९ ॥
कोटी पुंन्ये सुस्कृत पदरीं ॥ कोटी वेत्ळे मलीका आर्जुन जरी ॥
हारद्वार बंद्रीकेदार रामेश्वरा ॥ इतुके पुंन्ये तेंव्हा ब्रह्मप्राप्ती ॥ १० ॥
सोहुं ब्रह्मं गाईत्री साराची सारं ॥ सोहुं आजेपा ध्यान उनमुनी बा ॥
ॐ हुं सोहुं धडा सार सार आहुं सोहु ब्रह्मं संमी उनंुनी मुद्रां ॥ ११ ॥
हे ध्यान ब्रह्मं संमाधी ॥ सोहुं ब्रह्मं शेकर तो साधी ॥
सोहुं ब्रह्मं हे माझी संमाधी ॥ ॐ हुं सोहुं ब्रह्मं गोप्ये करी ॥ १२ ॥
सोहुं ध्यांण हारती वीघ्न ॥ सोहुं ध्यांण खडे जन्ममरन ॥
सोहुं ध्यांण कात्ळ कर्म हारन ॥ सोहुं बीदं आजेरा आमंर ॥ १३ ॥
सोहुं ध्यान ते आमृत ॥ योगभ्रष्ठासी होये प्राप्ती ॥
कोटी अनुष्टान च्यान्ही वेद ध्याती ॥ देवदत्त गोरक्षे ध्याती जे ॥ १४ ॥
नवनाथ जे ध्याती ॥ चौन्यासी सीधाची पुर्नसार संमाधी ती ॥
सत्ये सांगे श्रीपती पार्थाप्रती ॥ आध्या अत्मप्राप्ती सोहुं ब्रह्मं ॥ १५ ॥
सर्वा सीधी साधन साहुं धास्य संमाधी ॥ येकनाथ येक आक्षेर साधी ॥
हैयती म्हणे आधी व्याधी सर्वा सीधी साधी सोहुं मंत्र ॥ १६ ॥
ईती श्री सोहुं सुंद्राशेण संपुर्न ॥ नमस्तु श्री आर्पनणं

~~~~~

## ५५ बळवंतकृत योगवासिष्ठसार

ग्रंथनामः— योगवासिष्ठसार

ग्रंथकारः— बळवंत
~~~~~

लांची रुंदी:— ६ इंच × ३ इंच

पृष्ठें:— २२ × २

पंक्ति:— दर पृष्ठास ५

अक्षर:— महाराष्ट्री बालबोध अर्वाचीन

विषय:— वेदांत

ग्रंथरचनाकाल:— बहुशः शके १७२४

ग्रंथलेखनकाल:— शके १७२४

कागद:— जुनरी

स्थल:— वटपुर

भाषा:— मराठी

रूप:— बांधीव गुटका.

ग्रंथसंख्या:— ओव्या १०१.

टीप:—

ह्या गुटक्यांत एकंदर तीन प्रकरणें आहेत;–( १ ) संस्कृत गर्भगीता, ( २ योगवासिष्ठसार मराठी, ( ३ ) योगवासिष्ठसार हिंदी. पैकीं प्रस्तुत प्रकरणाच आदि येणेंप्रमाणें:—

श्रीगणेशायनमः ॥ अथ योगवासिष्ठसारे ॥
गुह्याद्गुह्यव्याख्यान शतश्लोकस्य प्राकृत वोवि प्रारभ ॥

अंत:—

दिनदयाळ सद्गुराज ॥ श्रीजयरामदासमहाराज ॥
अभ्यागत योगिराज ॥ बळवंत त्यासि शरण गेला ॥
त्याचीया कृपेकरून ॥ योगवासिष्ठसार जान ॥
शेतकात केले कथन ॥ सर्वातिल सार जे ॥ ९८ ॥
ऐसि सद्गुरुमहिमा ॥ जालि बोलायाची सीमा ॥
मज पामरा हाति सार प्रेमा ॥ बालविला योगसंवाद ॥ ९९ ॥
इति श्रीयोगवासिष्ट ॥ वसिष्ट राम संवादे ॥
गुह्यातिल गुह्य प्रसिद्धे ॥ सारांष सार कथियला ॥ १०० ॥
जे नित्य पाहातिल ग्रंथ ॥ त्यासि च कळो येईल अर्थ ॥
त्याचा जाइल भवस्वार्थ ॥ सत्य सत्य त्रिवाचा ॥ १०१ ॥
इति श्रीवासिष्टसारे ॥ कवण *( बळतराव ) माणकेस्वर ॥

---

* मूळ पोथींत बळवतराव ॥ कवण माणकेश्वर ॥ असें लिहिलेलें आहे. " कवण बळवंतराव माणकेश्वर " किंवा " कण्व बळवंतराव माणकेश्वर " असा दोन प्रकारानें स्पष्टार्थ केल्यास शक्य आहे. त्याशिवाय " कवण " याचा अर्थ नीट लागत नाहीं.

चाफळकर ॥ देशपांडे वटपुरे ग्रंथ जाला
सं ( व ) त ॥ १८५८ ॥ श्रीमुखनामसंवत्सरे ॥
चैत्रवद्य ॥ ६ ॥ गुरुवार संपूर्ण शके ॥ १७२४ ॥ शुभं भवतु श्री ॥

ह्या प्रकरणाचा कर्ता बळवंतराव माणकेश्वर चाफळकर रामदासपंथी होता असें दिसतें. हा ग्रंथकार शके १७२४ मध्यें विद्यमान होता. ह्यानें आपलें गांव वटपुर असें दिलें आहे. वटपूर हें संस्कृत ग्रामनाम कोणत्या मराठी शब्दाचें संस्करण असावें तें निश्चयानें सांगतां येत नाहीं. वटपूर म्हणजे वडगांव होऊं शकेल, वडनगर होऊं शकेल, किंवा वडूर हि होऊं शकेल.

गं० ना० मुजुमदार

## ५६ माधवकृत गणेशपुराण

हा ग्रंथ वे० रा० सिद्धेश्वर विष्णुशास्त्री चित्राव, पुणे, यांनीं कृपा करून मजकडे दिला. रा० विनायकराव भावे यांच्या माहाराष्ट्रकाव्यग्रंथांच्या यादींत माधव कवीच्या नांवाखालील ग्रंथांच्या यादींत गणेशपुराणाबद्दल उल्लेख आहे. म्हणून याबद्दल माहिती मीं त्यांस विचारतां नगर प्रांतीं या ग्रंथाची प्रत पाहिल्यावरून यादींत नोंद केल्याबद्दल त्यांनीं कळविलें. सदरहू ग्रंथ छापलेला नाहीं. या कवीबद्दल सविस्तर माहिती रा. शंकरराव देव, धुळे, यांनीं मजकडे पाठविली त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

माधव कवी हे रामदासी होत. त्यांचा मठ तंजावराकडे आहे. चित्रिवंदुर म्हणजे हल्लीं ज्यास आपण त्रिवेंद्रम म्हणतों तेथें आहे. यांची परंपराः—

श्रीसमर्थ
|
राघव
|
माधव

राघवांचा मठ हि तंजावरच्या पूर्वेस पांच कोस कोनूर आहे तेथें आहे. माधव हे राघवांचे शिष्य. माधवांची ग्रंथरचना प्रचंड आहे. साद्यंत भारत, रामायण, योगवासिष्ठ व वरील गणेशपुराण इत्यादि त्यांचे मोठाले ग्रंथ आहेत. भा० इ० सं० मंडळाचें इतिवृत्त शके १८३५ यांत तंजावरच्या सरस्वतीमहालाच्या हकीकतीच्या पृष्ठ २, ९, व २१ वर माधवाबद्दल उल्लेख आहे.

**ग्रंथरचनाकालः--**

( १ ) पूर्वार्ध अंतः—
मार्गशीर्ष वद्य संकष्ट चौथी । शुक्रवारीं कथा आरंभिली अति ॥
माघशुद्ध इंदुवासरी समाप्ती । घडली चौथी ते हि दिवसीं ॥ १०१ ॥

उत्तरार्धः--

यातीं ऐकों पाहात काये । ऐसा सूत वदला रमणिय ।
सकळ साधणार जय । नामें विजय संवत्सर ॥ ८२ ॥
भाद्रपद कृष्ण भानु सप्तमी । तें गणेशपुराण चौथे यामी ।
संपलें रवि संध्याकाळ नेमीं । पावन हें भूमिजनासि कर्तें ॥ ८३ ॥
आध्ये चारि विसावरिच्यारि । संख्याचि ह्मणों नकातें निर्धारीं ।
चुकविणार चौऱ्याशी लक्ष फेरी । येकवीस कुसरी भाग तुशा ॥ ८४ ॥

रचनास्थलः—

प्रसिद्ध जे कां गौरीमयोर । त्या समीप चि त्रिवंदुर ।
उभय ग्रामामध्यें नीर । प्रवाहे सुंदर कावेरीचें ॥ १८५ ॥
तीचिया वामभागीं देवालयीं । रामलक्षण सिता असति तिथें हि ॥
सन्मुस........हीं । ग्रंथ ते ठाइ समाप्त जाला ॥ १८६ ॥

अंतः —

नानारूपधारी श्रीरघुविर । तो अणीं वेगळा नव्हे लंबोदर ।
तत्कथाश्रवणें जगदोद्धार । घडत विर्धिचार माधव ह्मणे ॥ १८७ ॥

इति श्रीगणेशपुराणे उत्तरखंडे फळश्रुतिवर्णनं नाम चतुरासीति अध्यायः ॥ ८४ ॥ छ ॥ श्रीरस्तु ॥

ग्रंथसंख्याः--

पूर्वाधाचे ४२ व उत्तराधांचे ८४ एकूण १२६ अध्याय आहेत व ओंवी संख्या सुमारें १०००० पावेतों असावी. सदर पोथीचीं पानें ५०० आहेत पैकीं ४६२ वें पान गहाळ आहे. पूर्वार्धांत उपासनाखंड व उत्तरार्धांत उत्तरखंड असे दोन भाग आहेत.

माधवानें केलेले रामायणांतील शेवटीं असलेल्या भागांत कवीनें कालस्थल-निर्देश विशेष स्पष्ट केलेला आहे.

शके पंधरा आगळी सोळाशत । समाप्तीसी पावला ग्रंथ ।
कुंभकोण प्रसिद्ध काशीपर्यंत । तो प्रांत समीप श्वेतारण्य ॥ ५२ ॥
प्रख्यात जें कां गौरीमयोर । त्या समीप चि त्रिवंदुर ।
उभय ग्रामामध्यें नीर । प्रवाह सुंदर कावेरीचे ॥ ५३ ॥
त्या कावेरीचे वामभागीं सुंदर । लघु देवालये मनोहर ।
माजी लक्ष्मण सीतेसीं रघुवीर । वस्तीं करी जगदात्मा ॥ ५४ ॥
श्रीमुखनामसंवत्सर । वैशाख कृष्ण द्वितीया गुरुवार ।
ते दिवशीं ग्रंथ संपला प्रहर । दिवस जाला होता ॥ ५६ ॥

परंपराः--

रामदास प्रसिद्ध भूमी । त्याची परंपरा आम्ही ।

गुरुपरम सत्कार्मी । राघवदास ॥ ५९ ॥

गाणपत्यांस परम प्रिय असा हा ग्रंथ छापून बाहेर निघेल तो सुदिन.

गं. ना. मुजुमदार

---

## ५७ भट्टंभट्टात्मज शिवराम ( अकोलकर )कृत चैतन्यचंद्रिका

वे. रा. अच्युतशास्त्री खेडले, निंबगांव, यांजकडे एक वही मिळाली. तीमध्यें श्रीशंकराचार्यकृत संस्कृत सदाचारावर प्राकृत ओंवीबद्ध टीका समूळ आहे. हि टीका कोणीं केली याबद्दल कांहीं च उल्लेख नाहीं. यापुढें वरील चैतन्यचंद्रिका प्राकृतांत वेगवेगळ्या वृत्तांत श्लोकबद्ध आहे. या प्रकरणाचे एकंदर श्लोक ६४ आहेत.

आरंभः—

नत्वा श्रीशंकराचार्यं गुरूं भट्टाभिधं तथा ।
मया देशीयवाचेयं रच्यते चितिचंद्रिका ॥ १ ॥

गगनोपम सत्या चांगलें । गगनातें गिवसूनि राहिलें ॥
गगनादि जयासि नातळे । गगना त्या नमितों सदा भलें ॥ २ ॥
शरीरामधें चिन्मयी देवता हे । अहंकारवेषें सदा भासताहे ॥
अवस्थात्रयीं एकली वर्तताहे । असंगत्वरूपें सदा नांदताहे ॥ ३ ॥
अंधकारामधें वस्तु जे ना दिसे । त्यांत हि काय तें स्वस्वरूप नसे ।
मोहयोगें तसी चिद् दिसेना जरी । काय तें नाहीं होईल देहीं तरी ॥ ४ ॥

शेवटः—

एसें तैसें कांहीं नसूनि जें उरे । तें जाणुनी जो जनमंडळीं फिरे ॥
दुःखें अनुद्विग्न वितृष्ण राहतो । तो राजयोगी कृतकृत्य शोभतो ॥ ६२ ॥
श्रीभट्टपुत्रकविनें शिवरामनामकें
मूढप्रबोधघटनार्थ विचित्र कांहिंसी । केली असे परम हे चितिचंद्रिका असी ॥६३॥
विख्यात अकोलकरोपनामकें श्रीभट्टपुत्रें शिवरामनामकें ॥
स्वचित्तबोधार्थ असा प्रकाशिला हा ग्रंथ म्यां हो गुरुपायिं अर्पिला ॥ ६४ ॥

इति श्रीमहापंडित दादंभट्टात्मज वैदिक महादेव भट्टसुत न्यायवेदांतज्ञ भट्टं भट्टात्मज वेदांतरहस्यज्ञेन वैदर्भदेशनिवासिना अकोलकरोपनामकेन शिवराम भगवदनुचरेण रचिता चैतन्यचंद्रिका शके १६७८ धातृनाम संवत्सरे वैशाख शु०

१४ गुरुवासरे द्वितीयप्रहरे प्रतिष्ठानक्षेत्रे कालिकाघटे कालिकादेवालये समाप्तिमगमत् ॥ श्रीगुरुपरमहंसार्पणमस्तु ॥

या उताऱ्यावरून कवीची परंपरा स्पष्ट समजेल च. वर दिलेला काल रचनाकाल आहे किंवा प्रतीचा लेखनकाल आहे याचा स्पष्ट उमज पडत नाहीं. वरील वही अगदीं अलीकडे म्हणजे सुमारें २०।२२ वर्षांपूर्वी लिहिलेली आहे. परंतु लेखकानें ज्यावरून उतारा केला तेथील मजकूर जशाचा तसा च घेतलेला दिसतो. तथापि एवढी गोष्ट सिद्ध आहे, कीं हा कवी शके १६७८ च्या पुढील नसून त्यावेळेचा अथवा तत्पूर्वीचा असावा.

गं. ना. मुजुमदार

## ५८ करीना चाल देशपांडेपण

पूर्वी देशपांड्यांच्या वृत्तींत भाऊबंद वांटणी झाली असतां कामाची वांटणी कशी करीत असत याबद्दल एक करीना व त्यावेळीं निरानिराळ्या प्रांतांत कशी वहिवाट चालू होती हें दाखविणारी एक याद असे दोन कागद श्री० नानासाहेब मिरीकर, अहमदनगर, यांनीं आपल्या खाजगी दप्तरांतून काढून दिले ते मंडळापुढें सादर करीत आहें.

गं. ना. मुजुमदार

फारसी शिका

फारसी मजकूर

करीना चाल देशपांडियेपण भाऊपणियाची देहाये प्रत नेवासे सुरु सन मु०॥ ईा मुल पुरुष दसखत व सिरपाव व सिरस्ता दप्तर देहात वगैरे बिा

मूल पुरुष येक त्यास पुत्र २
दोघे ]तकसीमा बाो सनद फर्मान
व दिवानी २ सिरपाव दोन

| | |
|---|---|
| वडील रामाजी देशपांडिये देहात निमे व इनाम येकराम निमे प्रथम सिरपाव व सिरस्त दफ्तर १ येक पुढें | धाकटे मुधाजी देशपांडिये देहात निमे व इनाम येकराम निमे सिरपवा वडिलामागें [सिरस्ता दफ्तर दुसरें |

विस्तार जालियासी हिसे रसद देहात वाटणी वदभाऊ आपल्या हिस्याच्या गांवावर दसखतें करून हक इनाम घेत असेत दप्तर सिरस्ता बो साले २ येके साली येकाने जमा ल्याहावी येकाने वसूल ल्याहावा कागदपत्र दरबारी जाले तरी जमेवर व बाकीवर दसखात मोहगम देशपांडिये व वस-लातीवर दसखत सालाज्या धणीयाचे नावाचें असे दिवाणचा सिरपाव जाला तरी वडीलानें कचेरीस घेऊन घरी हिसेप्रमाणें वांटून द्यावा साले सिरस्ता तकसीमप्रमांणे असेत.

विस्तार जालियासी हिसेरसद देहात वाटणी वदभाऊ आपल्या हिस्याच्या गावावर दसखानें करून हक इनाम घेत असेत सिरस्ता बो सालें तपसील प्रमाणें सिरपाव याजपैकी वडील घर आहे त्यानीं दरबारी घेऊन सर्वास हिसेरसद भावास वाटून देत असेत साले दप्तर तकसीमप्रमाणें असेत

यादी वर्तनूक दसखत व दफ्तर देशपांडि ×
वडील भाऊ व धाकटे भाऊ

वडील भाऊ दसखत मोहगम देशपांडियान म्हणोन दरबारी कागदावर करितो व दफ्तरें दोघा हि भावाची चालत आहेत या चालीचे प्रगणे

१ प्रा अंबड दफ्तरे
सा चालत आहेत
१ प्रा पैठण
१ प्रा नेवासे
३
१ प्रा जाल्हनापूर दसखते मोहगम
देशपांडिये व दफ्तर शामील,
४

१ पाथरी तुमारी कागदावरते दसखत
वडीलभाऊ मोहगम करितो सालती
दसखते नांवाची पांचा जनाचीं होत
आहेत दफ्तरें ५ चालत आहेत
१ प्रा पडदूर मूल पुरुष येक त्याचे
पुत्र तिघे जण तीन दफ्तरे चालत
आहेत
१ प्रा नासीक
१ प्रा सिनेर
४

दसखते वेगळाली व दफ्तरें वेगळाली
दोघा हि भावाची चालतात या चालीचे
प्रगणे

१ प्रा राजणी
१ प्रा सेषली

१ प्रा अकोलें

दसखते शामील दोघाचे नावची व दफ्तरें
शामील

१ म्रा दाभाडी मूल पुरुष येक विस्तार ४ चोघाच्या हि नावाची दसखते होत आहेत

७ कानुगो सुबे अवरंगाबाद याचे दफ्तरच्या करान्यावमोजीव प्रमाणे दसखत शामील व दफ्तर तालयंदा प्रमाणे

१ म्रा रासीन
१ म्रा अष्टी
१ म्रा पाडिये पेडगो
१ म्रा जामखेड
१ म्रा वांसी
१ म्रा वारसी
१ म्रा तांवसी
८
१०

१ म्रा सिंदखेड मूल पुरुष येक त्याचा विस्तार दोघे दोघा जणाची हि दसखते होत आहेत

१ म्रा चाकणे मूल पुरुष येक त्याचे पुत्र दोघे याचा कजिया श्रीमंत कैलासवासी याचे वेळेस विल्हे लागला

दोघा भावाची दसखते होत आहेत
२

दसखत वडील भाऊ करीत आहे
दफ्तर धाकटे भाऊ लिहीत आहे या
चालीचे प्रमणे

१ म्रा भोकर्दन
१ म्रा पाटोदे
१ म्रा रोशनगाव
१ म्रा लोणार
१ म्रा मेहकर मूळ पुरुष एक याचे पुत्र तिघे
१ वडील भाऊ दसखत करितो
१ धाकटा भाऊ दफ्तर लिहितो
१ मधील भाऊ रेघ वोढितो
३
१ म्रा वाह्मणी
६

१ अकोटा
१ म्रा अडगाव
२ म्रा जांबूत जलगाऊ
१ म्रा पणज माहागाऊ
१ म्रा सुरजी अजनगाव
१ म्रा अवडापूर
७

म्रा बालापूर ताहाद आळजपूर माहाल दाहावीस तेथे हि हे चाल आहे

या सिवाये सुभे खानदेश वराड प्रांतीचे हि
माहालात चाल आहे याचा शोध करून खबर
पाहावा प्रांत पुणे येथें हि चाल आहे

## ५९ धनगराच्या ओंव्या हप्ता २ रा

चालु सालीं भरलेल्या मंडळाच्या संमेलनांत धनगरांच्या दोन ओंव्या मीं प्रविष्ट केल्या होत्या. आज पुन्हा अशा च प्रकारच्या आणखी दोन ओंव्या सादर करण्याचा सुयोग येत आहे. सुयोग च म्हटला पाहिजे, कारण धनगरांच्या मागें ।गून व रात्रीची वेळ गांठून ज्या रानांत त्यांचीं मेंढरें बसलीं असतील तेथें जाऊन त्यांची मनधरणी केल्या वाचून त्या मिळवितां येत नाहींत. धनगर लोक दिवसा मेंढरांच्या मागें वणवण हिंडून दमलेले असल्यामुळें नियमितपणें व नियमित वेळीं रात्रीं जागून ओंव्या म्हणून दाखविण्यास ते फारसे खुष नसतात आणि त्यांना तसें करण्यास प्रवृत्त केलें च तर आपल्या योजनेप्रमाणें ठराविक काम त्यांच्या हातून घडत नाहीं, त्यामुळें त्या कामीं बरा च त्रास व जिकीर सोसावी लागते. अर्थात् दहा पाच ओंव्या एकदम एका सपाट्यासरशी व पाहिजे त्यावेळेस मिळविणें अशक्य होऊन जातें. असो; सध्यां मिळालेल्या २ ओंव्या पुढें दिल्या आहेत व आणखी दोन तरी ओंव्या येत्या संमेलनापर्यंत पैदा करण्याचा माझा विचार आहे. दिलेल्या ओंव्यांतील कित्येक शब्दांचीं रूपें व शब्दप्रयोग यांचें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें फार महत्व आहे; तसें च त्यांतील कथाभाग व वर्णनपद्धती यांचा हि ऐतिहासिक दृष्ट्या बरा च उपयोग होण्यासारखा आहे.

### ओंवी १

हं, सुंबराण मांडल । माळावैल्या धन्याच । सदरच्या स्वामीच । सुंबराण० धृ०॥ धरतरी बा मातच । सुबराण मांडल । मेघराया पित्याच । सुंबराण मांडल । गुरूकूळस्वामीच । सुंबराण मांडल । कैलासाच्या सांभाच । सुंबराण मांडल । तवाच्या बा येळला । इटल बा ब्रमल । दोघजण बंदुगा । बंदु बोलु लागल । जागा बगाय जायाच । दोघजण बंदुगा । बंदु बोलु लागल । दोघांत बा तिनवा । तिनवा बा असावा । कामधंदा सांगायला । इटल ब्रमल देवान । अंगच बा मळ । मळ देवानीं काडिला । पुतळा बा बनविला । आमरत शिपल । साजिवंत केलाय । इटल बा ब्रमल । दोघजण बंदुगा । बंदु बोलु लागल । नाव त्याच ठेवायचगा । भट यान बा बिरामन । बिरामन बा बलवून । भट बिरामन बलवून । मग †जानत

† जाणता

बा जोसी । जोसी बलवून आंडला । नाव तेच बा ठेवितर । पोथी वाचु बा लागला र । हा । हा । मग पोथींत बा नावू र । नाव त्याच बा काडल र । हा । हा । माजा सोमा यंव मालदार । माझा बुद्धीचा सागर । र । हा । हा । नांव त्याच बा ठेवल र । बाळ दिसा मासा वाढ र । हा । हा । कांहीं दिवस झाल्यात । र । हा । हा । बारा वर्स बा झाल्यान । माझ इटल ब्रमल । र । हा । हा । जागा बैगाय निघाल । र । हा । हा । याव निघोन चालल र । हा । हा । कुंडलच्या माळाला गेल । गेले कुंडलेच्या माळाला । याव जागा बा बगींत । जागा इना बा धेनाला । जागा इना बा मनाला । तथ *कुंडबा रचला । नाव कुंडलगाव बा पडल । याव इटल ब्रमल । याव निगुन गा चालल । गेल इंगल कडोली मांळाला । जागा बगु बा लागल । देवा सुंबराण मांडल ॥ १ ॥ देव खडकाच्या माळाला । जागा बगु बा लागल । जागा आलाया धेनाला । जागा आलाया मनाला । माजा बरमल । बरमल बेरोबा देवान । तत निशाण टाकल । तत निशाण रोवल । इटल ब्रमल देवान । कांबळा †भोळा बा मारून । निद्रासंयम जाहाल्यात । मग कलया देवान । चाडि तव्हा बा केलिया । धनगराचा बा याव गा । जागा मागायला आल्यात । जागा देउ बा नका । धनगराच बा याव गा । भारी हायेत खस्याळ । ढोल गा केतान वाजल । कानस्या माज बा बसल । धगगराच बा याव गा । भारी हायेत खस्याळ । बकर मग बा कापत्याल । मी गा हायेबा लिंगाइत । त्या बा रगताचा पाट । माज्या म्होरन जाइल । मला नाहीं बा खपायच । माज्या कलया देवान । चाडि त्यान बा केलिया । माजा लिंगुशा पाटील । मग ह्यो दत्तोबा कुलकर्णी । मग ह्यो जगतापा चवगुला । बोलु तवा लागल । नाही जागा देत गा । म्हणून बा बोलल । सुंबराण मांडल० ॥ २ ॥ इटल बा ब्रमल । दोघेजन बंदुगा । बंदु बोलु लागल । सोमा माज्या मालदारा । गावामंदी जावाव । कस काय बगाव । कुटला कोण ह्मणतय का । सोमा माझा मालदार । गावामंदि गेलाया । आळो-आळी फिरला । कोठला कोण ह्मणीना । सोमा माझा मालदार । बुद्धिचा बा सागर । माघारा बा फिरला । खडकाच्या बा माळाला । माळाला बा गेलाया । इटल बा बरमल । याव बोलु लागला । कस काय सोमार । कोठला कोण ह्मणीना । इटल ब्रमल याव गा । राग्याल बा कुंग्याल । भरम त्यात रातला । रातला बा बोलल । ×××× सोमा माज्या मालदारा । बुद्धीच्या बा सागरा । बुद्ध तुमी करावे । भर मधान रातला । काकला बा वाटवा । भंडाऱ्याचा वाटवा । वाटवा घेऊन

---

* कुंड=पाण्याचा कुंड=हौद, कुंडी इत्यादि

† अंगाभोंवतीं गुंडाळून ( भोळ = भोंवतीं, सभोंवार ) अथवा कांबळ्याचें पाल उभारून

गावातं । गावातं बा गेलाया । गावांच्या बां मदालं । उभा मग राहिला । गावावर गा भंडारा । भंडारा बा टाकिला । सोमा माझा मालदार । माघारा बा फिरला । खडकाच्या बा माळाला । माळाला बा आलाया र । इटल बा ब्रमल र । बोलु तवा लागल । कस काय सोमा गा । गावाव र भंडारा गा । भंडारा बा टाकला गा । सुंबराण मांडल ॥ ३ ॥ सवळच्या पान्यात । इटल बा ब्रमल गा । द्याव बोलु लागल । सोमा माज्या मालदारा । गावामंदि जावाव । बुद्धिच्या बा सागरा । बुद्द तुम्ही करावी गा । सोमा माजा मालदार । निघून बा चालला र । गावामंदि गेलाया र । याळो याळी फिरला । गाव आंधळा झालाया र । तिघजण डोळस । लिंगुशा बा पाटील । जगतापा चवगुला । दत्तो मग कुरकळणी गा । तिघजण डोळसगा । गाव सर्व आंद्ळ । आंद्ळ बा झालया । सोमा माझा मालदार । गावातन फिरून । माघारा बा निघाला । तिघजण बसल्यात । चावडीत बसल्यात । लिंगुशा बा पाटील । पाटील बा बोलला । कुटला तू र धनगर । कुण्या गावचा धनगर । कुट मग जातोस । खान मान देशातला । तुला काय कळतय का । मला नाहीं कळत । दोघजण बंदुगा । बंदु माझ हायेत । त्यासनी मग कळत । मला नाहीं कळत । तुज मग बंदुगा । कुठ हाइत याचा र । खडकाच्या बा माळाला । माळाला बा बसल्यात । लिंगुशा बा पाटील । पाटील बा बोलला । दोघजण बंदुगा । हिकड लावून देवाव । सोमा माजा मालदार । बुद्धिचा बा सागर । सागर बा बोलला । तुला मग गरज । गरज बा असल । तर तुम्ही मग येवाव गा । तुम्ही मग येवाव । खडकाच्या बा माळाला । लिंगुशा बा पाटील । जगतापा चवगुला । दत्तो मग कुरकळणी । निघोन बा चालल । खडकाच्या बा माळाला । माळाला बा गेल्यात । बोलु तवा लागल । इटल ब्रमल देवाना । तुमाला काय कळतय का । आमाला नाहीं कळत । तुज्या मग कलया । कलया बा देवाला । देवाला बा कळत । सुंबराण मांडल ॥ ४ ॥ इटल बा ब्रमल । बोलु तवा लागल । लिंगुशा बा पाटलाला । तुज्या मग गावाला । डोळ आमी देउगा । कांबळ्याच्या दोन्या गा । दोन्या इकता जागा गा । जागा आमाला देवावा । पाटील बा कुरकळणी । बोलु तवा लागल । गावाचा बा इचार । इचार बा घेऊन । मग तुमाला सांगतो । लिंगुशा बा पाटील । पाटील बा बोलला । इटल ब्रमल देवाला । देव गा बोलु लागल । इचार घेऊन सांगाव । तुज्या मग गावाचा । देतो म्हणून बोलल । म्हणून बा बोलल । तीन गा माळा लावाव्या । तिघजण तीन गा । तीन माळा लावल्या । खडकाच्या बा माळाला । मिळाला बा गेल्यात । देवाच्या बा भवतन । फेरा त्यानी टाकला । फिरगा जगतापा चवगुला । बोलु तवा लागला । इटल ब्रमल देवाला । देवाला बा बोलला । गावाला बा डोळ गा । डोळ मग गा देवाव । सुंबराण मांडल ॥ ५ ॥ तवाच्या बा येळला । इटल ब्रमल द्याव गा । द्याव बोलु

लागल । गावाचा बा धनी गा । धनी कंचा बळकावा । इटल ब्रमल देवान । भंडारा बा टाकला । तिगाच्या बा कपाळा । कपाळाला लागला । सुंबराण० ॥ ६ ॥ इटल ब्रमल देव गा । जागा मागु लागल गा । गोरगरीब बोलत्यात । आमचा सगळा जागा गा । जागा तुमी बा घेवावा । डोळ आमाला देवाव । मग इटल बरमल । देवानी भंडारा टाकला । गावाला डोळ बा दिल्यात । याव बोलु बा लागल । जागा आमाला देवावा । माज्या चवगुल्याच्या बाळा । चवगुल्याच्या बाळाला । दोरा धराय लावला । इटल ब्रमल देवान । दोरा मग सोडला । सिवार बा आसल । लिंगुशा बा पाटील र । पाटील बा बोलला र । घेगा देगा आवरून । तुज्या मग खपाएवडा । सुंबराण मांडल ॥ ७ ॥ याव बोलु लागल । लिंगुशा बा पाटलाला । जागा दिला तसा गा । लाकड बा देवावी । लिंगुशा बा पाटील । पाटील बा बोलला । लाकड बा दिन गा । कण कवार गाइ गा । बद बारा वरस । वरस बा फळना । इना मग फळना । गइ गा मग येवावी । येवावी बा फळावी । बद बारा वरस । वरस बा झाल्यात । चावडीच्या पारावर । वट गा बा पिपळ । पिपळा पालवी फुटावी । मग लाकड दीन गा । माज इटल बरमल । याव बोलु बा लागल । सोमा माज्या तू मालदारा । भर मयान रातला । गावामंदि बा जावाव । लिंगुशा बा पाटलाच्या । गयो भंडारा टाकला र । माझा सोमा यो मालदार । गेला चावडीच्या पारावर । गाभी पिपळावर भंडारा । भंडारा त्यान बा टाकला । पाहटो पार बा रातीला । लिंगुशा बा पाटलाची । पाटलाची बा गाही गा । गाही हुकारे टाकिती । लिंगुशा बा पाटील । परसाकड उटला । गइगा हुंकार टाकिती । लिंगुशा बा पाटील । परसाकड उटला । गइ गा हुंकार टाकिती । लिंगुशाबा पाटील । पाटील बा बोलळा । कधीं तर बा गायी । हुंकार बा टाकायची । टाकायची बा नाही गा । दिवा त्यान लावला । गायीच्या बा गोठ्यात । गोठ्यात बा नेलाया । आवळ जावळ दोन गा । दोन पाड झाल्यात । लिंगुशा बा पाटील । बोलु तवा लागला । धनगराच्या देवाच । खर मग झालया । लाकड देण भाग गा । सुंबराण मांडल ॥ ८ ॥ लिंगुशा बा पाटील । हाती तांब्या घेऊन । परसाकड गेलाया गा । चावडीच्या पाराला । पारावर चडला गा । पिपळाकड बगल । वैल वाऱ्या झुळुक । वटक्याचा पिपळाला । पालवी बा फुटली । गारीगार झालाया ।

निरूपण:—धनगराच्या देवाच बोलण खर झाल तवा त्याला आता लाकड दिली पाहिजेत असं ह्मणून लिंगुशा पाटील सकाळच्यापारी जगतापा चवगुला व दत्तो कुरकळणी यास बलॊवून आणून झाल्याली हकीगत सांगु लागला. नंतर त्या तिघानी देवाजवळ इऊन सांगीतल की देवा-सबंध शिवारांतली तुला पाहिजे तिथली लाकड ने. तवा देव बोलल की शिवारांतल्या झाडावर पुष्कळ प्राणी जग त्यात तवा ती लाकड आमाला नग ताडमाड झाडाच बन गावा बाहिर हाय त्यातली लाकड घ्यावी.

ताडमाड झाडाच गा। झाडाचा बा हुकुम गा। हुकुम आमाला देवाचा। पाटील बा कुरकळणी। बोलू तव्हा लागल। ताड माड झाडाल। भूत ख्यात दांडग। लाकड बा तोडून। तोडून द्यायच नाहींत गा। इटल ब्रमल द्याव गा। बोलु तव्हा लागल। तोडतो बा आम्ही गा। हुकूम बा दिलाया। ताड माड झाडात। झाडात बा गेल्यात। झाड हेरो लागल। याक झाड हेरल। खणताड बा लावल। सोमा माजा मालदार। पहिली कुराड मारली। सोमा पाय तुटला। येड मंगळ ताइ गा। हिरक्याच्या बोचाला। हिरका बा तोडोन। तोडून बा दिना गा। इटल ब्रमल द्याव गा। बोलु तवा लागल। येड मंगळ ताहि गा। खाज तुज देतो गा। हिरका आमचा पडोदे। हिरका त्यानी पाडिला। खांडुकी बा केल्यात। खांड जमा केल्यात। सुंबराण मांडल ॥ ९ ॥ माजा इटल ब्रमल। द्याव बोलु बा लागल। सोमा माज्या तू मालदारा। गावा मंदि बा जावाव। माणक्या सुतार आणावा। लाकड मग बा तासायला। माजा सोमायो मालदार। गावामंदि बा गेलाया। माकब्या सुतार घेतला। घेऊन गेला ताड माड झाडांत। लाकड तासाया लावला। लाकड मागण्या सुतार तासतो गा। लाकड तासून झाली गा। आवळ जावळ पाड जुपन गाडा गा आणावा।

निरूपणः—आवळी जावळी पाडी जुपन गाडा आणावा अस देवानी सांगितल्यावर सोमा गावात गेला व लिंगुशा पाटलाचें आवळ जावळ पाड जुपुन गाडा घेऊन आला नंतर ती सर्व लाकड गाड्यात भरली व गाडा घेऊन निघाला इतक्यांत वाटत ते पाड सुटून नाहींसे झाले व इकड माणक्या सुतार ताड माड झालात येड मंगळ ताइन गिळला. तव्हा देवानीं तिला मारली तव्हा ती माकण्या सुतार ओकली व खाज मागु लागली मग देवानी तिला ( बकरी, डुकर टकोची उर्फ टोपडी दही भात वगैरे ) खाज दिल. मग तिला गाड्याला जुपल व गाडा खड-क्याच्या माळावर आणला पाड जे नाहींसे झाले ते पाटणाच्या कोंडारांत गेल तथन ते आणल व मग देवानी देऊळ बांधल आणि तथ नांदु लागल.

## ओवी २ री

ह, सुंबराण मांडल। माळावेल्या धन्याच। सुंबराण मांडल। सद्‌रच्या स्वामीच। सुंबराण मांडल। धरतरी बा मातच। सुंबराण मांडल। गुरूकूळ स्वामीच। सुंब-राण मांडल। कैलासाच्या सांबाच। सुंबराण मांडल। तवाच्या बा येळला। नरूटायो नगराळ। सातजण लेक गा। सातजणी सुना गा। नरोटा बा नगराळा। साता जणी सुनाला। कामधंदा सांगितो। धाकट्या बा सूनला। कामधंदा लाविला। लोटून झाडून काढाव। तिच्या मग मधलीला। मधल्या बा सुनला। काम धंदा लावीला। दळाव बा भरडाव। तिसऱ्या बा सुनला। काम तिला लावल। भाकरी कोरड्यास

करावं । चवथ्या बा सुनला । काम तिला सांगितलं । पाणी कांजी आणाव । पांचव्या बा सुनला । काम तिला लावल । ताक पाणी कराव गा । सहाव्या मग सुनला । कामधंदा लावला । आड झोडु कराव गा । सातव्या बा सुनला । कामधंदा लावतो । सुंबराण मांडल ॥ १ ॥ सातव्या बा सुनला । काम तिला लावल । गाई ह्मशी गोठ्यात । गोठ्यात बा जावाव । शाण पाणी कराव । किटागारी टाकाव । नरोटायो नगराळा । खुळ्या येड्या मंगाइला । तोंड धुवाया । मुडा मोगा दिलाया । जेवायला वाढतो । फुटक्या बा परळात । खुळ्या येड्या मंगाइला । आठा रोज तुकड । बारा दिसा कण्या कीं गा । ताक कण्या वाडतो । नरोटायो नगराळ । जेवायला वाडतो । खुळी येडी मंगइ गा । कुण्या एका दिवशी गा । जलमाला कावली । पोटाला बा कावली । सुंबराण मांडल ॥२॥ नरोटायो नराळ । नित्य न्योम चालविला । शिळ्या मग तुकड्याचा । कणिया ताकाचा । खुळी येडी मंगाइ । जलमाला कावली । इज्यापूर नगरात । हालकरी बा नगरात । आमंगसिद्ध महाराज। हालकरी बा नगरात । नगरात नांदतो। आमंगसिद्ध म्हाराज। सोन्याचा बा कळस । म्हाराजाच्या शिखराला। कोण्या एक दिवशी। सुर्या बाण उगवला । सुरयाच्या किरणान । कळस बा झळाकला । खुळ्या येड्या मंगाइन । कळसा चाल घेतल । गवता गाठी मारीत । मारित बा मारित । धोंडे लगुन्या रचित । रचीत बा चालली। खूळी येडी मंगाइ । आमंगसिद्ध महाराज । महाराजाच्या बनांत । बनात बा गेलीया। वडाच्या बा खोडात । खोडात बा लपली गा । देवपूज्या मंगोजी । गाइराख्या माधोजी । फेरीला बा निघाल । खुळी गा येडी मंगाई । तेला नजर पडली । देवपूज्या मंगोजी । गाइराख्या माधोजी । माघार बा फिरल । आमंगसिद्ध महाराज । ह्माराजाला बोलल । बारा वर्स झाल्यात । बनाच्या बा भवतन । भूत नव्हत ख्यात । वडाच्या बा खोडात । याक भूत लपल । आमंगसिद्ध महाराज बोलु तवा लागला । दोग दोन दंडाला गा । मग धरून आणाव र । देवपूज्या मंगोजी । गाइराख्या बा माधोजी । दंडाला बा धरून । देवाकड नेलीया । देव बोलु लागला । भूत ख्यात कुठल । खुळी वेडी मंगाइ । देवाला बा बोलत । भूत नव्ह ख्यात गा । माणूस बा हाय गा । हकड तुला वाट ग । कुणी मग दावली । कळसा चाल घेतली । कशाबद्दल आलीस । फिरादीला आलोया । कैशाची बा फिऱ्याद । आमंगसिद्ध महाराज । बोल खर तुज वाटना । बारा हात खायी गा । खाइ मी खांदली । खैऱ्या खुटाच इंगाळ । इंगाळ पाडतो मी ग । त्या बा इंगळात शिराव । मग माणूस वळखीन । आमंगसिद्ध बा महाराज । खाय देवान खांदिली । खैऱ्या खुटाच इंगाळ । इंगाळ देवान पाडल । खुळी येडी बा मंगाइ । वल्या मग पडदत । बारा हात बा खाइत । मग खाइत शीरली । थंगा थंगा बा नाचत । आमंगसिद्ध बा ह्माराज । मग कणाव आलिया र । मग उचलुन घेतली र । आमंग-

सिद्ध महाराज । बोलु तवा लागला । कैशाची बा फिराद । पोटाची बा फिराद । फिऱ्यादीला आलोया । × × × ×सुंबराण मांडल ॥ ३ ॥ आमंगसिद्ध म्हाराजा । बोलु तवा लागला । देवपुज्या मंगोजी । गाइराख्या माधोजी । रेवकुबाईच्या वाड्याला । वाड्याला बा जावाव । दर्शन घेऊन लाक्षिमी । लक्ष्मी बा देवाची । आमंगसिद्ध महाराज । गाइ राख्या माधोजी । देवपूज्या मंगोजी । मंगोजीला बोलल । रेवकु मग बाईच । डाव थान उजव्या । उजव्या बा खांद्यावर । उजव थान डाव्या । डाव्या बा खांद्यावर । नांगराचा फाळा गा । फाळावाणी दात गा । द्योपल्यावाणी टकोर । सुंबराण मांडल ॥ ४ ॥

निरूपणः—अशी ती रेवकुबाई होती. तिच्या वाड्याला देवपुज्या मंगोजी व गाइ-राख्या मांधोजी गेले व तिला बाहेर हाका मारल्या तेव्हां ती बाहेर आली व त्यांना येण्याचें कारण विचारू लागली मग त्यांनीं भेटीला आलों म्हणून सांगून खुळी येडी मंगाइची हकीकत सांगितली मग—

रेवकु माजी बाई गा । नरोट्या बा नगराळ्या । नगराळ्याच्या वाड्याला । वा-ड्याला बा गेलीया । बोलु तवा लागली । नरोटया या नगराळ्या । दिष्टान बाइन दिलाया । बारा गावच वालाग । वालाग बा आणाव । आन राशी पाडाव्या । बाळ जबा कराव । जावळाच बाळ गा । बाळ जबा कराव । दृष्टान बा दिलया । आमंगसिद्ध महाराज । खेळ देव गा करीतो । नरोटायो नगराळा । सकाळच्या पारी गा । बायकुला बोलला । नवस बा फेडायच । बारा गावच वालाग । ( ढोल) वालाग बा आणायच ॥ सुंबराण मांडल० ॥५॥ बारा गावाच वालाग । वालाग त्यांन बा आंडल । आन राशी बा पाडल्या । पंचाती बा पडली । आनाच्या बा राशी गा । वालाग बा जुपल । आना राशी पाडल्या । नरोटायो नगराळा । बाळ तेला धावना । भाळ हुडकु लागला । जावळाच बाळ गा । जावळाची माता गा । धाण्याला बा निघाली । वाऱ्याच बा वावदूळ । वावदूळ आलया । वाटसन पोर गा । पोर बाजूला गेल या । नरोट्या बा नवराळ्या । गुळा भरली वाटी गा । बोळाच्या बा हातात । जावळाच्या तान्ह्याला । कडीवर बा घेतल । बाळ मग नेलया गा । आनाच्या बा राशीला । रकताचा टिळा गा । टिळा मंग लावला । जावळाची मातागा । हाळ्या मारू लागली । जावळाच बाळ गा । इना मंग झालया । जावळाची माता गा । रडु आकटु लागली । धरणीला पडली । जावळाच्या बाळार । जावळाच्या बाळार । हाळ्या मग मारिती । आमंगसिद्ध महाराज । म्हाराज बा बोलला । जावळाची माता गा । मराइला करिती । कांबळ्याची खोळ । खोळ त्यान केलीया । निघून चालला । जावळाच्या मातला । मातला बा बोलला । जेच तेन नेलया । जावळाच्या बाळाला । हाळ्या मारू नकस । बोलायच बा

नाहीं गा । जावळाची माता गा । पदराला धरलं । मातेनं वा धरलं । कुणाचं वा बाळ गा । कुणी नेलं सांगावं । नरोट्या वा नगराळ्या । नगराळ्यानं नेलया । जावळाची माता गा । धावत वा पळत । नगराळ्याच्या वाड्याला । वाड्यात वा गेलीया । नव नग आहेत । नवी दुरडी बाहेर । पंगतीत ओढलं । बारा गावचं पाटील । बाळग्यानं शोधलं । बाळ जमा केल्यालं । बारा गावचं पाटील । बारा वाटेनं पळाले । बाळाच्या मातेनं । चावडीवर नेल्या । पाटील वा कुरकळणी । रामुशाला बोललं । नगराळ्याला आणावा । चावडीकडं आणावा । मग रामुशी गेल्यात । नगराळ्याला धरला । चावडीवर नेलाया । सुनाच्या वा फाड्यांनं । बांधुन वा घातला । सुंवराण मांडलं ॥ ६ ॥ पारी जेरबंद मारिला । पाचशे रुपये दंडणी । दंडणी वा घेत्यात । बोलू लवा लागलं । नगराळ्याचं इष्ट गा । इष्ट मेतर बोलल्यान । भागेनात पैका । पैका वा द्येतोगा । नगराळ्याला सोडावा । नाहीं आम्ही सोडायचं । रोजारणी बघानं । मुक्या येड्या मंगाईला । मंगाइला वा बोलल्या । मुकी येडी मंगाई । धावत वा पळत । हालकारी वा नगराला । नगराला वा गेलीया । आमंगसिद्ध महाराज । म्हाराजाला बोलली । आताच्या वा आता । तुम्ही मग उठाव । सातरा वा भरतीया । उठ उठ बाबा र । नाहीं मी गा उठणार । मुकी येडी मंगाइ । बोलु लवा लागली । तुझ्याम्होर पराण । पराण मी गा देईन । आमंगसिद्ध महाराज । बोलु लवा लागला । येतो येतो बाई ग । म्होरं तुम्ही चलाव । मुकी येडी मंगाई । धावत वा पळत । नरोट्या वा नगराळ्या । नगराळ्याच्या जवळ । जवळ वा गेलीया । मामाजी वा सांडतो । आत्ता तुम्हाला सोडतो । आमंगसिद्ध महाराज । महाराज वा आलाया : बाळावर भंडारा । भंडारा वा टाकिला । भंडारा वा टाकिला । हो । हो ! । जावळाच बाळगा । बकऱ्या मुंडकं जाहालं । ह. सुंवराण मांडलं ॥ ७ ॥

निरूपण:—इतका चमत्कार होऊन देव चावडीवर आला व नरोट्या नगराळ्याला कां मारतां म्हणून विचारूं लागला तेव्हां त्यान जावळाच बाळ जबा ( ठार ) केलं म्हणून मारतो असं पाटील कुरकळण्यानी सांगितलं. तेव्हां कशावरून बाळ मारलं म्हणून देवान विचारलं. याच्या घरात दुरडींत बाळाचं मुंडकं घवितलं असं लोक सांगतात असं पाटील म्हणाले तेव्हा ' दावा बघु ' म्हणून देवान त्यास नगराळ्याच्या घरीं आणलं व बघतात तों दुरडींत बकऱ्याचं मुंडकं आहे. हें पाहून सर्वांस आश्चर्य वाटलें. मग पाटील कुरकळण्यानीं नरोट्या नगराळ्यास सोडून दिलें. तेव्हां जावळाच्या बाळाची माता देवाचा पदर धरून रडु लागली व त्यास ' तुझाच हा सारा खेळ आहे ' असें सांगून बाळ आणून दे म्हणू लागली. तेव्हां ' हाक मार म्हणजे येईल ' असें देवानें सांगितलें त्याप्रमाणें तिनें हाक मारली व त्यासरशी बाळ येऊन तिला कडकडून भेटलें. याप्रमाणें ज्या

सुल्या येड्या मंगाईला शिळे टुकडे चारून तिचा नरोत्यानें छळ केला त्यास देवानें शिक्षा दिली व अखेर त्या च सुनेनें त्याची संकटांतून मुक्तता केली.

वा. दा. मुंडले

## ६० कांहीं जुनीं मराठी गीतें

( हप्ता २ रा )

( गीतें सांगणारी स्त्री — येसा परटीण )

### ( १ ) दिवाळीची ओंवाळणी

आली वरसाची दिवाळी, हिर माणक ओवाळी।
मोत्याची आरती, रेसमाच्या वाती, ओवळती चंद्रजोती।
इडि पिडि जाऊ, तुला बळीच राजलक्ष्मी येऊ ॥ १ ॥ *

### ( २ ) हळदीचें गाणें †

हळदिच्या गुरा, दसरथु निघाला, वारूपा न्हाणीला।
वारू न्हव तारु, सामिंद्राच्या काठीं, माळी जगुजेठी।
तेन्ही हाळदाई लाविली, हळदा उगवु लागली।
हाळदाई मोड आला, हाळदाइ आली एका पाना।
हाळदाइ आली दुइ पाना, हाळदाइ आली तिइ पाना।
हाळदाइ आली चवथ्या पाचव्या पानाला हाळदाइ नांगरिली।
सोन्याच्या कुदळी, रुपियाच दांड तेनि हाळदाइ खांदिली।
तत माळी जगुजेठी इचली, बाळजी गोपाळ आणल।
बुरूडाच हार, आणल कुंभाराच डेर पेटिवल्या।
कातिवजी चुली तिथ हाळदाइ उकडिली, धुतली।
गंगच्या उदका, वाळविली सूर्याच्या किरणा।
वाळवून चोळवून केल्या राशी, आणल ढवळ पवळ नंदी।
नंदीवर गोण्या जी लादिल्या, वडल्या रेसमी पटारी।

---

* दिवाळींत परटीण ओंवाळण्यास येत असते त्यावेळीं ती हें गीत म्हणते.

† नंबर २ ते ५ हीं गाणीं कुणबी–मराठी वगैरे लोकांच्या लग्नांत परिटीणीनें म्हणावयाचीं असतात. तीं आज कैक पिढ्यांपासून चालत आलेलीं आहेत. गाणीं सुलभ आहेत. किंचित् विचार केल्यास सर्व अर्थ ध्यानांत येण्यासारखा आहे म्हणून त्यांस टीपा दिल्या नाहींत.

घातल मखमली जिनु, नंदी आळीन आळि सादाविल्या ।
ऐकल नवऱ्याच्या बापान, घेतली शेल्याच्या पदरी ।
दिली वरमाइच्या वस्या, सोन्याचा वरवंटा, रुपियाचा पाटा ।
हाळदाइ वाटिली, आदि लावा देवाजीला, मग लावा न्हवऱ्या बाळा ।
तेच्याजी उरोळ्या, चाफियाच्या कळ्या ॥ १ ॥

## ( ३ ) वरोटापाटा

पाटाजी पुजिला, चौक भरिला, चौक दिसाच चौक दोन ।
पाट्यावर वाहिल्या पाच पोळ्या, पोळ्या वाइल्या पाच ।
दिव, दिव वाइल पाच जोती, दिव्या वाइल शेर तुपु ।
दिव जळत्याति ढणढणीतु, ववर बसल्याति घवघवितु ।
अस ववर सगण्यान एकामेकाची नाव घेती, पाची बाशिंग सोडविती ।

भांग भरिला मोतियान, कपाळ भरिल कुंकवान, नेत्र भरिली काजळान, मुख भरिल तांबुळान, हात भरिल चुडियान, पाय भरल पंजनान, बोट भरिली इरूयान, बोट भरिली जोडव्यान ॥ १ ॥

## ( ४ ) तेल चढविण्याचे वेळचें गाणें

रुपियाची वाटी, सोनियाची वालु, इसातिसाच गोंड सुळंग मुतिल्या बाळी: न्हवऱ्या त्याल चढविती ॥ १ ॥

## ( ५ ) घाणा

आणवा बुरुडाचा हार । आणवा कातीव मुसाळ ।
आणवा खंडीइजी गहु । घाणाजी घातिला ।
खंडीइ सुपाऱ्या मांडवी दणणकारु । खंडीइजी भातु दणणकारु ।
किलबिल कोलापुरु तथला कोसटी हिणकारु ।
तातु लाविला रेसमाचा । कुचा फिरविला मोतियाचा ।
पाजाण सारिल तांदळाच । उठ उठ रुक्मिणी भाग्यवंता ।
साडा हिणीला तुझ्या कंता । साडा नेसली साडिइचा ।
वाडा वसली बामणाचा । कास घातली बामणीची ।
कोपा खविला वाणिणीचा ॥ १ ॥

## ( ६ ) संकीर्ण गीतें

( गीतें सांगणारी स्त्री — हालीम )

पावणा आला म्हणु पाट टाकला जांबइळा[२] ।
ताइता माज्या बंदुराया बस केळीच्या कंबईळा[३] ॥ १ ॥

---

१ नवऱ्यानं २ जांबळा ३ कमळ

हावस भारी मोठी कड मोडुनि करदोड्याची ।
जडिता बंदु माज्या गोरी कंबर सरदाराची ॥ २ ॥
माज्या दारावैन कोण गेलाया गलोलीचा ।
हौशा माजा बंदु पेट शराचा तालुक्याच्या ॥ ३ ॥
वैरोळ[1] सादवितु परसुदारिच्या पायइरी ।
माजी तु बयाबाइ हाक मारिती दुचिरी ॥ ४ ॥
तापत्याची चोळी मिन्याएवडी त्याची गाट[2] ।
माज्या का बंदुजिन केली झमइ पायवाटु ॥ ५ ॥
थोरल माजघरू येयाजायाला एक दारु ।
पोथि वाचितु माजा दिरू ॥ ६ ॥

## (७) आळंदीच्या दिंडीचें गाणें

### (सांगणार स्त्री — वालुबाई पाटलीण)

कंतासंगट[3] पंडयिरी, लोकासंगट आळइंदि ।
हरिपाटाचा पवाइडा वाची पुण्याच्या पाणइंदि ॥ १ ॥
आळंदि गावीचा मंडइपु, कुण्या शिप्यान शिविइला ।
ग्यानु तुकोबा देवायाचा वर अबंग लिविइला ॥ २ ॥
रूसली रूकामिणु जाऊन बसली वाळवटी ।
पिरतिचा पांडुरंग तिच्च्या धरितो मनकटी ।
तिची तुटली चिचपेटी । मोति झाल्याति वाळवटी ॥ ३ ॥
इटल देव ह्मणी सोड रकामिणी माजी बंडी ।
ग्यानु तुकोबा देवा याची वाकीरिवु[4] आली दिंडी ॥ ४ ॥
इटल हेच देव त्यो का आडविला परसदारी ।
सोळा ससरू माज्या नारी नाव घेऊ मी कुठवरी ॥ ५ ॥

## (८) पंढरपुराविषयीं

पंडरीची हवा काय सांगून येडियाला ।
चंद्रभागा टाकुइनि करी आंगुळ वडियाळो[5] ॥ १ ॥
आइबाप असताना कोण पंडरी गेल येड ।
येर्थ पायाच दिल भाड ॥ २ ॥
पंडरपुरामंदि हुवि राहिलो धोंड्यावरी ।
गेलो अवाचित नर्दीइरू रकामिणीच्या गोंड्यावरी ॥ ३ ॥

---

१ कासार २ गाठ ३ नवऱ्याबरोबर ४ वाकिरी गावावर ५ ओढ्याला
६ नजर

पंढरपुरामंदि कोण सोन्याच्या जोडयाची ।
राणा इटलु चडन्याची ॥ ४ ॥
भरली चंद्रभागा पाणी लागल हवेलीला ।
इटल हेची देव रताच्या सावलीला ॥ ५ ॥
भरली चंद्रभागा पाणी लागल तटाइला ।
इटल हेची देव उचा तुळशीच्या बेटाइला ॥ ६ ॥
पंडरिला जातो आडवा लागइला हुंबइरु ।
देवा माज्या इटलाच्या टाळ इण्याला नंगइरु ॥ ७ ॥
पंडरिला जातो आडवी लागली टाकइळी ।
देवा माज्या इटलाच्या टाळ इण्याला सासइळी ॥ ८ ॥
मायबापान मला दिली साधुसंताच्या शेजाइरु ।
टाळइण्याइचा येतो गजरु कानावरु ॥ ९ ॥
आऊक मागिती माज्या साधुसंताईला ।
देवा माज्या का इटलाला गळातल्या या भजन्याला ॥ १० ॥
चंद्रभागच एवड पाणी सोनियाच्या झांडियातु ।
ग्यानोबा तुकाराम साधु तान्याला दिंडिइतु ॥ ११ ॥
साकरच लाडु सोन्याच्या परातितु ।
ग्यानुबा तुकाराम साधु भुक्याला दिंडिइतु ॥ १२ ॥
पंडरिला जातो संग न्हेवावी आइइला ।
गोपाळपुरावरी चारा घालावा गइईला ॥ १३ ॥
भरली भिवराबाइ येवडी केरावी कातुन्यान ।
इटल देवाजीनं केली आंगुळ चातुरान ॥ १४ ॥
पंडरिला जातो माज्या गलीच्या बाइका ।
सुमराण एवड सांगा इटवइल्या नाइका ॥ १५ ॥
पंडरिचा इटु नाही कुणाच्या देवाइरी ।
तेच्या भेटी पायी सारी लुटिली जवाइरी ॥ १६ ॥
पंडरीला जातो माज्या वट्यात हाइत पेरु ।
एकादशीच माज दिरू
( इटल हेवी देऊ एकादशीचा निराकारु–असा अन्यपाठ ) ॥ १७ ॥

---

१ उंबरझाड २ टाकळी गांव ३ आयुष्य ४ देव्हाऱ्यांत

पंडरिला जातो माज्या वट्यात दुधपेंड ।
यानुचा तुकारामु एकाद्शीच गेल पुढ ॥ १८ ॥
पंडरिला जातो केयास माजति मोकइळु ।
साधुच्या संगतिन मला घडली एकादस ॥ १९ ॥
इटल देव म्हणी का ग रकमिणी रागमंदि ।
जनि तुळशीच्या बागमंदि ॥ २० ॥
पंडरपुरामंदि कशाची चोरी झाली ।
देवा इटलाचा शेला जनीच्या उशाखाली ॥ २१ ॥
भरली चंद्रभागा धोंडा बुडला लहान थोरु ।
देवा इटलाचा शेला जनी धुतिया पायावरु ॥ २२ ॥
रकमिणी म्हणिइति इटुजनीच कोण नात ।
वनवासी ते पाखुइरु राति वस्तिला आलं होतं ॥ २३ ॥
रुसली रकमिणु गेली मंगळुयेडियाला ।
पिरतीचा पांडुरंगु जिन घालितु घोडियाला ॥ २४ ॥
इटु इटु म्हणु हाक मारिती राऊळातु ।
इटु जनीच्या देवळातु* ॥ २५ ॥

## सीतेविषयीं गीतें

रातीच सपइनु सिता सांगती तातोबाला ।
रामाच्या बागमंदि लहु गेलेति कंबळाला[1] ॥ १ ॥
सितचा वनवासु एवडा एक राम ध्यानी ।
लंका चेडिली रावणानी ॥ २ ॥
पांडुरंगाच्या घरामंदि देव म्हारुती कारबारी ।
सिता रावणाच्या लंकवरी ॥ ३ ॥
देवामंदि देव देव मारुति भुकयावला ।
पडक्या फळायाची आज्ञा मागित सिताइला ॥ ४ ॥
आटिंग्या[3] वनामंदि कोण रडत आइका ।
सिताबाइला समजवाया घोरी बाबळी बाइका ॥ ५ ॥

---

१ केंस * जनाबाई संबंधानें रुकमिणीची अशी साशंक वृत्ती वर्णिल्यानें गीतें करणाऱ्या व म्हणणाऱ्या स्त्रियांच्या किंबहुना स्त्रीजातीच्या स्वाभाविक मत्सरी स्वभावाचें मात्र खासें चित्र उमटलें आहे.

२ कमळें आणण्याला ३ आटिंग्या (!)

राम म्हणइतु लक्षिमणा माझ्या भाई ।
सिता वदिली[1] कंच्या ठाई । त्याचि वनाच नाव कायी ॥ ६ ॥
चवतीचा चांद कुणी देखिला मंदिचिरी ।
कसा एवढा आळु आला रामाच्या सुंदरी ॥ ७ ॥
सिता वदियिली[1] सिर आणिल दावायाला ।
कौसली हेची सासु मग उठली जेवायाला ॥ ८ ॥
सिता वदियेली[1] तिच काढिल नाक डोळ ।
राम धरणीवरी लोळ ॥ ९
सिता वदियेली[1] तिची हाणिली नकचोट ।
लक्ष्मणाच धैर्य मोठ ॥ १० ॥
सिता न्हेली वदायाला माग सयाचा घोळक्का ।
सिता रामाची वळक्का ॥ ११ ॥
सिता न्हेली वदायाला सया म्हणति कुकु लावा ।
केंगाइ सासु म्हणी आतारू गेला गावा ॥ १२ ॥
सिता सांगी कथा आपल्या जलमाच्या ।
रामासारल्या भरताराच्या ॥ १३ ॥
सिता न्हेली वदायाला माग फिरुनि राम न्हाली ।
आनंदाची वस्ति हेन जवळी नाहीं केली ॥ १४ ॥
आटिंग्या वनामंदि कोण करिती जू जूं ।
सिताबाईला बारा रोजु ॥ १५ ॥
आटिंग्या वनामंदि सितागाइची हाइ न्हाणी ।
दोनी नेतर झाकुइनी तिला तातुचा घाली पाणी ॥ १६ ॥

### दिवाळीचें पोरांचें गाणें

( सांगणार– गुंडा कुणबी )

दण दण दिवाळी । गाय म्हस ओवाळी ।
गाय म्हस चोर । बैन न्हवर ।
बैल कुणाचा । चोळून मोळून केल्या कुंजा ।
गऊ म्हशी आट गाइ । इक दुबत केळ काय ।
आमच्या नागोबाला शेर शेर तूप ॥ १ ॥
एग एग गाय ह्मोर । तुज्या खांयाला काय चोर ।
मामा मदानि रकाटा । ति गइ लागली र वाटा ।

---

१ मारली २ गणेश चतुर्तीचा ३ कैकई ४ जो, जो (पाळणा) ५ बाळंतिण होऊन बारावा दिवस, मुलांचें नांव ठेवायाचा दिवस ६ वाल्मिकी

वाट तिटचा र वाळु । नंदीबैल र ख्याळु ।
नंदी बैलाची र येसन । निळ्या घोडीवर र बसन ।
निळ्या घोडीचा र खरारा । शिपुरीच्या पोरी × × × ॥ २ ॥

---

## गाणीं ( कडव्यांचीं )

### ( सांगणार स्त्री–वालुबाई )

गावाला गेला म्हणु । येतो म्हणुनि न्हाइ गेला । कारंड्यावाण्या । सितळ सावलीला लुटिल्या गोण्या । चांदणी आली मदा लादल्या गोण्या । नार चुटुक चांदणी रातरी कुठ हुता । हातीं किंदरी[1] राघुचा गाण गाता । नारु ठांगणी ठेंगणी । गुजरी दातरंगी । साडी नेसली पैठणी पाचरंगी ॥ १ ॥

---

गावाला गेलेल्याची वाट पैती[2] मी चोरुयेनि । साजणी सइ मोगरा जाइ । तंगणी नारु । रामान सिता न्हेली । सादुच्या घरा । तितीला गेली व्हती घरला चला ॥ १ ॥

---

पिकल्या पानायाचा इडा रंगला डाव्या मुठी । जाइच झाडु । कळ्याचा भारु । तोडिति नारु । गुपिति हारु । चांदाची कोरु । अशी सुरत आणिवि वारु । मारिति लह्यारु ॥ १ ॥

---

वाटवइला मळा म्हेवण्या राजसाचा । माजी वइणाबाई सरवा येचिति दवन्याचा । क्रिस्ण हरी । यमना तिरी । मुरली वाजविती । हौदाच्या पाण्या जाया जिव माजा भितो ॥ १ ॥

---

गावाला गेला ह्मणु माज्या जिवाचा मवइज्या । राती सपनी माज्या आल तेच्या आंगीचा कवइजा । पंडरपुरी । भीमातीरी । रहिवासु । शिनलासु । देवा तूं ॥ १॥

---

## पद–चाल लावणीची

### ( सांगणार–गुंडा लोहार )

एका नगरामदि अँस्तुरि[3] पुरुष होते दोघजण । तेची अस्तुरि गर्भिण होती झालें राव सा महिन ॥ धृ० ॥ एके दिवशीं घिऊन घागर जाति पाण्याकारण ।

---

१ किनरी २ पहाते ३ स्त्री.

जाता मार्गी ससा पाहिला तिन राव दृष्टिन। सोळा शिंग अठरा डोळ सावा संगीन। ढुंगणावरति तीन शिंग हाल लचलच मान। नाकावरति सात शेपटी घ्याव किहो ऐकून। असल गुरू वळक मार्ग तो दिइल दावून ॥१॥ पाण्याची व्ह घागर भरून आली घराकारण। हासत हासत भरतार आला पोचाति खूण। चापट फासा ह ती घेतला तवा पारध्यान। ससा देखुनि फासा टाकुनि त्याव पारध्यान। फासा तोंडुनि ससा निसटुनि गिळला पारध्याला। तवा एक खूण कळाली एक पार्वत पक्षीला ॥ २ ॥ गडचड गडबड नार लोळति तवा एक धरणीला। पुत्र न्हव काळ मेला उदरी राहिला। सामहिन्याच्या गर्भाला राव मोटा राग आला। तवा मातच पोट फोडून बाहेर निघाला। सामहिन्याच्या गर्भान राव ससा मारीला। सस्याच्या उदरान स्वामी तुमी कस आला। सा महिन्याचा गोळा जाऊन बसला ठायाला। हुत तस पोट जाऊन बसल जाग्याला। सतु बालु कवी करणार पडुबंन्यामदि घर। भैरवनाथ शिरावर ॥ ३ ॥

वा. दा. मुंडले

# ६१ प्रतापसिंहाच्या राज्यारोहणाची हकीकत

ही हकीकत गोपाळराव देशमुखांच्या दफ्तरांत होती. एकंदर पंचवीस सवीस बंद असावे. पैकीं दुसरा व सोळापुढील सर्व बंद गहाळ असल्या मुळें, फक्त पंधरा बंद शाबूत आहेत. यांत बाजी रघुनाथ यानें प्रतापसिंह य.स गादीवर बसविल्याची शके १७३० वैशाख वा। ९ बुधवार पासून ज्येष्ट शु॥ ९ भृगवार पर्यंतच्या एका महिन्याची हकीकत आहे. प्रतापसिंहाचें नांव शाहु ठेविलें असें हकीकतकार लिहितो. प्रतापसिंहाच्या वडलाचें नांव शाहू च होतें. व्यवहारांत प्रतापसिंहाला शाहू या नांवानें शक १७३९ नंतर संबोधिलेलें आढळत नाहीं. त्यावरून दिसतें कीं बाजीराव रघुनाथानें ठेविलेलें हें नांव प्रतापसिंहानें पुढें चालू ठेविलें नाहीं. हकीकत लिहिणारा वरवरच्या गोष्टी तेवढ्या लिहितो, राजकारणाच्या गूढांत पडत नाहीं. राज्याभिषेका पूर्वीं प्रतापसिंहाची मुंज केली असें हकीकतकार लिहितो. शिवाजीची अशी च मुंज राज्याभिषेकापूर्वीं केली होती. संभाजीची मुंज लहानपणीं च झाली होती. त्यावरून दिसतें कीं राज्याभिषेका पूर्वींच्या मुंजींवरून राजांच्या मुंजी बालपणीं होत नव्हत्या असें अनुमान काढणें निराधार आहे. तत्रापि या प्रश्नाचा छडा सूक्ष्मपणें व तपशिलानें लावणें जरूर आहे.

वि० का० राजवाडे

श्री

स्वस्ति श्रीराज्याभिषेकशके १७३० विभव नाम संवत्सरे वैशाख शुा ९ बुधवारीं सुा समान मैया तैन व अलफ क्षत्रियकुलावंस श्री राजा शाहू छत्रपती याणी कैलासवास केला त्यास पुत्र च्यार ज्येष्ठ प्रतापजी राजे किल्यावरून महाराजास माहुलीस आणोन समागमे एऊन सार्थक केले नंतर सातवे दिवसी आपण जाऊन मा                          भोसले क्रिया करणार त्याचे हाती क्रिया करविली दाहा दिवस जाहाले दाहावे दिवसी तिथे पुत्र जाऊन विधि जाहाला तीन दिवस गेले दानधर्म वगैरे यथासांग राजश्री बाजीराव साहेब प्रधानपंत याजकडून बाबुराव कात्रे एऊन पेशजी राजाराम साहेब यांचा बेहडा खर्चांचा नक्त सिवाय हत्ती घोडे सामान होते त्याजकडून अधिक दाहा हजार रुपये लावून धर्म केला तेरावे दिवसी बाईस बाजीराव गेले सातवे दिवसी त्रिंबकजी डेंगळे गेले मुरारजी एवले पुढें आले व चिंतोपंत देशमुख हि आले त्रिंबकजी किल्यावरी जाऊन मुहूर्त अमृतसिध्धीयोग श्राद्ध आटोपून राज्याभिषेक सिंहासनारूढ आज च व्हावे असा निश्चय करून वैशाख वा ७ इंदुवासर श्रावणनक्षत्र शके मजकुरीं दोन प्रहरपर्यंत श्राध्ध वगैरे तो विधि उरकोन माहाराजास मंगलस्नान करून पुण्याःवाचन बसवून होमास प्रारंभ जाहाला होम समाप्त जाहाल्यावरी तेथे माहाराजास उदकअभिषेक तेथें जाहाला नंतर पुन्हा मंगलस्नान होऊन दुसरे पुण्याःवाचन सिंहासनारूढ होण्याचे ते होऊन श्रीदेवास वस्त्रे व ऋत्विजास देऊन सिंहासनापासीं आले हस्तावर सुवर्णाची विष्णुप्रतिमा स्थापोन पूजा जाहाली नंतर महाराजाचे आंग देवता स्थापोन सिंहासनाची पूजा जाहाली शुभ्र वस्त्रें पोषाख परिधान करून आणखी सिंहासना खाली अभिषेक सुवर्णकलशांत उदक गंगादि आणोन घालोन ऋत्विज सुवा + + + ( पुढें एक बंद मजकूर गहाळ ) + + + + + सिके या प्रमाणें सायंकालचा दोन घटका दिवस राहातां देऊन च्यार घटका रात्रीस सर्व मंडळी किल्यावरून खाली आली प्रतापजी राजे नाव होते परंतु शाहू राजे ठेवावे एविसी बाजीराव यांची आवड त्याज वरून शाहू माहाराज नाव ठेऊन साकरा वाटल्या सिके हि नूतन तसे च केले वैशाख वा ८ मंगळवारी स्वारी महाराजाची उतरली इंदुवारी रात्रीस बाईस बाजीराव यांजकडे त्रिंबकजी चिंतोपंत जाऊन वस्त्रे बहुमान देऊन उजेडावयास परत शहरांत आले नंतर माहाराजास आणिले ते च दिवसी निश्चय लग्नमुंजीचा करून आमंत्रणास पुरुषोत्तमराव पंडित अमात्य व पंडितराव मल्हार रामराव चिटणवीस याजकडून करविली शहरांत वगैरे जाऊन केली नंतर देवदेवक-स्थापन ते च दिवसी जाहाले दशमीस जानवे घातले माहाराजांचा लग्नाचा निश्चय

करून रतनराव मोहिते कुटुरकर यांची कन्या वधू नेमस्त करून वद्य एकादशीस लग्नसमारंभ माहाराज रंगमहालांत नेले इकडे वाड्यांत नवरीचे देवदेवक दुसरे कडे बसवून बहुलें वगैरे एथे श्रीमंतपूज्यन हरिद्रा वाङ्‌निश्चय ते च दिवसी होऊन नवरा न्यावयास स्वारी तयार करून त्रिंबकजी डेंगळे एऊन हत्ती वर अंबारींत बसोन बहुत समारंभाने शनवारचे मारुतीस जाऊन वाड्यांत आले गोधुळलग्न जाहाले दोन दिवस मेजवान्या ब्राह्मणभोजन वगैरे होऊन साडे त्रयोदसीस पूर्वरात्रीस जाहाले कारखाने ज्याचे त्याणे केले परवानगी जाहाली नांव सौ॥ आंबिकाबाई ठेविली शर्करा सर्वांस वाटल्या चतुर्दशीस लग्नसमारंभाच्या मेजवान्या जाहाल्या ज्येष्ट शुा प्रतिपदेस माहाराजाची स्वारी मातुश्री आईसो माईसो सह घेऊन किल्यावर गेले स्वारी पोहोचून त्रिंबकजी डेंगळे किल्याखाली एऊन श्रीमंताकडे वाईस गेले त्रितीयेस रात्री उजेडता फिरोना त्रिंबकजी तात्या साता-रियास आले स्वारीची तयारी करून किल्यावर जाऊन आईसाहेबास ठेऊन माहाराजा सह सर्वांस घेऊन शहरांत आले पंतप्रधान चतुर्थी रविवारी माहुलीस आले शुद्ध पंचमी इंदुवारी दाहा घटकेचा मुहूर्त राजश्री स्वामीचे दर्शन घ्यावयाचे सबब पोहईवर प्रधानपंती भेटी घेतली स्वारी समारंभे कडून आइनेचे अंबारींत बसोन खवासखान्यांत चिंतोपंत देशमुख बसोन एऊन जिलिबी स्वा॰ लोक वगैरे तयार निसी आले शहरचे नागरी लोक हि पाहावयास बहुत आले प्रधानपंत निघोन ते हि मार्गी एतां अंबारींत राजश्रीस पाहून बिनीवाले यांच्या विहिरी नजीक घोड्या-वरून उतरोन चरणी जोडा न घालता कुरनसात करून एते जाहाले माहाराजानी पंतास पाहून हत्ती बसविला पालकी लाऊन उतरल्यावर प्रधानपंत जवळ एऊन चरणावरी डोई ठेविली माहाराजानीं पुढे हस्त करून वर चे वर धरिले बहुत आद-बेने माहाराजा पाठीमागे चालोन बागांत चांदणी देऊन बैठक केली तेथे जाऊन बसोन नजर पंतांनी केली त्यास भरगच्ची चादर आंगा वर घातली नंतर जीवनराव पंडित सुमंत याणी नजर केली त्याजला हि चादर घातली क्षणैक बैसोन स्वारी उठोन आइन्याचे अंबारींत माहाराज बसले खवासखान्यांत बाजीराव बसोन मोर्चेल घेतले दुसरे अंबारींत भाऊसाहेब अप्पा साहेब बसले खवासखान्यांत चिंतोपंत देशमुख बसोन स्वारी चालती होऊन दोन प्रहरा राजवाड्यांत आले नजरा पंडित प्रधान सुमंत याणी मात्र तेथें केल्या वरकड मानकरी यांच्या नजरा मना करून स्वारी आलियावरी सभेस मुजरे यथाविधी सर्वांची जालिया वरी माहाराज व पंडित प्रधान मातुश्री माईसाहेब यांजकडे गेले नजरा करून बसले आगस्वागत बोलणे होऊन प्रधानपंत आपले वाड्यांत जातांना आपले आंगावरील पोषाक मंदिल कंठी मोत्याची व शिरपेज तरवार दिली याज वरी नजर करून तो च पोशाक आंगावर घेऊन इकडील तिकडे तिकडील इकडे गेलीं

दुसरे दिवसी छ ५ र॥खर ज्येष्ट शुा ६ भौमवारी पंडितप्रधान याणी आपले-कडील सरदार व राजमंडळ अमात्य पंत आदिकरून मराठे मंडळीस ताकीद होऊन राजवाड्यांत सभा केली पंतप्रधान सर्वा पूर्वी जाऊन सभेंत बसोन सिंहासनास मुजरा करून मातुश्री माईसाहेबा जवळ माहाराज होते तेथे जाऊन माहाराजास घेऊन आले माहाराज सभेंत आल्यावर सिंहासन सव्य घेऊन तक्तास मुजरा करून सिंहासनारूढ होऊन बसले मग श्रीमंतानीं नजर करून मुजरा केला पायावर डोई ठेऊन सिंहासना पाठी मागे मोर्चेल धरून उभे राहिले पुरुषोत्तमराव पंडित अमात्य याणी मुजरे करून दुसरे मोर्चेल धरिले उभे राहिल्यावर मानकरी यांच्या नजरा चालत्या जाहाल्या नजर भीमराव विठ्ठल खासर्नीस पोतनीस याणी उचलोन तात्या जोशी पोतदार त्याज कडील कारकूना जवळ पारखावयास देऊन जमादार बाळू या जवळ दिली जामदारखान्या कडील सेले दुपेटे वगैरे घालावयाचे चिंतोपंत देशमुख याणी नेमणूक करून दिली सनेग जामदार निा कारकुनानि रघुनाथ लक्ष्मणराव चिटणवीस मुसरीफ जामदारखान्याचे ते प्रसंगीं नव्हते सबब नरहर मल्हारराव चिटणवीस याजजवळ द्यावे त्याणी माहाराजाचा हात लाऊन आंगावर घालावे याप्राो सर्वांस सनगे दिली शेवटी पंत अमात्यास चादर दिली समया दिवे लाविले म्हणून पंतप्रधान याणी मुजरा करून तक्ता मागे मोर्चेल धरिले नजरा सेले समाप्त जाहाल्यावर सभेस घटका अर्धघटका बसोन मातुश्री माईसाो बोलाऊ माहाराजास गेले समागमे पंतप्रधान गेले वाड्यांत हवदावरी संध्या करून फराळ केले च्यार साहा घटका रात्री माहाराजांचा निरोप घेऊन निघोन सभेंत एऊन पंत अमात्य व पंत सुमंत वगैरे मानकरी सर्वांस नरहर मल्हारराव चिटणवीस याज कडून विडे देविले नंतर सर्व आपले घरोघर गेले मिठाई पंतप्रधानास पाठविली समागमे विठ्ठलपंत फडणीस व कामाठे दिल्हे ते त्यास पंतांनी वस्त्रे दिली तिसरे दिवसी छ ६ रबिलाखर ज्येष्ठ शुा ७ बुधवारी श्रीमंत मातुश्री माइसाहेब याणी प्रधान-पंतास मेजमानी केली मिठाई फराळ जाल्या वरी थोरली कचेरी बाहेर जाहाली त्यातून प्रधानपंत व सुमंत जीवनराव व अमात्यपंत व मल्हारराव चिटणवीस व पंडितराव व बापूदेव वैद्य व माहाराजांचे सासरे यांचे बंधू दोघे व परसोजी भोसले वार्वीकर व तात्या जोशी पोतदार याज पैकीं लक्ष्मणपंत राजमंडळ पैकीं व पंतप्रधान यांज कडील शास्त्री साहा असामी व अन्याबा राहातेकर व सासरे ढमढेरे बापू कवडी वाईकर रास्ते सासरे वगैरे पंचवीस तीस असामीस आंतील कचेरीस आमात्यास सेलापागोटें पंतसुमंतास सेला आणि चादर दिली पंडितराव गोपाळशास्त्री व्यास मल्हार रामराव चिटणवीस आदिकरून राजमंडळ व पंताकडील असामीस सेलेपागोटीं देऊन विडे गुलाब अत्तर लवंग दिलीयाजवरी निरोप दिल्हा तसे च

बाहेरचे कचेरीस न बसतां निघोन प्रधानपंत आपल्या वाड्यांत गेले चवथे दिवशीं छ ७ रबिलाखर ज्येष्ठ शु॥ ८ गुरुवारी माहाराज व पंडित प्रधान यांची स्वारी माहुलीस गेली कैलासवासी शाहु माहाराज यांचे दर्शन घेतले दक्षणा फळे वाहिल्यावर प्रधानपंत श्रीकृष्णा स्नान करायास गेले माहाराज समागमे माहुलीचे पश्चमेस कळकीचे बागेंत गेले मातुश्री माईसाहेबानी संगमी स्नान केले पंतप्रधान यांची पाकशाला मळ्याचे पश्चमेस प्रारंभ जाहाला माहाराजांची रसई पूर्वेस साधी होती माहाराजांची स्वारी आलीसी पाहून कळकी पासून पायउतारा जोडा ठिकून डेऱ्या पर्यंत एउन मुजरा करून स्वयंपाकाची सिद्धता रांगोळ्या पत्रावळी पाट मांडले पाहून फिरोन गेले स्नान करून माहाराज भोजनास बसल्यावर आपण भोजनास बसले भोजन जाल्यावरी त्रिंबकजी डेंगळे याज बरोबर माहाराजास विनंति पाठविली च्यार घटका शयन करावे मजला हि आज्ञा जाहाली तर मी हि करीन नाही तर मर्जी असल्यास स्वारी सिद्ध आहे निघावे म्हणोन निरोप गेला रायाची मर्जी असेल तसे करावयाचे रायानीं च्यार घटका निजावे आम्हास दिवसा निजावयाची संवय नाहीं शयन करतो म्हणोन उत्तर गेल्या पंतप्रधान निजले अमात्य सुमंत चिटणीस व सरदार आले त्याणी ज्याचे शरीरास सुखावह वाटेल तसे शयन केले खासा दीड प्रहर दिवस राहातां माहाराज लक्ष्मी घोडीवर बसोन फेरली घोडीची झाड भारी त्यांत मोत्याची कंठी तुटली ते डावे हाते धरून खिजमतगारा जवळ धावताना दिली एक मोती गमावले तें दुसरे खिजमतगार पाहूं लागले त्यास माहाराजानी ताकीद केली कीं गमावले तरी गमावले पाहू नका ह्मणून आज्ञा केली पहावयाचे राहिले मोती गेले तेव्हा बागेचे नाव मोतीबाग ठेवावे कोणी ह्मटले सारी कंठी गेली असतां मोतीबाग ठेवावयास येते ह्मणोन माहाराज बोलिले घोडी फेरली हे प्रधानपंती पाहून संतोषी जाहाले भाऊसो व अप्पासो याणी हि घोडी फेरली नंतर प्रधानपंत माहाराजा कडे जाऊन पोषाक दिल्हा नंतर स्वारी निघाली साहा घटका दिवस सायंकाळचा राहातां शहरांत आले मार्गी बापू गोखले याणी घोड्यावर बसोन युद्धाची कवाईत दाखविली इटे पट्टे खेळून दाखविले त्यास अप्पासाहेबानी बोलाऊन आणून विडे दिले चांगली घोडीं फेरता बोलले राजमंदिरांत पोहचऊन पंतप्रधान सायंकाळी आपले वाड्यात गेले मातुश्री आईसाहेब किल्यावर होती त्यांस प्रहर रात्री खाली आणिली सामोरे बाजीराई जाऊन वाड्यांत पोहचती केली छ ८ रबिलाखर ज्येष्ठ शु॥ ९ भृगुवारी राजवाड्यात माहाराजाचे मेजवानीचे सोयरे लोक व श्रीमंता कडील मानकरी यास जाली च्यार पाच शे पात्र जाले भोजना पूर्वी पंत आपले वाड्यांत होते बापू गोखले यास निरोपाची वस्त्रे देऊन राजवाड्यात घेऊन आले राजदर्शन घेऊन पुण्याःवाचन करून सुमुहूर्ते माहाराजास ढाली बांधोन माहुलीस भोजनास पंत गेले बापू गोखले समा-

गमे जाऊन स्वारी पोहचऊन भोजनास शहरांत गोखले याज कडे बापू देशाचे घरा शेजारी आले श्रीमंत माहुलीहून आपल्या वाड्यांत आले माहाराज व मराठे लोक यांचा भोजनाचा समारंभ जाहाला दाली मुहूर्ते करून अगोदर बांधिली होती च परंतु सर्वत्र मराठे लोक याणी आपले हाते माहाराजास दाली बांधोन भोजनास उठले भोजन जाल्या नंतर सर्व मराठ्यांची सभा करून मराठ्यांचे देसत सिंहासना वर माहाराज बसोन दाली बांधोन नंतर पंतानी आपले वाड्यांत माहाराजास भोजनास न्यावयाचा बेत करून च्यार घटका रात्रीस राजवाड्यांत श्रीमंत एऊन मुजुमदार सुमंत पंडितराव चिटणीस व पोतनीस यांस पुढें चलावे म्हणोन पंतानी सांगोन पाठविले ते गेलेया वरी माहाराजांची स्वारीची तयारी करून निघाले माहाराज व अप्पासाहेब व भाऊसाहेब पालखीत बसोन मोर्चेल राजश्री वर उडत पुढें निलीब श्रीमंता कडील आली ती चालली पंत पायउतारा मोर्चेल धरीत वाड्यात गेले तिथे बंधू व चवथे चतरसिंग भोसले यांचे चिरंजीव होते वाड्यांत समारंभ चांगला लक्ष नेऊन आपण दशमी म्हणून सायंकाळ पर्यंत उपोषित राहून सायंकाळी माहाराजा सह भोजन केले आरास बहुतच खिरा चांगली केली माहाराजास पोषाक उमदे जडजवाहीर उभयता बंधू सुध्दा दिल्हे हत्ती एक व घोडा एक नजर केली मुजुमदार सुमंत पंडितराव चिटणीस पोतनीस यास साडे तीन तनगे वरकडास सेला-पागोटी तेरा तनगे दिली भोजनास फराळास उठावें म्हणून चिंतोपंता बरोबर निरोप पाठविला तसेच त्यानी हि अनमाने सांगितले एक + + +
( पुढें दोन चार बंद गहाळ )-

## ६२ शके १७३९ नंतर

लेखांक १ हा कागद माझ्या दप्तरांत होता. पुण्यास "कुंपणि इंग्रेज बाहादुर" यांचा अमल सुरू झाल्यावर एकवर्षांत हें जाहीरनामा-पत्र आलेलें आहे. इनामदार, वतनदार, जहागीरदार, सरंजामदार वगैरे यांनीं माजी सरकार पेशवे व इंग्रजसरकार यांशीं कसें वर्तन ठेवावें व तें तसें न ठेवल्यास त्याना परिणाम काय याबद्दल या पत्रांत स्पष्ट खुलासा आहे.

लेखांक २ हा जाहीरनामा ता० २९ माहे एप्रिल सन १८७५ इ. चा आहे. त्यावरून पुण्याच्या नजीक लष्कराची वसाहत सन १८७५ नंतर आली हें स्पष्ट होतें.

गं. ना. मुजुमदार.

J

रावसाहेब मेहरबां दोस्तां नारो नीलकंठ मजमदार दां मोहबत हु

ॐ अजीसोब राबर्टसन साहेब कलेक्टर सुभा पुणे सलांम बादज सलांम आंकी येथील खैरयत जाणोन आपली खेर आफियत हामेशा कलमे करीत जावे दीगर कुपणी सरकारांतून हाली येथे अलम उलिये( म ) चापलेन साहेब बाहादुर कमिसनर मुखत्यारीचे कामावर आहेत त्याणीं जाहीरनामा लिहिला आहे त्यांतील मजकूर कोणी शकस खुद बाजीरावसाहेब याशीं किंवा त्याच्या आनुमत्ता वरून दीगर कोणाशी तरी आपण खुद अथवा दुसरेयाचे मारफतीनें जबाब सवाल किंवा कागदपत्र आगर कोणत्या हि रीतीनें काही इलाखा ठेविल्यास त्यास सरकारातून सिक्षा चांगली होईल आणि जाहागीरदार व सरंजामी व इनामदार व वतनदार वगैरे लोकांस ज्यांस सरकारातून कांही चालत आहे त्या लोकां असें काही घडल्यास त्याचवेळेस त्यास जें कांही चालत आहे त्याची जफ्ती करून त्यासिवाय आणखी त्यास जी सिक्षा करणे सरकारास मुनासब आहे त्याप्रमाणें त्याप्रमाणें केली जाईल. याकरितां हुकूम तमाम लोकानीं नीट ध्यानास आणोन वर्तणूक करावी म्हणोन तारीख १२ नवंबरचा हुकूम जाहिरनाम्यांत लिहिला आहे. त्याजवरून हे पत्र आपल्यांस लिहिले आहे तरी सरकारचे जाहीरनाम्याप्रमाणे बाजीरावसाहेब याजकडे कागदपत्र किंवा हरयेकविशींचा इतला न ठेवितां कुंपणीसरकारचे हुकुमाप्रमाणे वर्तणूक करावी आगर बाजीरावसाहेब याजकडे इतला ठेवणे तर सरकार हुकमाने या मुलकातून निघोन जावे आगर तुमचे मनात बाजीरावसाहेब याजकडे हरयेकविशींचा शिलशिला ठेवीत नाही असें आहे तर खूप समजावे कीं तुमचा व त्यांचा कांहीयेक हरतरेचा सिलसिला आगर जाणखी कांहीं तरेचा फितूर आहे असें सरकारांत समजल्यास ते च समई आपली जाहागीर व तैनात व इनामत व वतने वगैरे याची जफ्ती करून पारपत्य केलें जाईल हें समजोन या दोन गोष्टींतून कोणते येक पसंत करून मेहरबानी करून या पत्राचें उत्तर जलद पाठवावे म्हणजे आंम्ही आपला इरादा काय आहे तो सरकारांत जाहीर करूं रा तारीख २२ माहे नवंबर सन १८१९ इसवी ज्यादा काय लिा प्यार मोहबत असो दिल्ही पाहिजे हे किताबत

हुकुम कुपणि
इंग्रेज बाहादुर
कलकटर पुणे

(इंग्रजी सही) ... राबर्टसन

पोाा छ ७ सफर सुा आशरीन मयातैन व अलफ शके १७४१ प्रमाथीनाम संवत्सरे मार्ग शुा ९

लेखांक २ नंबर ४

हवेलीचा नंबर यकसा. नकल

६९९

कुपणी सरकार विा कपतान इछल साहेब
बाहादुर असिश्टण सुपरेटेंट बाजार व पोलीस-
मास्तर पुणे छावणी लस्कर आदालत

जाहिरनामा तमाम लोकास कळावयाकरिता लिा जातो जे पुणे छावणी लस्कर येथे उदमी लोकाणी आनान व किराणा वगैरे हरजिनस वाहेढून अणून अमदानी करावी त्या लोकास सरकारातून चागली जागा देऊन परसी केली जाईल व सरकारातून जकात हि माफ जाली आहे दस्तुरी वगैरे बाबती खर्च काही येक पडणार नाही व त्या लोकाचे खुसीम येईल त्याजला विकावे यास्तव हा जाहिरनामा सर्व लोकास मालुम होण्याकरिता प्रगट केला जातो जे सदरी लिा अन्वये ज्याची खुसी असेल त्याणी हरजिनस आणुन लस्करात आमदानी करावी हे तहकीक समजावे ता। २१ माहे अप्रेल सन १८४५ इ॥

सही इग्रजी साहेबाची

असल बाा रूजू पाहणार
गोविंद बाजी कारकून हुजूर
मामलेदार हवेली

यातील माार पेट्यास गांवीं प्रगट करावा ता। ३ मे सन १८४५

सही साहेबाची

सही दप्तरदाराची इग्रजी
पौ ता। १० मिनहु

रुजु पाहणार बाबुराव वणेश कारकुन
ता। हवेली

राजेश्री गोविद सादाशीव नवे कारकून पा। हवेली तुम्ही आपले ताब्यातील हरयेक गावी याची नकल देऊन सर्व मजकूर जाहीर करावा ता। १२ माहे मे सन १८४५ इ॥

सखाराम बाळकृष्ण मामलेदार

# ६३ भगवानकवि कऱ्हाडकर

१ इतिहासमंडळाच्या शक १८३२ च्या इतिवृत्ताच्या ३४ व्या पृष्ठावर निरंजन पंढरपूरकर या साधुकवीच्या गणेशगीतेचा निर्देश केलेला आहे. त्यांत गणेशगीता निरंजनानें शक १५५४ त पंढरपुरास केली असें म्हटलें आहे. परंतु, तें बराबर नाहीं. गणेशगीताकार निरंजन पंढरपुरकर नव्हे, कऱ्हाडकर आहे. कऱ्हाडास निरंजनाचा मठ आहे, वंशज आहेत व समाधि आहे. वंशजांच्या संग्रहास निरंजनाची गणेशगीता हि आहे व तींत गणेशगीता पंरढपुरास संपविली असें म्हटलें आहे. १८३२ सालीं माझी अशी कल्पना झाली कीं ज्या अर्थी निरंजनानें गणेशगीता पंढरपुरास संपविली त्या अर्थी निरंजन पंढरपुरचा रहाणारा असावा. परंतु प्रस्तुत सालच्या म्हणजे शक १८३६ च्या माघांत कऱ्हाडास मिळालेल्या माहितीवरून स्पष्ट होत आहे कीं निरंजन हा कऱ्हाडचा रहाणारा होता. त्यांचे वंशज रा. रा. वासूअण्णा देव कऱ्हाडकर यांजकडून कांहीं फाटक्या तुटक्या पोथ्या व निरंजनाचें एक चरित्र मिळालें त्या वरून खालील हकीकत मंडळास सादर करतों.

२ नरसिंह पाठक या नांवेंकरून कोणी गृहस्थ कऱ्हाडास रहात होता. त्यास शक १५५९ ईश्वरसंवत्सरीं माघ शुद्ध चतुर्थीस येल्होबा नामें पुत्र झाला. त्यास च पुढें निरंजन म्हणूं लागले. निरंजन शके १६४३ त वारला. अर्थात्, त्यानें गणेशगीता ज्या ईश्वरसंवत्सरांत केली तो संवत्सर शक १६१४ त असला पाहिजे. पोथींत भौमवार या पाठाबद्दल भृगुवार हा पाठ हवा.

३ निरंजनानें पदें, श्लोक , वगैरे गणपतिपर कविता थोडीफार केलेली आहे. निरंजनाचा पुत्र रत्नाकर यानें हि कांहीं ग्रंथरचना केली आहे. रत्नाकराचा पुत्र भगवान्–यानें निरंजनाचें चरित्र लिहिलें. तें शक १८३६ च्या महाराष्ट्र–सारस्वतांत छापलें आहे. भगवानानें एकंदर खालील प्रकरणें रचिलीं.

१ निरंजनाचें चरित्र
२ विनायकमाहात्म्य
३ वक्रतुंडाख्यान
४ चिंतामणि अवतार
५ सिंदुरासुराख्यान
६ गणपतीपर ३१२ पदें
७ प्रातःस्मरामि
८ भृशुंडी आख्यान
९ गणपतिजन्म
१० किरकोळ कविता

पैकीं विनायकमाहात्म्याची समाप्ति अशीः—

शकें सोळा सें त्र्याहत्तरिं । माघशुद्ध चौथि गुरुवारिं ॥
करहाटिं प्रजापतिवत्सरिं । द्वितीय प्रहरिं समाप्ति ॥ २५ ॥

निरंजन जें तेज । तयाचा रत्नाकराब्धि आत्मज ।
जेथे भगवद्रूप उपजे । मत्स सहज क्रीडत ॥ २६ ॥
भगवान् बादरायण । संतरूपें प्रगटे भगवान ।
तेणें चि केलें ग्रंथवर्णन । न्यूनपूर्ण तो चि जाणे ॥ २९ ॥
कार्तिकशुक्ल प्रतिपदेतें । आरंभिला हा ग्रंथ ॥
परि मासद्वय अनाध्याय होत । समाप्ति माघांत जाहालि ॥ ३० ॥
प्रतिदिनि सवा शत । शत अथवा पावणे शत ।
लेखन जाहालें भगवद्धस्तें । भगवत्सत्ते कल्पोन ॥ ३१ ॥
दोंड सहस्रासि किंचित । उणा असे मूळग्रंथ ॥
परि टीका जाहलि द्विगुणित । भगवत्सत्ते जाणावें ॥ ३२ ॥
जन वन निरंजन । आदि मध्य अवसान ।
अवघा व्यापला भगवान । ग्रंथ पूर्ण पूर्णत्वें ॥ ३३ ॥
॥ इति श्रीस्कंदपुराणे विनायकमाहात्म्ये शिवस्कंदसंवादे
गणेशावतारवर्णनं नाम चतुर्विंशोध्यायः ॥ २४ ॥

म्हणजे सुमारें पंधरा वीस दिवसांत हा ग्रंथ भगवानानें रचिला.

४ प्रातःस्मरणांत भगवानानें इतक्या संतांचीं नांवें घेतलीं आहेत:—

गुरुपरंपरा

१ शंकराचार्य
२ हस्तामळक
३ भास्कर
४ लयानंद
५ सहजसिद्ध
६ लक्षानंद
७ परमानंद
८ काशीराज
९ निरंजन
१० रत्नाकर
११ भगवान

संतांचीं नांवें

१ ऋषिभट्ट
२ मौनी
३ मुकुंदराज
४ सरंगनाथ
५ केसरि
६ उद्बोध
७ निवृत्ति
८ सोपान
९ ज्ञानदेव
१० मुक्ता
११ वीरा
१२ सच्चिदानंद
१३ परसा भागवत
१४ भानुदास
१५ गैनी
१६ गैबी
१७ एका
१८ जनार्दन
१९ कृष्णदयार्णव

२० जयराम

२१ कान्होबा

२२ मालो

२३ गोसाविनंदन

२४ रामदास

२५ रमावल्लभदास

२६ सत्यपूर्ण

२७ दासोपंत

२८ शिवराम

२९ आनंदमूर्ति

३० गंगाधर अथर्वण

३१ तुका

३२ नामा

३३ चांगा वटेश

३४ विसोबा

३५ राघोदास

३६ मुक्तेश्वर

३७ स्वयंप्रकाश

३८ बल्लाळ

३९ हेमाडपंत

४० श्रीधर

४१ हरिनारायण

४२ चोखामेळा

४३ बोधराज

४४ संतु पोवार

४५ रोहीदास

४६ गोरा

४७ सांवता

४८ कबीर

४९ सज्जन

५० सुरदास

५१ कादर

५ प्रातःस्मरणांत खालील गणपतीचीं स्थानें भगवान नमूद करतोः—

१ अमळाश्रम

२ लिंबें

३ राजूर

४ म्हैसळें

५ प्रवाळ

६ मयूरेश्वर

७ आदेष

८ मुरूड

९ सिद्धटेंक

१० पुळें

११ रांजणगांव

१२ थेऊर

१३ पाली

१४ गणेशगुढी

१५ स्वानंदभुवन

१६ सेंदूरवाडें

१७ पारनेर

१८ धरणगांव

१९ खेड

२० वीसाद

२१ जुन्नर

२२ अंगापूर

६ निरंजनाला बालपणीं रामदास भेटले होते. परंतु रामाच्या ऐवजीं निरंजनाला गणपति च जेथें तेथें दिसूं लागला. पुढें पैठण येथील काशीराज यांजपासून निरंजनानें अनुग्रह घेतला. ही सर्व हकीकत निरंजनाच्या चरित्रांत इत्थंभूत आली आहे, सबब एथें पुनरुक्ति करीत नाहीं. कऱ्हाडास निरंजनाच्या

पादुका निरंजनाचे वंशज जे रा. वासुअण्णा देव त्यांच्या वाड्यांत आहेत. टांचणांत उल्लेखिलेले सर्व ग्रंथ मंडळाच्या संग्रहांत ठेवावयास दिले आहेत.

वि. का. राजवाडे

# ६४ गोविंद दीक्षित गरुड कऱ्हाडकर

१ कऱ्हाडास विठोबा अण्णा बेंद्रे दफ्तरदार हे एक चांगल्या पैकीं संस्कृत सुभाषितकार पन्नास वर्षांपूर्वी होऊन गेले. विठोबा अण्णाहून किंचित् अगोदर गोविंद दीक्षित गरुड हे एक संस्कृत कवि, ज्योतिषी व धर्मप्रबंधकार होऊन गेले. गोविंद दीक्षित गरुड यांचे पुत्र सिद्धेश्वर दीक्षित व सिद्धेश्वर दीक्षितांचे पुत्र गोविंद दीक्षित बिन सिद्धेश्वर दीक्षित हे आज (शक १८३६) हयात आहेत. विद्यमान गोविंद दीक्षितांचे आजे जे ग्रंथकार गोविंद त्यांनीं (१) ग्रहतत्व-विनोद-मूल व टीका, (२) मुहूर्ततरंगिणी, (३) कालप्रबोधोदय, (४) एकादशीप्रकाश (५) नवार्णविद्याप्रक्रिया, व (६) अग्रयणमंजूषा, हे साहा ग्रंथ संस्कृतांत केले आहेत. पैकीं मुहुर्ततरंगिणीचे एकंदर १८ तरंग आहत व १९ वा तरंग परिशिष्टा दाखल आहे. १८ व्या तरंगाचीं ग्रंथकार खालील पद्यें देतो.

श्लोकैरर्थगुणोत्तरैर्द्विशतकै २३५ र्निध्यंबुधिक्ष्माधर-
क्षोणीसंमित १७४९ शालिवाहनशके यो सर्वजिद्वत्सरे ॥
मार्गे श्रीमति कृष्णदिक्तिथिसुरेज्याहार्क्षभे सन्मुहू-
र्तानामच्छतरंगिणीं समकरोद्गोविंदसांवत्सरः ॥ १ ॥
ग्रामे येरवळाभिधे शुभतरे श्रीकृष्णवेणाककु-
द्मत्योः संगमतो जलेश्वरादिशि क्रोशद्वयस्यांततः ॥
तत्राभूत्किल जामदग्न्यजकुलालंकारनारायणः
तत्सूनुर्निगमागमज्ञचतुरः श्रीबालकृष्णस्ततः । २ ॥
गोविंदो गुरुपादपद्मयुगलध्यानाप्तविद्यालवः
श्रीगर्गात्रिवसिष्ठलल्लमिहिराद्युक्तिप्रबंधानुगा ॥
काव्यालंकृतिनाटकामृतरसस्वादूक्तिभाग्दैवविद्-
वृंदानां मुदमातनोतु हृदये तत्सूक्तिमुक्तावलिः ॥ ३ ॥
द्वात्रिंशदधिकैकोनपंचाशच्छतके कलौ ॥ ४९३२ ॥
स्वमुहूर्ततरंगिण्यां नौकां अर्थवतीं व्यधात् ॥ ४ ॥
तस्मिन्गोद्रींदुरामोने ३१७९ शकः स्यात् शालिवाहनः ॥
शाके व्यत्यष्टिभि १७ स्तष्टे शेषं मासः प्रजायते ॥ ५ ॥

यदीयजननेऽभ्यासीदर्थपूर्णघनः १७०५ शकः ॥
अर्थपूर्णघना तस्य किं न्न जायेत भारती ॥ ६ ॥
( अर्थ ५, पूर्ण०, घन १७ )

॥ इतिश्रीगोविंददैवज्ञाविरचितायां मुहूर्ततरंगिण्याष्टीकायां नौकाभिधायामलंकारतरंगोष्टादशः ॥ श्रीगुरुचरणौ जयतः ॥ श्रीज्योतिर्लिंगमूलपीठनिवासिन्योश्चरणारविंदार्पणमस्तु ॥ छ ॥

विदुषां कृतयः संति कोटिशो जगतीतले ॥
परस्त्वेकांगिकाः प्रायः सर्वांगिन्यो न मत्पराः ॥ १ ॥
इत्थं तथ्यमतथ्यं वा विद्वांसो वीतमत्सराः ॥
माध्यस्थबुध्या जानंत गुणज्ञा गुणिनो यतः ॥ २ ॥
॥ ग्रंथसंख्यापातत: १५००० ॥
समाप्तोयं ग्रंथः ॥ तरंगाः १८ ॥
श्रीगुरुं वंदे ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

मुहूर्ततरंगिणीच्या समाप्तीनंतर गोविंद दीक्षितांच्या मृत्यूसंबंधानें खालील टिपण केलेलें लिहिलें आहे. म्हणतात कीं हें टिपण मरणदिवशीं गोविंद दीक्षितांनीं स्वतः लिहून ठेविलें आणि हस्ताक्षरावरून पहातां तें लिहिणें त्यांचें असावें असें वाटतें.

मंजूषां च तरंगिणीं सविवृतिं कालप्रबोधोद्वयं
कृत्वैकादशिकाप्रकाशमृनुमुन्यब्द्प्रसंख्ये शके १७७६ ॥
विद्वत्पूज्यतमो नभोंतिमतिथौ ब्रह्माप सौम्ये दिने ।
क्षेत्रे श्रीकरहाटकेऽमलमतिर्गोविंदसांवत्सरः ॥ १ ॥

म्हणजे ( १ ) मंजूषा, ( २ ) तरंगिणी, ( ३ ) कालप्रबोधोदय व ( ४ ) एकादशिकाप्रकाश, हे चार ग्रंथ करून गोविंद दीक्षित शक १७७६ त ब्रह्म मिळविता झाला. गोविंद दीक्षिताचा जन्म शक १७०५ त झाला होता, हें मागील एका पद्यांत सांगितलें च आहे.

परिशिष्टरूप जो एकोणिसावा तरंग त्याच्या शेवटीं खालील पद्यें प्रतिनिधींच्या प्रशस्तिपर आहेत:—

प्रभोः परशुरामस्य कीर्त्या साकं तरंगिणी ॥
एषा विद्वदकूपारानाश्लेषयतु सर्वतः ॥ ५ ॥
श्रीशाहुभूपप्रतिनिध्यन्ववायो जयत्वसौ ॥
यं प्राप्यार्थि(ज)नोन्यस्य पुनर्नोद्वीक्षते मुखं ॥ ६ ॥

यावल्लोके यदीयं विमलतरयशः श्रूयतेऽस्त्येव पुंसः
तावत्तस्य प्रतिष्ठा सह दिवि दिविजैर्दिव्यदेहाश्रयेण ॥
सा यादृक् सत्कवीनामभिनवरसवद्भिव्यसारस्वतौघात्
तादृङ्नैवान्यकृत्या (?) न इह नृपतिभिः सेवनीयाः स्वकीर्त्यै ॥ ७ ॥

दुर्गाश्रयोत्युत्पथदक्षशिक्षो
भूत्याशयः सन्नरवाहनाढ्यः ॥
सद्भोगशाली सकलाधरोऽतः
कथं नृपो नो शिव एव साक्षात् ॥ ८ ॥

यः साक्षाच्छिवभूपतेः प्रतिनिधिस्तत्कार्यपूर्तिक्षमः
सर्वामात्यधुरंधरः परशुरामाख्योऽभवत्त्र्यंबकात् ॥
तस्यासीत्तनयः सतामभयदः श्रीकृष्णरायः प्रभुः
तस्य द्वौ तनयौ बभूवतुरलं गंगाधरत्र्यंबकौ ॥ ९ ॥
श्रीगंगाधरतो ऽभवत्प्रभुवरः श्रीश्रीनिवासाभिधः
कृत्स्नक्ष्मातलवर्तिपंडितचकोरानंदकृच्चंद्रमाः ॥
दग्ध्वा येन रणांगणे निजभुजप्रौढप्रतापानल-
ज्वालामंडलसत्कमात्मजनकभ्रातृव्यसेनातृणं ॥ १० ॥
श्रीशाहुक्षितिपालसत्प्रतिनिधित्वस्याधिकारं दधौ
तस्मादाप समुद्भवं परशुभृद्रामाव्हयः सत्प्रभुः ॥
स स्वीयामलकीर्तिवृद्धय इहामुत्रानिशं लालय-
त्वेनं वंशधुरंधरं सुतामिव ग्रंथं सुवृत्तांचितं ॥ ११ ॥

श्रीमतः परशुरामशर्मणः
सत्प्रभोः प्रतिनिधेर्भुवि कीर्तिः ॥
विस्तृतिं समुपयातु विशेषै-
र्मत्कृतौ मुनिपरंपरया ऽऽसैः ॥ १२ ॥
कृतौ यदि स्याद्यतिवर्णपाद-
विपर्ययो मे न च दूषणं तत् ॥
स्वभावरम्यस्य शिशोर्जनस्य
भाले ऽकनं कज्जलतो यथावत् ॥ १३ ॥
निंदंतु वा मां यदिवा स्तुवंतु
लोके यथेच्छं न हि मे विषादः ॥
नैसर्गिकं मुंचति न स्वभावं
विद्वानविद्वानपि जातु कश्चित् ॥ १४ ॥

॥ इति श्रीमदग्निष्टोमसोमयाजिश्रीगोविंदसांवत्सरविरचितायां मुहूर्ततरंगिण्यां एकोनविंशोऽलंकारतरंगः ॥ १९ ॥ श्रीगुरुचरणौ जयतः ॥

वरील पद्यांवरून ध्यानांत येईल कीं प्रस्तुत ग्रंथकारास प्रतिनिधींचा चांगला आश्रय होता. प्रतिनिधींची जी प्रशस्ति ग्रंथकारानें केली आहे ती इतर ग्रंथकारांच्या प्रमाणें च अतिशयोक्त आहे. आपला आश्रयदाता सर्वगुणसंपन्न होता व त्यानें सर्व रिपूंचें दमन केलें होतें, हा ठरीव मायना प्रस्तुत ग्रंथकारानें हि गिरविला आहे. तत्रापि एवढें खरें कीं वैदिक, श्रौति व ज्योतिषी यांना प्रतिनिधींचा आश्रय असे. प्रतिनिधींनीं माहुली, सैदापूर, व इतर गांव ब्राह्मणांना अग्रहार कदीम व जदीद चालविले होते.

२ कालप्रबोधोदयाचा प्रारंभ येणेप्रमाणें:—

शिवं शिवासूनुमिनेंदुमुख्यान्
नभश्चरान् स्वीयगुरून् प्रणम्य ॥
गोविंदशर्मा त्रिजनीप्रपन्नः
कालप्रबोधोदयमातनोति ॥ १ ॥

( त्रिजनि—शौक्ल । सावित्र—याज्ञिक )

समाप्ति येणेप्रमाणें:—

शाकेंद्वद्रिमुनींदुभिः १७७१ परिमिते सौम्याव्हयेब्दे शुचौ
द्वादश्यां सितपक्ष इंदुदिवसे कालप्रबोधोदयः ॥
संपूर्ति समगाद्बुधैः सुकृतिभिः शोध्यः सदैवादरान्
नो पांथैः पथि सत्तरोरुपकृतिः कार्यालवालेन किं ॥ ३ ॥

॥ इति श्रीमदग्निष्टोमसोमयाजिगरुडोपनामकश्रीबालकृष्णदीक्षितदैवज्ञसूनु—
श्रीगोविंददीक्षितदैवज्ञविरचितः कालप्रबोधोदयः समाप्तः
॥ सर्वग्रंथसंख्या १०८३९ ॥
॥ एकंदर ग्रंथ पत्रें ३५० ॥

कालप्रबोधोदय हा धर्मग्रंथ आहे.

३ एकादशीप्रकाशाचा प्रारंभः—

नत्वा गुरूणां चरणारविंदं
हेरंबमार्यामिनमीश्वरं च ॥
विष्णुं तथा वीक्ष्य बहून् निबंधान्
कुर्वेहमेकादशिकाप्रकाशं ॥ १ ॥
हेमाद्रिसिंधुप्रमुखा निबंधा
महत्तराः संति परं तु तेषु ॥

खिद्यंति मुग्धाः किल नित्यमस्मात्
सुखार्थमेषा कृतिरस्तु तेषां ॥ २॥

कुर्वंति वैखानसपंचरात्रागमोक्तदीक्षाचरणं द्विजा ये ॥
ते वैष्णवास्तत्कुलजा अपि स्युस्तथास्तूक्तविपर्ययेण ॥ ४ ॥
स्मार्तास्त्वथो भागवताः स्वकीयपरंपराचारवशात्प्रसिद्धाः ॥
येनास्य याताः पितरस्तु तेन पथैव यायान्मनुरित्थ माह ॥ ५ ॥

समाप्ति अशीः—

कृष्णापाकतटवर्तिनि द्विजवरो विद्वज्जनालंकृते
क्षेत्रे श्रीकरहाटकेऽतिविमलेऽभूद्बालकृष्णाभिधः ॥
गोविंदेन तदात्मजेन रचितः श्रीमाधवस्याश्रयात्
स्पष्टः स्वल्पतरो मुदेऽल्पकाधियामेकादशीनिर्णयः ॥ ७१ ॥

रामराममुनिभूमिसंमिते १७३३
शालिवाहनशके प्रजापतौ ॥
हायने तपसि मासि पूर्णतां
संगता कृतिरियं हि पक्षतौ ॥ ७३॥
अंगवेदमुनिभूप्रमितासु १७४६
शालिवाहनसमासु गतासु ॥
तारणेषबहुलांत्यजयायां
दीपिकोदयमगादचलायां ॥ १ ॥
( इष आश्विनः । अंत्यजया त्रयोदशी । )

श्रीमद्गणेशः किल जामदग्न्यवत्सान्वयेऽभूत्तनयस्तदीयः ॥
नारायणः प्रादुरभूच्च तस्माच्छ्रीबालकृष्णो निगमागमज्ञः ॥ २ ॥
तस्मादुमायां जननं प्रपन्नो गोविंदशर्मारचयत्सुबोधं ॥
एकादशीनिर्णयसत्प्रकाशं स्वच्छात्मधीशुक्तिपुटांतरस्थैः ॥ ३ ॥

॥ इति श्रीकरहाटकस्थगरुडोपनामकश्रीबालकृष्णदैवज्ञात्मजश्रीगोविंददैवज्ञविरचितैकादशीप्रकाशटीकायां दीपिकाभिधायां चरमवर्णध्वंसः ॥

समाप्तोयं ग्रंथः ॥

॥ शके १७४७ पार्थिवाब्दे वैशाखशुक्ल ३ तृतीयायां गुरौ गरुडोपनामकगोविंददैवज्ञेन लिखितमेतत् ॥ श्रीगुरुचरणा जयंतु ॥

श्रीमूलपीठवासिनी जयति ॥ श्रीरवलनाथाय नमः ॥
पूर्वार्धं १४०० उत्तरार्धं २००० एवं ग्रंथः ३४००

एकादशीनिर्णयाचें किंवा एकादशीप्रकाशाचें मूलमात्र ग्रंथकारानें शक १७३३ त म्हणजे आपल्या वयाच्या २८ व्या वर्षी केलें. नंतर १३ वर्षांनीं शक १७४६ त त्यावरील टीका केली व स्वतः सटीक मूळ शक १७४७ त लिहून काढिलें. ग्रंथकारानें एकादशीनिर्णय करतांना बहुत विद्वत्ता व वाचन दाखविलें आहे.

४ ग्रहतत्वविनोद हा ग्रंथ फलज्योतिषाचा हि आहे व सुभाषितविनोदरूप हि आहे. ग्रंथाचे एकंदर श्लोक २४३ आहेत व टीकाग्रंथ २७६० आहे. ग्रहांचीं उच्चनींचें सांगतांना कवि लौकिक विनोद करतो. तो विनोद हि प्रायः उत्तान व ग्राम्य नसून मर्यादित असतो. एततः कवि च म्हणतो,

मर्यादितविनोदेन जायतेऽतिचमत्कृतिः
सुभ्रूभंगकटाक्षेण स्वल्पेनेव मृगीदृशः ॥

कवीच्या विनोदाचे दोन चार मासले देतो.

(१)

यथा मेषांगभुग्भास्वान्वीर्याढ्यो न तथाऽन्यतः ॥
झष १ कर्को ४ पभोगेऽपि यतः स रुधिरप्रियः ॥ १२ ॥

॥ रुधिरः भौमः ॥

मेषलग्नभुक् सूर्यः सामर्थ्यवान् । न तथा मीनकर्कराशिस्थः ।

(२)

अविचारोऽपि सूर्यस्य महत्वायोपकल्पते ॥
तत्सहायं प्रकुर्वतींद्वारदेवेंद्रपूजिताः ॥ २६ ॥

(३)

कदाचिदपि न द्वेष्यो द्विजराजः शुभेप्सुभिः ॥
उपदेष्टुमिदं सर्वा... द्विषंत्यपि तं ग्रहाः ॥ ९० ॥

(४)

तव दाहलका(? कता) भौम वृश्चिकेनाऽनुभूयते ॥
तस्मिन्भवदधिष्ठानादद्वयोरस्ति किमंतरं ॥ ३४ ॥

ह्या श्लोकांतील विनोद जाणावयाला फलज्योतिषाचें कांहीं ज्ञान हवें. ह्या ग्रहतत्वविनोदाचें मूल गोविंददैवज्ञानें केलें व त्यावर टीका विश्वनाथतांत्रिकानें केली.

५ नवार्णविद्याप्रक्रिया गोविंद दीक्षितांनीं शक १७५९ त रचिली. दीक्षितांच्या इतर ग्रंथां प्रमाणें च हा हि ग्रंथ विद्वत्ताप्रचुर आहे. ह्या ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. ह्यांत सप्तशतीचा पाठ करण्याची पद्धति सशास्त्र

व सुलभ अशी सांगितली आहे. नवार्णविद्याप्रक्रियेला च चंडीप्रक्रिया म्हणून गोविंद दीक्षित म्हणतात. या प्रक्रियाग्रंथाची समाप्ति अशीः—

॥ इति श्रीगरुडोपनामक–श्रीबल्लालात्मज–गोविंददैवज्ञाविरचिते
उपासनारहस्ये चंडीप्रक्रियायां सप्तमं विलासतंत्रं ॥ ७ ॥

या समाप्तींत गोविंद दीक्षितांनीं आपल्या वाडिलांस बल्लाल ह्या अभिधानानें उल्लेखिलेलें आहे. दीक्षितांनीं पूर्वीच्या ग्रंथांत आपल्या वाडिलांचा उल्लेख बालकृष्ण या नांवानें केलेला आहे. अर्थात् बालकृष्ण म्हणजे च बल्लाल, असा गोविंददीक्षिताचा अभिप्राय दिसतो. एकट्या गोविंद दीक्षिताचा च तेवढा असा अभिप्राय होता असें नव्हें. शक १७०५ च्या पूर्वीं हि असा च अभिप्राय महाराष्ट्रांत प्रचलित असलेला दृष्टीस पडतो. पेशव्यांच्या कुळाच्या आद्य प्रतिष्ठापकाचें नांव बालाजी, बाळाजी ऊर्फ बाल किंवा बाळ असें आहे. त्याचा पुत्र बाजीराव आपल्या पित्याला बल्लाल बल्लाळ असें म्हणतो, हें प्रसिद्ध आहे. म्हणजे बाल अथवा बालाजी या नांवाचें च अपर रूप बल्लाल, बल्लाळ आहे, अशी समजूत महाराष्ट्रांत शक १६४० पासून आहे. येथें आतां असा प्रश्न उद्भवतो कीं बाल किंवा बालाजी ह्या शब्दाचें बल्लाल किंवा बल्लाळ असें रूपांतर संस्कृत किंवा मराठी भाषांत कोणत्या प्रक्रियेनें व्हावें ? बाल हा संस्कृत शब्द आहे असें धरलें तर या संस्कृत शब्दापासून बल्लाल हा शब्द कसा व्हावा ? बाल हा मराठी शब्द धरून त्याचें संस्कृतीकरण बल्ल असें संस्कृतप्रिय शास्त्र्यांनीं केलें असावें, असें कित्येक जण सुचवितात. आतां ही सूचना एक वेळ मान्य केली, तत्रापि त्या मान्यतेनें बल्लाल हें रूप कांहीं सिद्ध होत नाहीं. बल्ल याला स्वार्थक लप्रत्यय लागून बल्लल असें रूप होईल, बल्लाल असें रूप होणार नाहीं. तेव्हां, बाल या शब्दाचें अपर रूप बल्लाल समजणें अयुक्त दिसतें. माझ्या मतें बल्लाल या शब्दाची व्युत्पत्ति शोधावयाची म्हणजे हा शब्द किती जुना आहे व जुन्यांत जुनें असें या शब्दाचें कोणतें रूप आहे, तें पाहिल्या विना खरा पत्ता लागणार नाहीं. शक १०२५ त असणाऱ्या होयसळवंशीय एका राजाचें नांव बल्लाल असें होतें. तदनंतर यादव, शिलाहार इत्यादि राजवंशांत बल्लाल हें नांव आढळतें. म्हणजे बल्लाल हें नांव आठशें वर्षांचें जुनें आहे. होयसळ हे मराठीभाषे सारखी एखादी प्रांतिक प्राकृत भाषा बोलणारे होते. बल्लाल होयसळ याचा पुत्र जो विष्णुवर्धन त्याच्या एका स्त्रील उद्वृत्त–सवती–गंधवारणे असें विशेषण लावलेलें सांपडतें. या विशेषणांतील सवती हा शब्द सपत्नी बद्दल प्राकृत म्हणजे मराठी आहे. ह्यावरून स्पष्ट आहे कीं होयसळ राजे व राण्या प्राकृत भाषा बोलत. विष्णुवर्धनाचें प्राकृत नांव बिट्टिग असें असे. तत्कालीन अनेक राजांचीं जशीं संस्कृत नांवें असत तशीं च प्राकृत

हि असत. आतां बल्लाल होयसळ याचें प्राकृत नांव किंवा संस्कृत नांव काय असावें तें पाहूं. बल्लाल हा शब्द संस्कृत नाहीं, या बद्दल शंका च नाहीं. शक १०२५ च्या पूर्वी बल्लाल हा शब्द च संस्कृत भाषेत आढळत नाहीं. तेव्हां हा प्राकृत शब्द आहे, हें निश्चित होय. याचें संस्कृत काय असावें ? याचें संस्कृत वल्लभ असावें असें दिसतें. संस्कृतांत वल्लभ हें विशेषनाम हि आहे व विशेषण हि आहे. कित्येक राजांचें हें बिरुद आहे व प्रसिद्ध वैष्णवाचार्यांचें हें नांव आहे. वल्लभ या संस्कृत शब्दाचें प्राकृत रूप बल्लह. बल्लह चा अपभ्रंश बल्ला. बल्ला या शब्दाला स्वार्थक ल प्रत्यय लागून बल्लाल हें रूप सिद्ध झालेलें आहे. संस्कृतांतूनें मराठींत आलेल्या विशेषनामांना हा स्वार्थक ल प्रत्यय लागतो. जसें: विष्णु= विठ्ठु=विठुल=विठल; श्यामः=सांव=सांवळा; कृष्ण=कन्ह=कान्हुला; इ.इ. इ. तात्पर्य बल्लाल हा प्राकृत शब्द आहे व याचें संस्कृत वल्लभ असें आहे. वल्लभ हें विशेषण गोपीवल्लभ जो श्रीकृष्ण ऊर्फ बालकृष्ण त्याला लावतात. त्यावरून बालकृष्ण ऊर्फ बाल या संस्कृत नांव धारण करणाऱ्या व्यक्तीला वल्लभ शब्दापासून निघालेल्या बल्लाल ह्या शब्दानें उल्लेखितात. इत्यर्थ एवढा च कीं वल्लभ या शब्दाचें प्राकृत रूप बल्लाळ हा शब्द आहे. बालकृष्ण या शब्दांतील बाल या अवयवापासून बालाजी, बालोजी, बाळूजी, हे मराठी शब्द निष्पन्न झाले आहेत. परंतु, बालाजी म्हणजे कांहीं बल्लाल नव्हे. आतां श्रीकृष्णाला बाल हि म्हणत व वल्लभ हि म्हणत त्या अर्थी बालाजी, बाल हीं जशीं श्रीकृष्णाचीं नांवें आहेत, त्याप्रमाणें च बल्लाल हें हि श्रीकृष्णाचें च एक नांव आहे. आणि अशी स्थिति असल्यामुळें, बाल ऊर्फ बालाजी अथवा बाळाजी ह्या शब्दाचा बल्लाल ऊर्फ बल्लाळ हा शब्द अपरपर्यायरूप आहे असा समाजांत समज झालेला आहे. व्युत्पत्तिदृष्ट्या बाळाजी व बल्लाळ हे दोन शब्द दोन निरानिराळ्या संस्कृत शब्दांपासून निघाले आहेत.

नवार्णवविद्याप्रक्रियेची एकंदर ग्रंथसंख्या २१०० आहे.

६ अग्रयणमंजूषानामक ग्रंथाची ग्रंथसंख्या २२५ असून, तो गोविंददीक्षितांनीं शक १७५५ त लिहिला. ह्यांत अग्रयणत्रयाचा निर्णय केला आहे.

७ गोविंददीक्षित गरुड यांनीं ग्रंथरचना संस्कृतांत केली. मराठींत प्रायः एक अक्षर हि लिहिलें नाहीं. हे शक १७७६ वारले. म्हणजे त्यांना होऊन व जाऊन आज बराबर ६० वर्षें झालीं. महाराष्ट्रांत निव्वळ संस्कृतांत ग्रंथरचना करणारे जे शतशः ग्रंथकार गेल्या आठशें वर्षांत झाले त्यांतल्या अलीकडल्यांतले अलीकडील हे गोविंददीक्षित गरुड होते असें विधान, कांहीं अपवाद वजा केले असतां, करतां येण्यासारखें आहे.

६ प्रस्तुत साही ग्रंथ विद्यमान गोविंददीक्षित गरुड यांचे संग्रहास आहेत.

वि. का. राजवाडे

## ६५ रामचंद्रपंडितविरचितः वृत्ताभिरामः

१ हा वृत्ताभिराम ग्रंथ संस्कृतांत आहे. ह्याचा कर्ता रामचंद्र पंडित. यानें हा वृत्तग्रंथ शक १७४६ त रचिला. ह्याची समाप्ति अशीः—

श्रीमान् कृष्णात्रिगोत्रे बुधवरमहितो याजुषो रामसूनु-
र्योगी सिद्धेश्वराख्यः सकलहितकरस्तत्सुतो रामचंद्रः ॥
ग्रंथो वृत्ताभिरामाभिध इह रचितस्तेन शाके रसाब्धि-
क्ष्माभृद्भूसंमिते १७४६ श्रीरघुवरपदयोरर्पितस्तारणेद्धे ॥

॥ इति श्रीमद्विद्वन्मुकुटालंकारहीरवर—श्रीमत्सित्धेश्वरसूरिसूनु—श्रीमद्रामचंद्र-पंडितविरचितो वृत्ताभिरामनामायं ग्रंथः समाप्तः ॥

श्रीशाके १७४८ व्ययनामसंवत्सरे फाल्गुनशुक्ल १० गुरौ श्रीकरहाटकस्थ-गरुडोपनामक—गोविंददेवाविदा लिखितोयं ग्रंथः ॥

२ ग्रंथाचे एकंदर पांच अध्याय आहेत—पहिल्यांत परिभाषा, दुसऱ्यांत मात्राछंद व वक्त्र, तिसऱ्यांत समवृत्तें, चवथ्यांत अर्धसमवृत्तें व पांचव्यांत प्रस्तार, असा प्रकार आहे.

३ ग्रंथाच्या मुखपृष्ठावर खालील वाक्य आहे.

॥ श्रीनृसिंहपुरस्थ—श्रीबाबामहाराजविरचितो ऽ यं ग्रंथः ॥

रामचंद्र पंडिताला च बाबामहाराज म्हणत असत, असें दिसतें व तो कृष्णा-काठच्या नरसिंगपुरास रहात असे. कऱ्हाडापासून नरसिंगपूर चार कोस आहे.

४ महाराष्ट्रांत अलीकडे संस्कृतग्रंथरचना ज्यांनीं केली त्यांपैकीं बाबामहा-राज हे एक होत. ग्रंथ गोविंददीक्षित गरुड कऱ्हाडकर यांच्या संग्रहाला आहे.

वि. का. राजवाडे

## ६६ रामचंद्रदैवज्ञविरचित मराठी छंदोमंजरी

१ उंबरजेच्या दक्षिणेस चार मैलां वर बेलवडें म्हणून एक लहानसें खेडें आहे, तेथें ज्योतिष्यांचें एक नामांकित घराणें मराठेशाहीच्या काळांत नांदत होतें. त्या घराण्यांत रामचंद्र दैवज्ञाचा जन्म झाला. हा ज्योतिषी छत्रपति प्रताप-सिंह यांचा आश्रित होता व राजाकडून याला दोन चाहूर जमीन इनाम मिळाली.

रामचंद्र दैवज्ञानें मराठींत छंदोमंजरी नामक ग्रंथ शक १७४१ च्या सुमारास केला त्याची एक प्रत कऱ्हाड येथील रा० रा० गोविंद दीक्षित गरुड यांच्या संग्रहास असलेली मला आढळली. तिचा प्रारंभ असा:—

वेदांतवेद्यहरिच्या नमितो पदातें
इछूनिया सरस भारतिसंपदातें ॥
व्याजें कशा हि गुणनाम तदीय घेती
अज्ञानता सकळ जे हृदिची निघे ती ॥ १ ॥
छंदोमंजरि करि हे बहू उपायीं
अर्पीया सजलघनाभकृष्णपायीं ॥
रामज्योतिषि पुडती रसज्ञलोका
प्रार्थीतों तुमि च परी बरी विलोका ॥ २ ॥

ग्रंथाची समाप्ति अशी:—

प्राकृतकवनीं न दिसे वृत्ताचें नाम पाहता पहिलें ॥
यास्तव पद्येंकरुनी गणनामातें कळावया लिहिलें ॥ २ ॥

॥इति श्रीत्रिस्कंधपारंगत-गणकचक्रचूडामणि-विविध-विद्यारसिक-श्रीरामचंद्रदैवज्ञ-रचिता छंदोमंजरी समाप्ता ॥

॥ शके १७४१ सर्वजिद्वर्षे ज्येष्ठकृष्ण १३ भृगौ
श्रीकरहाटकस्थगरुडोपनाम्ना गोविंदज्योतिर्विदा
लिखितेयं छंदोमंजरी ॥ श्रीगुरवो जयंतुराम् ॥

रामचंद्रदैवज्ञ हे गोविंददीक्षित गरुड त्यांचे ज्योतिषशास्त्रांतील गुरु होते. रामचंद्रदैवज्ञांनीं कांहीं अपूर्व अशी ग्रंथरचना ज्योतिषशास्त्रांत केली आहे. त्या पैकीं कांहीं ग्रंथ माझ्या धुळें येथील संग्रहांत आहेत. पैकीं कांहीं ग्रंथांच्या पाण्यानें भिजून भाकरी झालेल्या आहेत. कोणी ज्योतिषशास्त्रज्ञ त्या भाकरी काळजीनें उलगडून आंतील मजकूर पाहील, तर ग्रंथकाराच्या रचनेचें व माझ्या सारख्या ग्रंथसंग्राहकाचें समाधान होईल.

२ छंदोमंजरींत एकंदर पद्यें ८९ आहेत, तीं सर्व ग्रंथकाराचीं स्वकृत आहेत; एक हि अन्यग्रंथोद्धृत नाहीं. ग्रंथ कऱ्हाडास गोविंददीक्षितांच्या संग्रहास आहे. ग्रंथाच्या शेवटीं रामचंद्र दैवज्ञानें खालील दोन पद्यें दिलीं आहेत.

मूर्ख तोषति जसे नकलानी
शास्त्ररीतिनि तसे न कलानी ॥
स्वैरिणी विटजना सरमा ही
गोड नो वधु मनास रमा ही ॥ १ ॥

आशे तूं तरुणी सदैव अससी त्वत्कामपूर्त्ती जरी
व्हावी सोड तरी मला निरखुनी निःसत्व रोगी जरी ॥
पाहा धृष्ट युवा तयास च वरी नोचेत् घटस्फोट ही
कर्ता मी मग कोण ही तुज वरी नां लावि ना पाटही ॥ २ ॥

वि. का. राजवाडे

---

## ६७ महालक्ष्मीशकुनवंती

१ ह्या शकुनवंतीची भाषा शक १५०० च्या सुमारची आहे. ग्रंथ संस्कृतावरून घेतलेला नाहीं, असें वाटतें. हनुमान्–शकुनवंती, रामसीता–शकुनवंती वगैरे शकुनवंत्या आहेत, त्यांहून ही शकुनवंती निराळी आहे. प्रारंभ असाः—

॥ श्रीगणेशाय नमः ॥
॥ श्रीमार्तंडभैरवाय नमः ॥
॥ शकुनवती ॥

ॐ नमो चैतन्याद्वय तूं तुळसीकृष्ण आत्मारामा गोपाळ सासिदंत सद्गुरवे । श्रीतुळसीचा फासा कीजे । शनिवारीं अवतून रविवारीं अवतून इतरा चे दृष्टी स पडा न दीजे त्या वरी महालक्ष्मी ऐसे लिहिजे । त्रिवेळा फासा टाकिजे । अक्षर शुभ–अशुभ पाहिजे । त्यास संशय नाहीं ॥ प्रश्न ६४ ॥ या चा जो अविश्वास मानील त्या स गोराजनप्रायश्चित्त मातृका वधलेल्या चे पातक हे सत्य सत्य सत्य त्रिवाचा सित्थ वाचा स ए ॥

मासल्या करितां एक उत्तर देतोंः—

मक्ष्मील

ऐक गा प्रश्नकरणारा ऐक तुवा परकार्या कारणे बहुत अंतःकर्ण करून चिंतिले पाहे गा पाहा पाहा इकडे पाहे तु चींता केलि परि ते न फले बहुत कष्ट असे अधीका पीडा होईल बरवे दिसत नाहीं प्रवाही पडो नको दुष्टबुधी धरू नको तुज मातुश्रीची ( ए ) रुपे ने बरवे असे ॥ १५ ॥

२ शकुन सांगणारा व ऐकणारा असे सर्व गांवच्या देवळांत बसतात. पंचाक्षरी किंवा गुरव हातपाय धुवून पाटा वर बसतो. नंतर फास चतुरंग घेऊन प्रश्न विचारिल्या नंतर तीन वेळां टाकतो. तीन अक्षरें जोडून पोथींत पहातों किंवा चौसष्ट हि उत्तरें तोंडपाठ एत असल्यास, आंग हालवून, शेंडी झाडून, व मुद्रा गंभीर करून, ऐका हो ऐका, किंवा भले हो भले, किंवा अहो प्रश्नकरिते हो, अशा संबो-

धना उच्च स्वरानें करून, शंख, घटा, ताम्हण, पळी, कुडमुडे वगैरे जें असेल तें वाद्य वाजवून पंचाक्षरी उत्तर सावकाश उच्चारितो. नंतर नारळ फोडितात व दक्षणा मिळाल्या वर समारंभ आटोपतो.

पोथी सोबत पाठविली आहे, ती मंडळाच्या संग्रहांत राहील.

वि. का. राजवाडे

## ६८ मोरोपंतकृत सन्मणिमाला

१ ही प्रत वाटेगांवकर शास्त्री यांच्या दप्तरांतील आहे. हींत समाप्तिनंतर खालील आर्या आहेतः—

निर्जितगंगाभगाभंगाकर आर्यकीतुकारामः ।
श्रीनारदवाल्मीकिव्याससखो जयति कौ तुकारामः ॥ १ ॥
जो कुलज हि अभिमानी ज्याचा प्रद्वेष यातुकारामीं ॥
म्हणतो तद्विंयेते सीता तन्मतिस या तुकारामीं ॥ २॥

ह्या आर्या मोरोपंतकृत आहेत किंवा अन्यकृत आहेत, तें सांगतां येत नाहीं. प्रायः त्या पंतकृत असाव्या, असा यमकांवरून तर्क धांवतो.

२ ह्या प्रतींत एकंदर आर्या १११ एकशें अकरा आहेत.

३ हींत खालील दोन आर्या मननीय आहेतः—

त्या नमन वर्णुनी रघुपदयुगलीला स्वभक्तवशगेला ॥
जो रामदास तनुसह वैकुंठातें करूनि यश गेला ॥ ३६ ॥
कर जोडितों सुटाया तनुरूपा तापेंहतुकारा मीं ॥
कीं सतनु मुक्त झाला योगाची सिद्धि हे तुकारामीं ॥ ४७ ॥

ह्या दोन आर्यांत रामदास व तुकाराम तनुसह वैकुंठास गेले असें पंत वर्णन करितात. तुकाराम सदेह वैकुंठास गेला, ह्या विधानासंबंधानें सध्यां वाद माजून राहिलेला आहे. त्या वादाचा निकाल, रामदास हि सतनु वैकुंठास गेला ह्या पंतोक्तीनें, लागण्या सारखा आहे. रामदासांच्या बखरींवरून व चरित्रांवरून आपणास निश्चित माहीत आहे कीं समर्थांनीं ह्या पृथ्वीवर आपला देह शक १६०३ त ठेविला व तो देह जवळच्या मंडळीनें भस्मसात् केला. असें असून, समर्थ सतनु वैकुंठास गेले, अशी उक्ति पंत काय म्हणून काढतात. त्यांची तनु म्हणजे जड देह तर ह्या पृथ्वीं वर जळून खाक झाला. अर्थात् सतनु या शब्दांचा अर्थ जडदेहासह असा उचित नाहीं. अन्य कांहीं तरी

आहे. हा जो अन्य अर्थ समर्थांच्या संबंधानें करणें उचित आहे तो च तुकारामासंबंधानें केला, म्हणजे जडदेहासह तुकाराम मुक्त झाला किंवा अन्य कशासह मुक्त झाला, ह्याचा निर्णय समाधानकारक लागेल. *

वि. का. राजवाडे

## ६९ विष्णुदासनामाकृत हरिश्चंद्राख्यान व तुळसीआख्यान

१ विष्णुदास नामा याचे अभंग छापले आहेत. त्याची इतर कविता अप्रसिद्ध आहे. पैकीं कऱ्हाडप्रांतीं त्याचें हरिश्चंद्राख्यान व तुळशीआख्यान सांपडलें आहे.

२ तुळशीआख्यानाच्या ८३ ओंव्या किंवा अभंग आहेत. शेवटलें पद्य असें:–

नामा म्हणे विष्णुदास । हे कथा ऐका सावकास ।
जेणे होय महापातकनाश । ब्रह्महत्या दूर होति ॥ ८३ ॥

३ हरिश्चंद्राख्यानाच्या ११०० वर ओंव्या आहेत. सांपडलेला ग्रंथ अपूर्ण आहे. पहिलीं तेरा पानें नाहींत व शेवटलीं किती नाहींत तें नक्की सांगतां येत नाहीं. शेवटलीं सुमारें २५।३० पानें नसावीं. ह्या ग्रंथाचा हा एक विशेष आहे कीं ग्रंथाचे प्रसंग पाडले असून, ओंवीसंख्या मात्र एक पासून ११०० पर्यंत सारखी मोजिली आहे. चोंभा कवीनें आपल्या उपाहरण काव्यांत हि असा च प्रकार केला आहे.

४ दोन्ही ग्रंथ मंडळाच्या संग्रहांत ठेविले आहेत.

वि. का. राजवाडे

## ७० दासकृत गुरुगीता

१ दासकृत गुरुगीतेच्या एकंदर १५१ ओंव्या आहेत. समाप्ति अशीः—

इति श्री बोलणे सार । ऐकता संतुष्टती श्रोते चतुर ।
दास वंदी निरंतर । साधुजन ॥ १५१ ॥

शक १७५६ मार्गशी० व० १४ बाळकृष्णभटात्मजनारायणेन लिखितं ॥

ह्या वरून दिसतें कीं शक १७५६ च्या पूर्वी मूळग्रंथ झाला. प्रारंभीं ग्रंथकार जनार्दनशिष्य एकनाथ याचा उल्लेख करितो. अर्थात् तो शक १५२१ नंतर होऊन गेला हें उघड आहे. भाषेवरून ग्रंथकार शक १६८० नंतर केव्हां तरी

* हे रामदास श्रीसमर्थ रामदासांहून भिन्न असावेत असें कांहींचें म्हणणें आहे. कारण समर्थांचें वर्णन आधीं च येऊन गेलें आहे. –संपादक

होऊन गेलेला असावा. ग्रंथ कऱ्हाडास रा० काशीनाथ वासुदेव देव यांच्या येथें सांपडला.

वि० का० राजवाडे

---

## ७१ कुट्टापरान्तक

अपरान्तांत जे अनेक भाग प्राचीन कालीं होते, त्यांपैकीं एकाला कुट्टापरान्त किंवा कुट्टापरान्तक म्हणत. अपरान्त म्हणजे अपर ऊर्फ पश्चिम समुद्राच्या कांठचा देश; म्हणजे सध्यां ज्याला आपण कोंकण म्हणून म्हणतो ती समुद्र-कांठची लांब पट्टी. पैकीं कुट्ट हा शब्द कुडाळ ह्या शब्दांतील कुड या शब्दाचा पूर्वगामी दिसतो. हें दिसणें जर खरें असेल, तर दक्षिण कोंकणांतील जो कुडाळ देश तो च कुट्ट या शब्दानें प्राचीन किंवा मध्यकालीं प्रथित होता असें म्हणावें लागतें. गोमान्तक ह्या शब्दांत जो अंतक उपशब्द आहे तो अपरान्तक या शब्दांतील अंतक च होय, हें कोणी हि सहज ओळखूं शकेल. म्हणजे अपरान्ताचा कुट्ट प्रमाणें च गोम म्हणून दुसरा एक भाग होता, असें म्हणावें लागतें.

वि. का. राजवाडे

---

## ७२ बाळाजी नारायण नातू यांचें एक पत्र

१ बाळाजीपंत नातूचें अद्यापपर्यंत एक हि पत्र उपलब्ध नाहीं. खाजगी हि नाहीं व राजकारणी हि नाहीं. परवां गोपाळराव देशमुखांचें दप्तर तपाशीत असतां, एक खासगी पत्र बाळाजीपंताचें सांपडलें. तें अस्सल नाहीं, नक्कल आहे. पत्र येणेंप्रमाणें:—

श्री

नकल अस्सल बा।

चिरंजीव राजश्री पांडुरंगपंत भाऊ यासी प्रती बाळाजी नारायण नातु आर्सीवाद उपरि राजश्री हरिपंत भाऊ देशमुख बनछोडी आंब्याची कलमे दुसरे झाडा वरी करणार याज करिता बनछोडीचे झाडा वरील वीतभर डाल्या अकरी एवढ्या मोठ्या या प्रा पाच साहा डाल्या देशमुखा कडील माणसें आले आहेत यास द्याव्या रा। छ १७ जिलकाद तिसा अशरीन लोभ कीजे हे आसिर्वाद

२ या पत्रावरून दिसतें कीं बाळाजीपंताला दरसाल कलमी आंब्याचीं झाडें तयार करण्याचा नाद होता.

वि. का. राजवाडे

## ७३ विक्रम-वीरमंत्र

१ ह्या चाडांत विक्रमाला वीरमंत्र प्राप्त झाल्याची हकीकत ओंवीछंदांत दिली आहे. प्रकरण त्रुटित व अपूर्ण असून आद्यन्त नाहींत. तेव्हां ग्रंथकार कोण व कोठील व केव्हांचा, हें कळण्यास कांहीं च मार्ग नाहीं.

वि. का. राजवाडे

## ७४ शिवाजीनें राज्य किती वर्षे केलें याजसंबंधानें एक जुना उल्लेख

पर्वां वैशाखांत रा. रा. मुंडले यांनीं एक मेस्तक माझ्या स्वाधीन केलें, त्यांत खालील टिपण आहे.

३६ शिवाजी राजे याणी राज्य केले
३० राज्याभिषेका पूर्वी अंमल तीस वर्षे केला
६ राज्याभिषेक जालियावर राज्य केले शक १५९६ आनंद नाम संवत्सरे ज्येष्ठ शुा १३
______
३६

म्हणजे शक १५६६ पासून शिवाजी राज्य करूं लागला अशी जुनी समजूत आहे. शक १५६६ त शिवाजीचें वय १७ होतें. त्या वेळे पासून शिवाजी राजा म्हणून अंमल करूं लागला व त्यास लोक स्वराजा म्हणून छत्रपती या नांवानें गौरवूं व राजरोस लिहूं लागले (तुकाराम व पालीच्या कुळकर्ण्याचा हिशोब पहा). शिवाजीनें आपल्या तेराव्या वर्षी आज्ञापत्रें काढिलेलीं म. इ. सा. च्या १५ व्या खंडांत मीं छापिलीं आहेत. त्या वरून तर असें म्हणतां येतें कीं शिवाजी अकराव्या वर्षा पासून च अंमल करूं लागला.

वि. का. राजवाडे

## ७५ छत्तीस यक्षिणी-एक मराठी ग्रंथ

वरील नांवाचा छोटासा ग्रंथ रा० रा० वासुदेवराव मुंडले यांजकडून मिळाला. प्रत्येक यक्षिणीच्या सिद्धीचा मंत्र संस्कृत मंत्रभाषेंत लिहिला आहे व

त्याचें अनुष्ठान कसें करावें तें मराठींत सांगितलें आहे. मंत्र संस्कृतांत असणार हें उघड आहे. तेव्हां वस्तुतः पहातां हा ग्रंथ मराठी आहे. कारण पद्धति व परिष्कार हीं दोन्ही मराठींत दिलीं आहेत. मंत्रशास्त्रांतील एका भागा वरील मराठी ग्रंथ ह्या नात्यानें या छोट्या ग्रंथाची किंमत करावयाची आहे. ग्रंथांत फक्त २८ यक्षिणी दिल्या आहेत. बाकीच्या सहा यक्षिणी ज्या पानांत होत्या तें शेवटचें पान गहाळ झालें आहे. प्रत फ्रेंच कागदावर नक्कल केलेली आहे. एकंदर पानें सात आहेत.

वि. का. राजवाडे

## ७६ ब्रह्मकृत सामुद्रिक लक्षणें

१ हा ब्रह्म ग्रंथकार केव्हां व कोठें झाला न कळे. ग्रंथाच्या एकंदर ११० ओंव्या आहेत. भाषा कुणबाऊ आहे. अर्थात् लिहिणारा खेडवळ आहे. पोथी सुमार २५० वर्षांची जुनी आहे. तेव्हां अर्थात् ग्रंथकार ३०० वर्षां पलीकडील आहे.

वि. का. राजवाडे

## ७७ कऱ्हाड येथील एक मराठी शिलालेख

१ कऱ्हाड येथील रा. रा. सखारामबापू डुबल यांच्या घराच्या परड्यांत स्नान करण्याकरितां केळीच्या झाडाच्या खालीं एक चौकोनी शिळा पडली होती, तीवर खालील लेख कोरलेला आहेः—

१ ॥ स्वस्ति श्री नृपशालि ॥
२ ॥ वाहन शके १५९४ परि ॥
३ ॥ धावी फालगुणशुद्ध सप्तमी ॥
४ ॥ वेंकाजी पेलदेव रामरामी ॥
५ ॥ कुलकरणी कसबे करहाट ॥
६ ॥ कर यानी देवालय बांध ॥
७ ॥ ले कन्यागता मध्ये ॥

ओळी ७ आहेत. कऱ्हाड येथील कुळकरण्यांचें आडनांव रामरामे. रामरामे यांनीं शक १५९४ त कन्यागतांत संगमावर कृष्णाबाईचें देवालय बांधिलें.

वि. का. राजवाडे

## ७८ धावडशी येथील एक शिलालेख

बाजीराव व चिमणाजी आप्पा यांचे 'महापुरुष' ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर हे आपले प्रतिवार्षिक नियमाप्रमाणें वीरमाडें व मर्ढे यांचे शिवेवर कृष्णातटाकीं समाधीस गेले असतां, शके १६६७ श्रावण शुद्ध नवमी, गुरुवार, ता. २५ जुलै इ. स. १७४५ रोजीं ब्रह्मीभूत झाले. नंतर शाहुमहाराजांनीं स्वामींचें कलेवर मोठ्या समारंभानें धावडशीस आणून, स्वामींच्या स्नानसंध्येच्या जागेवर गर्ता तयार करून तेथें च त्या कलेवराचे अंत्यउपचार केले व त्यांच्या ह्या समाधिस्थानावर प्रशस्त देवालय व सभामंडप बांधिला. धावडशी येथील भार्गवरामाच्या ह्या देवालयाच्या महाद्वाराच्या शिरोभागीं शंकराजी नाईक गवंडी यानें खालील लेख कोरून ठेविला आहेः—

॥ श्री भार्गवाचा अवतार साचा ॥ ब्रह्मेंद्रस्वामी बहुतां दीसाचा ॥ अवता ॥
॥ र त्याचा समाप्त जाला ॥ संवत्सरा जाण हि क्रोधनाला ॥१॥ श्रावण शुक्ल नव ॥
॥ मी भृगुवार होता ॥ अरुणोदई प्राणप्रायाण होता ॥ कृष्णातिरी मुख्य समाधि स्था ॥
॥ नि ॥ वैकुंठवास मुनिला बहु लोक मानी ॥ २ प्रारंभ कामाशी तयेची कालीं ॥
वर्षे स ॥

॥ मातीस हि शास्त्र जालीं ॥ शाहु नृपाल भजतो निजपूर्णभावें ॥ सर्वत्र लोक ॥
॥ भजती बहु पूर्ण भावें ॥ ३ ॥ तयाचा जगंनाथभक्त प्रशील ॥ समाधि स्थल
बांधिलें हें सुनील ॥

॥ महा बुध्दिनें योजिला जो सुशिल्पी ॥ तया शंकरे बांधिलें आत्मकल्पीं ॥ शके
१६७२ प्रमोद ॥

या शिलालेखाच्या एकंदर ७ ओळी असून ते ४ चार श्लोक आहेत. शिलालेख तत्कालीन बालबोधींत आहे. शिलालेखाची लांबी २ फुट २ इंच, व रुंदी ७ इंच आहे. व्याकरण वगैरेकडे फारसें लक्ष दिलेलें नाहीं.

हा शिलालेख रा. रा. ( आतां रा. ब. ) द. ब. पारसनीस यांनीं आपल्या ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांचे चरित्रांत पृ. १२८।१२९ वर दिलेला आहे. परंतु तो शुद्ध स्वरूपांत छापिलेला नाहीं. कित्येक ठिकाणीं तो त्यांनीं आपल्या सोयी-प्रमाणें फिरविला आहे व एके ठिकाणीं तर ' वर्षे समाप्तीस हि शास्त्र जालीं' ह्या ऐवजीं वर्षें समाप्ती सहिशास्त्र जालीं असा अपपाठ घुसडून दिलेला आहे. ' समा-प्तीला देखील सहा वर्षें होऊन गेलीं ' असा लेख खोदणाराचा भावार्थ उघड उघड दिसतो. अर्थात् ह्या पदाचें ' स्वारस्य ' रावबहादुरांच्या लक्षांत न आल्यामुळें,

त्यांनीं कांहीं तरी पाठ ठोकून दिलेला आहे. एवंच, हा शिलालेख विश्वास्य रीतीनें छापिलेला नसून. त्यास आधुनिक स्वरूप दिलेलें आहे, व तसें तें देतांना हि गफलत केलेली आहे ! शिलालेख अस्सल बरहुकूम छापणें च शास्त्रशुद्ध होय. अस्तु.

हा शिलालेख आजच्या नवीन शास्त्रीय स्वरूपांत इतिहासभक्तांपुढें मांडीत आहे. ह्या शिलालेखावरून च असा निष्कर्ष निघतो कीं, महेंद्रस्वामी ब्रह्मीभूत होतांक्षणीं च देवालयाचे कामास सुरवात होऊन, शके १६७२ मध्यें देवालयाचें काम पूर्ण झालें; व नंतर ६ वर्षांनीं म्ह. शके १६७८ चे सुमारास हा शिलालेख कोरला गेला. देवालयाचें काम संपूर्ण झाल्यानंतर शके १६८० मध्यें शंकराजी गवंडी यास ३४५ रुपयांचें सोन्याचें कडें व ७० रुपयांचा रुप्याचा गज बक्षीस देण्यांत आला, व इतर पाथरवट गवंडी वगैरे लोकांस १४५५॥ रुपयांचीं इनामें देण्यांत आलीं, व ह्या देवालयास एकंदर रु. ११९३५३०~॥। खर्च झाला वगैरे माहिती देवालयाच्या हिशेबांत दाखल असलेली व कै. नारोराम शेखदार यांनीं दिलेली रा. ब. पारसनीस यानीं आपल्या वरील ग्रंथाच्या पृ. १२८ वर दिलेली आहे. सदर माहितीचा प्रस्तुत शिलालेखाशीं मेळ बसतो. शिलालेखादि ऐतिहासिक साधनें आपले मूळ स्वरूपांत प्रसिद्ध करणें च जरूर आहे, हें संशोधकांच्या नजरेस आल्यास पुष्कळ काम होईल.

पां. न. पटवर्धन

## ७९ शंकराचार्यकृत बोधाचें मराठी भाषान्तर

१ याचीं कांहीं त्रुटित आधलींमधलीं पत्रें सांपडलीं आहेत. समाप्तीचें किंवा प्रारंभीचें पत्र नसल्यामुळें भाषान्तरकाराचें नांव व काळ व स्थळ कळण्यास साधन नाहीं. हीं पत्रें मंडळाच्या संग्रहांत एवढ्या साठीं ठेवावयाचीं कीं शंकराचार्यांच्या ह्या छोट्या कृतीचें मराठींत भाषांतर झालें होतें, याची साक्ष असावी.

वि. का. राजवाडे

## ८० मराठींत ऋग्वेद-एकपदाद्विपदामंत्रविभाग

१ प्रायः वैदिकांच्या सर्व पोथ्या व ग्रंथ संस्कृतांत असतात. परंतु प्रस्तुत चिमकुला ग्रंथ कित्येक जे थोडेसे अपवादक ग्रंथ मराठींत वैदिकविद्याविषयींचे आहेत त्यांत मोडतो. ह्यांतील प्रथम मराठी वाक्य असें:—

" प्रमन्महेचे अठ वर्गापासून पश्वानतायुं ही
अर्धरी धरून चवदावर्गसमाप्ती पर्यंत एकएक
अर्धरींचे मंत्र ॥ द्विपदा संज्ञा बाकी अष्टकाचे दोन
अर्धरींचे मंत्र ॥ इति प्रथमाष्टकः ॥ "

हीं ग्रंथ मूळ कोणीं रचिला तें कळण्यास मार्ग नाहीं. बहुशः वैदिक लोकांत हा ग्रंथ परंपरेनें प्रचलित झाला असावा. ग्रंथ कऱ्हाडास सांपडला.

वि. का. राजवाडे

## ८१ पालीची कारिका

१ हिचा कर्ता कोण तें कळत नाहीं. बहुशः सहदेव भाडळी पासून म्हणजे शक ११०० पासून हा ग्रंथ परंपरेनें आतां पर्यंत चालत आलेला आहे. ह्या कारिकेचीं लहान मोठीं निरानिराळीं पाठान्तरें आहेत. पैकीं प्रस्तुत प्रतींतल्याइतकी परिपूर्ण व विस्तृत कारिका माझ्या पाहण्यांत आजपर्यंत आली नाहीं. हींत स्त्रीपुरुषभेदपरत्वें दिवस, नक्षत्र, शरीरभाग इत्यादि अधिकरणें करून पालीचें शुभाशुभ सांगितलें आहे. कित्येक ठिकाणीं भाषा जुनाट आहे व कित्येक ठिकाणीं नवी आहे. ग्रंथ कऱ्हाडास का. वा. देव यांजकडे सांपडला.

वि. का. राजवाडे.

## ८२ दिनकररावकृत शिवरात्रिकथा

१ दिनकरराव कवि केव्हां झाला न कळे. बहुशः शक १६८० नंतरचा आहे. ह्या शिवरात्रिकथेंत साक्या व पदें आहेत. एकंदर पद्य-संख्या १९ आहे. पदें व साक्या अनेकचरणी आहेत. ग्रंथ कऱ्हाडास रा. का. वा. देव यांचे एथें सांपडला. काव्य रसाळ आहे. कवि बहुशः ब्राह्मणेतर असून शाहीरवर्गांपैकीं असावा. दिनकरराव आनंदतनया नंतर झालेला आहे.

वि. का. राजवाडे

## ८३ सिद्धेश्वरमहाराजांच्या शिष्यमंडळीचीं भजनें वगैरे

१ अव्वल इंग्रजींत सिद्धेश्वरमहाराज होऊन गेले. पुण्यांत बावामहाराज होते त्यांचे हे पूर्वज. हे करवीरास व नरसिंगपुरास रहात असत. यांचे शिष्य ( १ ) परशुराम, ( २ ) भगवंत, ( ३ ) आपा व ( ४ ) त्र्यंबकसुत, यांचीं कवनें मालखेडास सांपडलीं. तीं काव्यरसानें यद्यपि ओथंबलेलीं नसलीं, तरी भक्तिरसानें थबथबलेलीं आहेत. अंबाबाई व भोळाशंकर यां वर बहुतेक गीतें आहेत. आठव-ड्याच्या प्रत्येक दिवसाचीं निरनिराळीं भजनें असत. उठल्या पासून निजे पर्यंत भजनाचे पाठ चालत. त्यांचा संग्रह सोबत पाठविलेल्या टांचणांत आहे. त्या वरून भजनें भजनीमंडळी कशीं करीत व सध्यां हि कित्येक स्थलीं कशीं करतात, तें समजून येईल. नुसते छापील पुस्तकांतील अभंग, पदें वगैरे पाहून भजनक्रमाची व्यवस्था ध्यानांत येणें दुरापास्त आहे. भजनक्रम जाणावयास प्रस्तुत टिपणां-सारखीं टिपणें अवलोकनांत आलीं पाहिजेत. मंडळाच्या संग्रहांत ठेवण्या करितां हीं टिपणें पाठविलीं आहेत.

वि. का. राजवाडे

## ८४ अनामककविकृत द्रौपदीस्वयंवर

हें प्रकरण कऱ्हाड येथें रा. रा. रंगो रघुनाथ डबलीकर यांच्या संग्रहास होतें. पाठपोट लिहिलेले पुर्नकाली बंद चार आहेत. काव्य बऱ्या पैकीं आहे, इतकें च नव्हे तर, चांगल्या पैकीं आहे. श्लोक, पदें, साक्या, सवेया, दिंड्या, वगैरे रचना आहे. कवि प्रायः चित्पावन दिसतो. ऐंकारान्त रुपें तो बहुतेक सर्वत्र अंकारान्त लिहितो. उदाहरणार्थ खालील पद्य पहा.

क्षीरसिंधू लागला पट्कासं ।
सींव्ह माजी मेखला विकासं ॥
स्वर्णवल्ली देदीप्यमान भासं ।
रूपरेखा देखोनि सभा तोषं ॥ २ ॥

येथें कासे, विकासे भासे व तोषे, अशीं पदें लिहावयास हवीं आहेत. निदान एवढें तरी खरें कीं लेखक चित्पावन आहे. मग ग्रंथकार देशस्थ असो वा कोंकणस्थ असो. कवि आनंदतनयाचें अनुकरण श्लोकरचनेंत करतो, व भाषा सवाई माधव-रावाच्या कालांतील आहे, ह्या दोन बाबीं वरून असें म्हणतां येतें कीं कवि दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीच्या सुमारास आगेंमागें होऊन गेला असावा. प्रायः

पदांच्या शेवटीं किंवा ग्रंथसमाप्तीच्या वेळीं कवी आपल्या नांवाचा उल्लेख करतांना बहुतेक मराठी ग्रंथांत आढळनात. पण, प्रस्तुत प्रकरण ह्या सामान्य नियमाला अपवाद आहे. ह्या प्रकरणाची समाप्ति अशी:—

श्रीरंगडुरंग गरुराज जयास पाळी।
बाधे कसा विविध क्लेश तया कपाळीं ॥
त्याचे कृपें करुनि हे वदली कथा रे।
या श्रोत्र संत श्रवणार्थ चि सत्पथा रे ॥ ४३ ॥

॥ इति श्री द्रौपदीस्वयंवरं संपूर्ण ॥

समाप्ती नंतर कवीनें पांच आर्या मोरोपंताच्या धर्तीवर रचिल्या आहेत. त्या वरून तो मोरोपंता नंतर झाला, असें निःसंशय म्हणतां येतें.

वि. का. राजवाडे

## ८५ निवृत्ति अवधूतकृत दशनामविधान

१ तीर्थ, आश्रम, वन, अरण्य, गिरि, सागर, सरस्वती, भारती, पुरी व पर्वत हे जे दाहा गोसावी आहेत त्यांचा निर्देश या ग्रंथांत आहे. निवृत्ति अवधूत केव्हां व कोठें होऊन गेला, तें सांगण्यास सध्यां मार्ग नाहीं. पोथींत ओंव्या एकंदर ८२ असून समाप्ति अशी आहे:—

या वरि गुरुनें शिष्य आलिंगिला।
शिष्य आनंदे वोसंडला
ते ज्ञान आनुवादला ॥
निवृत्ति अवधूत ॥ ८२ ॥

ग्रंथ कऱ्हाडास मिळाला.

वि. का. राजवाडे

## ८६ मृत्युंजयकृत अनुभवसार

१ मृत्युंजय साधुकवि एकनाथाच्या पूर्वीचा असावा, असें भाषे वरून व ओंव्यांच्या रचने वरून वाटतें. प्रस्तुत पोथींत अनुभवसाराच्या फक्त ४० ओंव्या आहेत. परंतु समाप्तीस ४२ ओंव्यांचा निर्देश आहे. समाप्ति अशी:—

या वेताळीस । वोविया अनुभवसार ।
++++++ । बोलिला मृत्युंजयो ॥ ४० ॥

॥ इति श्री आनुभवसार मृत्युंजयकृत समाप्त ॥

ग्रंथ कऱ्हाडास रा. का. वा. देव यांच्या एथं सांपडला.

वि. का. राजवाडे

---

## ८७ नीलग्रीव व शिवदास ह्यांनीं रचिलेली वेताळपंचविशी

हा बाडवजा ग्रंथ कऱ्हाड येथें वाटेगांवकर शास्त्री यांच्यापोथ्यांत सांपडला. पहिल्या दोन कथा नीलग्रीवानें लिहिल्या व बाकीच्या तेवीस शिवदासानें तडीस नेल्या. नीलग्रीव हा शिवदासाचा बहुशः गुरु असावा पहिल्या कथेच्या दहा-पासून तीस पर्यंतच्या ओंव्या गहाळ झाल्या आहेत. बाकी ग्रंथ संपूर्ण आहे. ग्रंथारंभीं गणपतीचें स्तवन करून, ग्रंथसमाप्ति येणेंप्रमाणें केली आहेः—

" येथे प्रकार संपला । वीक्रामाच्या कथाला ।
येथुनि शीवदासाचीया बोला । समाप्ति की ॥ ५४ ॥
पुढील दोनी प्रकार । सीवक्षेत्रीयाचा वीचार ।
नीलग्रीवे स्वता साक्षात्कार । केला असे प्रकार समाप्तिचा ॥ ५५ ॥
वोव्या संख्या १६२७ ॥ कथा २५ ॥
प्रकार ॥ १३ ॥ शुभं भवतु कथा वेताळपंचवीसि ॥
या ग्रंथा मध्ये ॥ सीव ॥ सोदा याचे प्रसंग ॥

२ वजा ॥ वरकड नीलग्रीवाचे कर्तव्य स्तु नवीरहित ग्रंथ लीहिला ॥ ॥ ॥
मुक्काम जंजीरे रत्नागीरी ॥ शके १६८१ प्रमाथी नाम सवछरे कार्तिक शुद्ध सप्तमि मंदवारे तदींनी बाबराव भडभडे लीखीतं समाप्त ॥ छ ॥ "

समाप्ती वरून दिसतें कीं नीलग्रीव व शिवदास हे दोघे ग्रंथकार शक १६८१ च्या पूर्वी केव्हां तरी होऊन गेले. भाषे वरून दिसतें कीं हा ग्रंथ मुळीं पांच चारशें वर्षांचा जुना असावा कारण ह्या सबंध ग्रंथांत फारसी शब्द एक हि नाहीं. मूळ ग्रथाची भाषा ह्या नकलेंत आधुनिक केलेली आहे. ग्रंथ १६८१ त रत्नागिरींस लिहिला गेला. तेथून बहुशः अनेक ठिकाणीं प्रवास करून तो शेवटीं कऱ्हाडास येऊन पडला.

वि. का. राजवाडे

---

## ८८ सहजानंद

' सहज पूर्ण निजरंगीं रंगला ' ह्या पद्यार्धांतील सहजानंदांच्या ग्रंथांसंबंधानें विवेचन करून त्यांनीं ज्ञानप्रदीप अथवा ज्ञानदीपिका व योगवासिष्ठ असे दोन ग्रंथ रचल्याचें रा· गो· का· चांदोरकर आपल्या ' सहजानंदा'वरील निबंधांत लिहितात. परंतु त्यांस उपलब्ध झालेली योगवासिष्ठाची अपूर्ण प्रत—कारण त्यांस फक्त दशम प्रकरण च काय ते मिळालें असून, तें हि संपूर्ण नाहीं—-माधवदासविरचित योगवासिष्ठाच्या प्रकाशित व अप्रकाशित प्रतींशीं तंतोतंत जुळते; अर्थात् त्यांस मिळालेली ही प्रत म्हणजे योगवासिष्ठावरील माधवदासांनीं केलेली मराठी टीका होय. दशम प्रकरणांत पहिल्या ओंवींत ' ब्रम्हानंदा'स केलेलें नमन सहजानंदानें आपल्या ब्रह्मानंद नांवाच्या गुरूस केलें आहे असा अर्थ केला गेल्यामुळें, व हें दशम प्रकरण संपूर्ण न मिळाल्यामुळें, रा. चांदोरकर ह्यांनीं हा ग्रंथ सहजानंदांचा आहे असें नजरचुकीनें ठरविलें. वास्तविक स्थिति काय आहे, याचा उलगडा असा.

रा· चांदोरकर यांस मिळालेल्या ग्रंथाचा कर्ता माधवदास होय हें वर आलें च आहे ह्या विदर्भदेशीय कवीस पैठणच्या नारायणस्वामी नांवाच्या सिद्ध पुरुषाचा अनुग्रह होऊंन, त्यानें हा ग्रंथ शके १५१४ आश्विन कृष्ण अष्टमीसह नवमी बुधवारीं पंचग्रामीं ( वऱ्हाडांतील पंचगव्हाण या गांवीं ) पुरा केला आहे. ' उत्कट साधुनी शीळा ' व 'कडकडीला स्तंभ गडगडिलें गगन । अवनी होत आहे कंपायमान ' ह्या दोन्ही सुंदर आरत्यांचें कर्तृत्व ह्या च नारायणांकित माधवदासाकडे आहे सहजानंदांनीं योगवासिष्ट रचिल्याचें ऐकिवांत नाहीं अथवा त्यांची एकादी टीका आजवर उपलब्ध झालेली नाहीं. याउपर भविष्यत्कालाच्या पोटांत काय आहे तें कोणीं सांगावें !

पां. न. पटवर्धन

## ८९ संगम माहुलीची वसाहत.

क्षेत्र माहुली अफक्के प्रभृति ६१ ब्राह्मणांकडे अग्रहार असून, त्या गांवची वसाहत इदलशाहींत झाली हें मीं मंडळापुढें वाचलेल्या एका निबंधांत मागें च दाखविलें आहे. संगम माहुलीची वसाहत श्री. शाहुमहाराज ह्यांचे आज्ञेवरून प्रतिनिधींनीं शके १६४१ म्ह. इ. स. १७१९ त केलेली आहे. संगम माहुलीस च परशुरामक्षेत्र म्हणतात. शके १६४१ त सदर गांवची वसाहत झाली हें सोयतच्या

कागदांवरून उघड होतें. स्थापना करतेवेळीं ४० ब्राह्मण असून, त्या ४० ब्राह्मणां-पैकीं आनंतभट चिन आमणभट गलंडे ह्यांस अग्रहाराचें आधिपत्य दिलेलें आहे. वसाहतीस मौजे सेड पैकीं ०॥० चावर जमीन नेमून दिली. हे ४० ब्राह्मण कोणते हें पत्रांक २१३ वरून समजेल. सदरहु गांव पंत प्रतिनिधींच्या मुलखांत आहे.

पां. न. पटवर्धन

---

खालील कागद माहुली येथील गलंडे यांचे वंशजाकडून मिळाले.

## श्री आई आदीपुरुष

लेखांक १

वेदशास्त्रसंपंन राजश्री आनंतभट चिन आमण भट गलंडे वास्तव्य क्षेत्र परशुराम संगम कृष्णावेणी स्वामी गोसावी

सेवक श्रीनिवास परशुराम प्रतिनिधी नमस्कार विनंती उपरी सुरु सन आशरीन मया व आलफ माहाराज राजश्री स्वामींनी मौंजे सेड तरफ वंदन येथील इनाम जमीन चावर ०॥० निमे इनाम आम्हास आग्राहार करावयाकरिता दिल्ही त्यास आम्ही आपले तरफेने आग्राहाराचे आधिपत्य तुमचे स्वाधीन करून सदरहू जमीन तुमचे दुमाला केली आसे तरी तुम्ही आपले पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें अनभाऊन आग्राहाराची वस्ती करून सुखरूप राहणे आमचे वंशपरंपरेने सदरहू प्रमाणे चालविले जाईल चंद्र ५ रजब हे विनंति

लेखांक २




श्री




स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४१ [illegible] आधिक [illegible] १४ क्षत्रीय कुलावतंस श्रीराजाशाहू [illegible] वेदशास्त्र [illegible] ब्राह्मण वगैरे वास्तव्य श्री परशाराम क्षेत्र [illegible]

वेदन यासी दिल्हे इनामपत्र ऐसीजे तुम्ही समस्त ब्राह्मण वगैरे क्षेत्री वास करून स्नानसंध्यादिक शटकर्मे व तपश्चर्या आचरून स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याण चिंतून आहां तुमचे चालवणे आवशक जाणून स्वामी तुम्हावरी कृपालु होऊन मौजे पाटखळ ता। वेदन प्र त सातारा येथें सालिसा पड पैकी अवल दुमसिला तिन प्रतीची जमीन कुलबाव कुलकानु देखील स्वराज्य व मोगलाई आमल एकूण पटी व पेस्तर पटी खेरीज हकदार इनाम जमीन दिल्ही

किता इनाम जमीन

।• मुदगलभट बिन मल्हारभट गोत्र शाकल रुग्वेदाध्याई

।।• भिकभट बिन तुळजंभट अग्निहोत्री कासेगावकर उपनाम गलंडे गोत्र भारद्वाज आपस्तंब

८२५ अनंतभट बिन आमणभट उपनाव गलडे कासेगावकर गोत्र भारद्वाज शाखा आपस्तंब

८२० नारायणभट बिन आमणभट उपनाव गलडे कासेगावकर गोत्र भारद्वाज शाखा आपस्तंब

८१५ सिवभट बिन महादेवभट गोडसिडीकर गोत्र काश्यप्य

८१५ अनंतभट बिन कृष्णभटजी मदे शिराळकर गोत्र हारित

८२० विश्वनाथभट बिन दत्तात्रेयभट उपनाव गलांडे गोत्र भारद्वाज शाखा आपस्तंब

१५ परशरामभट बिन वेदंभट जोसी सेडकर गोत्र कौसिक शाखा पिपलायेन आथर्वणी

८१२ माणभट बिन त्रिंबकभट जोसी सेडकर गोत्र कौसिक शाखा पिपलायेना आथर्वणी

८१५ गोपाळभट बिन नारायणभट जोसी सेडकर गोत्र कौसिक

किता इनाम जमीन

८१५ रामभट बिन संभुभट माहादेवकर गोत्र वसिष्ठ आथर्वणी

८१५ तुकभट बिन आनंतभट जोसी सेडकर गोत्र कौशिक आथर्वणी

८२० चिंतामणीभट बिन नारायणभट फडके आत्रीगोत्र

८१५ यादवभट बिन बाळंभट गोत्र कौसिक आथर्वणी यासी

८२० भगवंतभट बिन आनंतभट पराडकर गोत्र कश्येप

८१५ कृष्णंभट बिन आपईभट गोत्र वसिष्ठ यासी इनाम

८१५ भटभट बिन विनायकभट आफळे गोत्र भारद्वाज

८१२ रघुनाथभट बिन नरसिव्हभट उडालकर गोत्र विश्वामित्र

८२० मधवाच्यार्य बिन नरसिव्हभट गोत्र गारग्य यासी

।।• कासिनाथ तुळजानंद सिवनामे गोत्र वसिष्ठ यास

८१० आनंदभट बिन गोरभट गोत्र भारद्वाज यासी

८१५ जि भट बिन नरसिंगभट ताटे काश्यप गोत्री यासी

८२० मल्हारभट आनंतभट गोत्र कौशिक यासी

०१५ विश्वेश्वरभट बिन नारायणभट चिपलोणकर गोत्र आत्री

०१० वासुदेवभट बिन भटंभट गोवलकर

०२० बाळंभट बिन हरभट गोडबोले गोत्र काशप यासी इनाम

०१५ सखया गोसावी यासी इनाम

०१५ त्रिंबकभट बिन वामनभट काशप गोत्र

०२० बल्लाळदेव बिन गणेशदेव गोत्र भारद्वाज यासी

०१५ केशवभट बिन अनंतभट थिटे काश्यप गोत्री यासी

०१० गंगाधरभट बिन मोरेश्वरभट प्रभुणे गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन

---

२॥।५

०२० कृष्णभट बिन सिवभट आफले आमहोत्री गोत्र भारद्वाज

०२० तुळसभट बिन मादभट पाडकर गोत्र काश्यप यासी इनाम जमीन

०५ चया जगमीण ईस

०५ देवपुरी नंगा गोसावी यासी

०१५ रामभट बिन हरभट गोत्र कौसिक यासी इनाम

०१५ जनार्दन गोसावी आनंडानंद गोडे गोत्र गार्ग्य

०१० नारायणभट बिन गोविंदभट राजापूरकर गोत्र भारद्वाज

०१० रामभट बिन गोविंदभट संभ गोत्र आत्री यासी इनाम

०१० केशवभट बिन भीडभट भिमुले वसिष्ठ गोत्र यासी

---

२॥।=

एणेप्रो जमीन साडे पाच चाऊर सात बिघे तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम करून देऊन नावनिसीवार इमामपत्रे दिल्ही आहेत तरी सदरहू प्रो जमिनी चतुसीमापूर्वक आपले करून घेऊन घेऊन इनाम आनभऊन सुखरूप राहाणे लेखनांकार

मर्या
देयरा
जते

ता। १२ राल सुरु सलास आसरीन

लेखांक ३

श्री

०श्री
राजा शाहु नर
पति हर्ष नीधान
बाजीराव बल्ला
ल प्रधान

० श्री
श्री आई आदिपुरु
ष श्री राजा शाहुछत्रप
ति स्वामि कृपा निधित
स्य श्रीनिवास परश
राम प्रतिनिधि

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४९ शुभकृत संवत्छरे आधिक श्रावण बहुल तृतीया मृगुवासरे क्षेत्रीये कुळावतंस श्रीराजाशाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी प्रा सातारा यासी आज्ञा केली ऐसा जे परमाम क्षेत्र कृष्णावेणी संगम वट संनिध मौजे खेड ता वंदन येथे ब्राम्हण समुदाये राहिले स्नान संध्यादिक शटकर्मे आचरोन स्वामीस स्वामींचे राज्यास कल्याण चिंतितात त्यांचा योगक्षेम चालिला पाहिजे याकरिता स्वामी कृपालु होऊन ब्राह्मणाचे वगैरे मौजे पाटखळ ता वंदन प्रा मजकूर येथे नूतन इनाम जमीन कुलबाव कुलकानू देखील हली पटी पेस्तर पटी स्वराज्य व मोगलाई आमल एकूण दुलर्फा खेरीज हकदार बिघे

०२५ आनंतभट बिन आमणभट गलंडे गोत्र भारद्वाज शाखा तेतीरिये आयारी
०१५ विरेश्वरभट बिन नारायणभट चिपळोणकर गोत्र आत्री सूत्र आश्वलायन
०२० चिंतामणभट बिा नारायणभट गोत्र आत्री उपनाव फडके
०१२ रघुनाथभट बिन नरसिंहभट गोत्र विश्वामित्र उडालेकर
०१० भिकंभट बिन तुळजमभट गोत्र भारद्वाज उपनाम गलंडे कासेगावकर
०१५ परशरामभट बिन देवभट गोत्र कौसिक आथर्वणवेदी
०२० बाळंभट बिन हरभट गोत्र कौसिक उपनाम गोडबरेले
०१५ रामभट बिन हरभट गोत्र कौसिक
०१० कासिनाथभट बिन तुळजंभट सिराळे गोत्र वसिष्ट
०१० माणकंभट बिन त्रिबकभट गोत्र कौसिक आथर्वणनेदी
०१५ यादोभट बिन बालंभट गोत्र कौसिक
०१५ तुकंभट बिन अनंतभट गोत्र कौसिक वेद आथर्वण
०१५ गोपाळभट बिन नारायणभट गोत्र कौसिक वेद आथर्वण
०१५ रामभट बिन शंभूभट गोत्र श्रावेिष्ट उपनाम ढवले माहादेवकर
०२० कृष्णभट बिन सिवभट आफळे गोत्र भारद्वाज आग्निहोत्री
०१५ कृष्णभट आबादेभट गोत्र वसिष्ट वेद रुगवेद वाळिंबे
०१५ भटंभट बिन विनायकभट उपनाम आफळे गोत्र भारद्वाज
०१५ केशवभट बिन अनंतभट उपनाम थिटे गोत्र काश्यव
०१० आपदेभट बिम मेरुभट गोत्र भारद्वाज आश्वलायन शाखा
०२० नारायणभट बिन आमणभट गोत्र भारद्वाज उपनाम गलंडे कासेगावकर
०२० विश्वनाथभट बिन दत्तंभट गोत्र भारद्वाज उपनाव गलंडे
०१५ अनंतभट कृष्णभट गोत्र हरीत उपनाव सिरालेकर
०२० भगवंतभट बिन अनतभट परडेकर गोत्र काश्यप
०२० कुशंभट महादेवभट परडेकर गोत्र काश्यप

## १० परशुराम त्र्यंबक प्रतिनिधी यांचें समाधिस्थान

संगम माहुली ऊर्फ परशुरामक्षेत्र ह्या गांवची वसाहत श्री. छत्रपती शाहू महाराज ह्यांचे आज्ञेवरून श्रीनिवास परशुराम प्रतिनिधी यांनीं शके १६७१ त केली. ह्या गांवीं प्रतिनिधी घराण्याचे मूळ संपादक परशुराम त्र्यंबक ह्यांचें वृंदावन मौजे खेड येथील जमिनींमध्यें वटवृक्षाखालीं आहे, हें सोबतच्या दोन्ही कागदांवरून उघड होतें. पंत प्रतिनिधी घराण्याचे संपादक परशुराम त्र्यंबक, व त्यांची पत्नी, माहुली गांवची वसाहत करणार श्रीनिवासराव व त्यां चें कुटुंब, व तसें च थोटे पंत व त्यांची बायको ह्या सर्वांच्या समाधि संगम माहुलीस आहेत. कचेश्वराची समाधि हि येथें च आहे.

पां. न. पटवर्धन

---

लेखांक १ शके १६७१

### श्री आई आदिपुरुष

वेदशास्त्र संपंन राजश्री आनंतभट बिन आमणभट गलंडे वास्तव्य क्षेत्र परशराम संगम कृष्णावेणी गोसावी यांस

सेवक श्रीनिवास परचराम प्रतिनिधी नमस्कार विनंति उपरी सुरु सन अशरीन मया व अलफ तीा स्वरूप राजश्री पंत कैलासवासी यांच्या वृंदावनाचे व आलीकडील क्षेत्रीचे उपाध्यपण व आष्टाधिकार क्षेत्र मजकूरचे तह्मास वृती करून दिली आहे तरी क्षत्री कार्य प्रयोजन नित्य नैमितिक होईल त्याचा क्षेत्र उपाध्येपणाचा व वृंदावनाच्या उपाध्येपणाचा मान पान तुम्हास पावेल तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें आनभऊन सुखरूप राहणे तुम्हास सालिना इनामाखेरीज वर्षासन रुपये ७५ पावणासे व उलफा आसामी दोन करार करून दिल्हा आसे सदरहूप्रमाणे साल दरसाल पावेल जाणिजे चंद्र ५ रज्जब हे विनंति

लेखांक २ श्री

श्री
श्री आई आदि पुरु
ष श्रीराजाशाहुछत्रप
ति स्वामि कृपानिधि त
स्य श्रीनिवास परशु
राम प्रतिनिधि

हासाचें महत्व विशेष आहे. कारण कीं, ह्या ग्रंथाचा कर्ता महंमद साकी मुस्ताइद्खान हा औरंगजेबाच्या दरबारीं ४० वर्षांवर होता, व दक्षिणेंतील हालचालींचें ह्यास विशेष ज्ञान होतें. ह्यानें आपला इतिहास औरंजेबाचे मरणानंतर अवघ्या तीन वर्षांनीं लिहिला, व औरंजेबानें आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या दशकानंतर आपल्या संबंधाचा इतिहास लिहिण्याची मनाई केली असतां हि ह्यानें तो तारीखवार असा दरबारी कागदपत्रांवरून लिहून ठेविला ह्या हि गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत इलियटनें मासिर-इ-अलमगिरींतील सदर प्रसंगाचा उतारा दिला नाहीं. मी तो प्रो० शेक अबदुल कादर सरफराज व रा० गोखले ह्या उभयतांच्या मदतीनें देत आहें. उतारा खालील प्रमाणेः—

" शेक निझाम हैद्राबादी ह्यास च मुकरबखान असा किताब असून, तो शिपाईगिरींत तरबेज होता. ह्या च गुणाचे योगानें, २१००० स्वारांसहित तो आपण स्वतः आपलीं मुलें व आप्त मिळून पंचवीस हजारींचे हुद्यावर चढला होता. मराठ्यांच्या ताब्यांतील पन्हाळा किल्ला सर करण्यासाठीं त्याची विजापुराहून नेमणूक झालेली होती. त्यानें संभाजीची खबर आणणेसाठीं मोठ्या दूरदर्शीपणानें कित्येक जासूद रवाना केले. आपल्या आप्तसंबंधीं वैराग्यांशीं झगडण्याकरितां खेळण्यापर्यंत येऊन त्यांशीं संधी करून, व तेथील किल्ल्यांतील संग्रहाचा पूर्ण बंदोबस्त करून, संभाजी आतां संगमेश्वर येथें आपल्या दुर्व्यसनी दिवाणानें उठविलेल्या टोलेजंग इमारतींत ऐषआराम करीत आहे, अशी ह्या जासुदांनीं खबर आणिली. संगमेश्वर हें ठिकाण सोलापुराहून ( ' कोल्हापुराहून ' असें पाहिजे ) ४५ कुर्वा म्ह० अदमासें ५६ मैल असून, दरम्यानचा प्रदेश बिकट होता. आपल्या अन्नदात्यासंबंधींच्या कृतज्ञतेच्या भरांत आपल्या प्राणास कःपदार्थ समजून व आपल्या आयुष्यास शेवटचा निरोप देऊन, जिवावर उदार झालेले आपले कित्येक सेवक घेऊन तो शूर खान तडक निघाला. मोंगलाची फौज येत आहे अशी खबर संभाजीस त्याचे जासुदांनीं दिली, तथापि मूर्खत्वाच्या व गर्वाच्या सुरेंत मग्न होऊन, ' त्यांत काय आहे ' असें समजून संभाजीनें ह्याकडे दुर्लक्ष केलें, इतकें च नव्हे, तर ' ह्या ठिकाणीं मोंगल कसचा येतो ' असें म्हणून त्यानें त्या जासुदांची निर्भर्त्सना केली. खान अतिशय मेहनत सोसून विद्युद्वेगानें त्या ठिकाणीं आला. संभाजीनें हि ४।५ हजार दक्षिणी भालाईतांच्या सहाय्यानें खानावर हल्ला चढविला. ह्या झटापटींत कलुशास तीर लागला. थोडीशी चकमक झडल्यानंतर, संभाजीच्या लोकांनीं पलायन केलें. आपणांस कोणी पहाणार नाहीं अशा भावनेनें इकडे संभाजी कलुशाचे हवेलींत शिरला. ही खबर खानास मिळतां च, पळालेल्या लोकांचा पाठलाग न करितां, खानानें तांतडीनें हवेलीस वेढा दिला. इकडे खानाचा मुलगा इखलासखान हा कांहीं निवडक लोकांसह जिन्याचे द्वारें आंत

गेला; व संभाजीस धरून त्याचे केस ओढीत, त्यानें संभाजीस खानाचे हत्ती-जवळ आणिलें. ह्या प्रसंगीं २५ माणसें, कित्येक बायका व मुलें ह्या कैद केल्या गेल्या. ही वार्ता बादशहास अकलूज येथें—ह्यास व पुढें 'असदनगर' (अति सुदैवी शहर) असें नांव मिळालें—पोहोंचली; तेव्हां बादशहानें सरदारखानाचा मुलगा व लष्करचा कोतवाल खानदुर्रानखान यास संभाजीस कैद करून आपणा-जवळ आणण्याचा हुकूम फर्माविला. असदनगर येथून बादशहाचा तळ ता. ५ जमादिलावल रोजीं बहादुरगड येथें पडला असतां, संभाजीचे डोक्यास अपराध्याची लांकडी टोपी घालून—अवहेलना करून—बरोबरच्या मंडळीस हास्यास्पद पोषाख चढवून, उंटावर बसवून वाजत गाजत दोन मैलांवरून लष्करांतून दरबारांत धिंड काढीत आणिलें. संभाजीस दरबारांत रुजू केल्यानंतर कैदेंत टाकण्याचा हुकूम झाला. ह्या वेळीं औरंगजेबानें सिंहासनावरून खालीं उतरून गालिच्यावर बसून 'सिजदा' केला. बादशाही मेहेरनजरेची तमा न धरितां, संभाजी हा एकदां आपल्या बापाबरोबर व दुसऱ्यानें दिलेरखानाचे तावडींतून युक्तीनें फसलावून पळून गेल्यामुळें, त्याच रात्रीं त्याचे डोळे काढण्यांत येऊन, दुसरे दिवशीं कवकलश याची जीभ छाटण्यांत आली. संभाजीस जेरीस आणण्याचें बिकट काम अल्पावधींत पार पडलें ह्या गोष्टीची तारीख ध्यानांत राहण्यासाठीं निरनिराळ्या लेखकांनीं निरनिराळ्या तारखा रचिल्या आहेत. त्यांपैकीं महंमद अजमशाहा याचे वकील इनायतुल्ला यानें रचिलेली तारीख सर्वमान्य झाली असून, ती " बा जनो फर्जंद संभा शुद असीर " म्ह० संभाजी आपले बायकोमुलांसह पकडला गेला ही होय (अबजद पद्धतीनें वरील फारसी ओळीची किंमत १५०० येते. हा आंकडा संभाजीस ज्या सालीं पकडलें त्या हिजरी सनाचा द्योतक आहे). मुकर्रबखान ह्यास ह्या कामगिरीबद्दल 'खान जमान फत्तेजंग' हा किताब, ५०००० रुपये रोख, उंची पोषाख, जडावाचे साजासहित एक घोडा, सोनेरी साजासहित एक हत्ती, एक खंजीर व एक छत्र इत्यादि मिळून शिवाय सप्तहजारी स्वारांची बढती मिळाली. त्याचा मुलगा इखलासखान यास 'खाने आलम' हा किताब व पोषाख मिळून पंचहजारी स्वारांची बढती देण्यांत आली. दुसरा मुलगा शेख मिरान ह्यास 'मुनव्वरखान' हा किताब देण्यांत आला, व तिसरा शेख अबदुल याचे वांट्यास 'इखलासखान' असा किताब आला. याशिवाय खानाचे आप्तेष्टांस प्रत्येकीं पोषाख व मनसबे मिळाले. मुसलमानांची कत्तल करणें व गांवचेगांव बेचिराक करणें ह्या गोष्टीं-बद्दल जिवंत ठेवण्यापेक्षां संभाजीस ठार करणें च श्रेयस्कर होय असा धर्माधि-काऱ्यांनीं निकाल सांगितल्यामुळें, २१ जमादिलावल, राजशक ३२ रोजीं बाद-शाही लष्कर कोरेगांव (फत्तेबाद) येथें आल्यानंतर, त्या च महिन्याचे २९ तारखेस संभाजीचा कलुशासमवेत वध झाला " येणेंप्रमाणें हकीकत या

श्वर असें नांव सांगून, सदर गांव कोल्हापुरापासून ५६ मैल दूर असल्याचें सांगतात. साकीसाने यानें सदर ठिकाण समुद्रापासून एक दिवसाचे रस्त्यांत असून, तें वाणगंगेच्या कांठीं वसलेलें आहे, अशा हि खाणाखुणा दिलेल्या आहेत. संगमेश्वर येथें संभाजीचा वाडा होता. त्यावरील चौथऱ्यावर सदाशिव दादाजी मावळंगकर यानें स्वतः बांधिलेलें घर मोडून ती जागा चौथऱ्याजवळ असलेल्या महाराजांच्या जागेसुद्धां श्री सवाईमाधवराव यांनीं 'सरकारांत ठेविल्याचा' दाखला आहे (पहा—सवाई माधवराव पेशवे यांची रोजनिशी, भाग १. पृ. ४१।४२). संभाजीच्या वाड्याची जागा अजून हि दाखवितात. अशा स्थितींत, दुसऱ्या विश्वसनीय पुराव्याचे अभावीं, संभाजीस कोंकणांतील संगमेश्वरींच पकडिलें असें धरणें युक्त आहे.

तिसरा व महत्वाचा प्रश्न केव्हां पकडिलें हा होय. या बाबतींत ऑर्मनें जून १६८९ चा उल्लेख केला असून, त्याबद्दलचीं कारणें एका विस्तृत टीपेंत दिलीं आहेत. तो म्हणतो कीं, "An abstract is preserved of the letter written by the Government of Madras to the Company on the 20th of July 1679 (ought to be 1689) in which no mention is made of Sambhajee's death. The next letter is dated August 27th; and the abstract says, "Have news from the Moors Camp" (in the Carnatic): "their forces had surprised Sambhagee, brought him prisoner to the Mogul; was mounted on a camel, his eyes put out, and beheaded; and his quarters dispersed as a traitor." Allowing more than 20 days for the coming of the news, Sambhajee might have been taken at the end of June; if less in the beginning of July. The letter of the 27th August gives no intimation how long the news had been received at Madras; so that the event might have happened in the end of July. This circumscription to the interval of a month or 6 weeks may assist inquiry to ascertain the real date which we hope will be done" हा तो उतारा होय. मद्रासच्या इंग्रजांचें ता० २७ ऑगस्टचें पत्र विलायतस गेलें त्यांत संभाजीच्या वधाची बातमी प्रथमतः दिली आहे. ही बातमी कळण्यास वीस दिवस धरून हा वध ऑगस्टच्या आरंभीं झाला असावा व तत्पूर्वीं सुमारें एक महिना तो धरला

गेला असावा, असा ऑर्मचा तर्क आहे. अर्थात् त्याची मदार काय ती ता० २७ ऑगष्टच्या पत्रावर असून, त्यावरून च त्यानें आपली इमारत रचिली आहे. डफ ऑगष्ट काय धोरणानें देतो, हें समजत नाहीं; किंबहुना त्यानें ह्या संबंधीं कोणता आधार जमेस धरिला, हें स्पष्ट होत नाहीं. डफ व त्यावर विश्वास ठेवणारे आजपर्यंतचे सर्व लेखक ऑगष्ट हा महिना चिनदिकृत देत आहेत. गुरुवर्य रा० वि० का० राजवाडे यांनीं गतवर्षी ' संभाजीच्या कारकीर्दींतील अव्यवस्था ' ह्या सदराखालीं एक टांचण वाचून, संभाजी शके १६१० चे श्रावणांत वारला असें प्रतिपादिलें आहे ( पहा, भा० इ० सं० मंडळाचें शके १८३५ चें इतिवृत्त, पृ. १७७ ). रा० राजवाडे यांनीं ग्रांट डफची तारीख ग्राह्य धरिली असें मानल्यास शकाच्या आंकड्यांत फरक करावा लागेल. त्यांच्या हिशेबानें शके १६११ श्रावण म्ह० ऑगष्ट १६८८ येतो. त्यास १६८९ ऑगष्ट म्ह० १६११ श्रावण म्हणावयाचें होतें. परंतु तसें म्हटल्यास त्यांनीं सिद्ध करूं घातलेली 'अव्यवस्था' सिद्ध होतेना! सर्व शकावलीकार ' विभव ' संवत्सर असें एकमतानें देत असतां, भरपूर पुराव्याचे अभावीं, ऑर्म, डफ, राजवाडे अगर सरदेसाई ह्यांपैकीं कोणावर हि ह्या बाबतींत विश्वसतां येत नाहीं. सुदैवानें ' मासिर-इ-आलमगिरी ' कार संभाजीच्या वधाची मित्ती छ २९, जमादिलावल, ११०० हिजरी अशी देत आहे. गणीत करून पाहतां, २९ जमादिलावल म्ह० ता० ११ मार्च सन १६८९ ( ग्रेगोरियन पद्धत ) हि तारीख येते; व ह्या तारखांचा आमच्या इकडील शकावलींत व टांचणांत आढळणाऱ्या फाल्गुन वद्य ३० शके १६१० ह्या मित्तीशीं तंतोतंत मेळ बसतो. ग्रांट डफ व त्याचे पश्चयायवन अनुयायी १६८९ ऑगष्ट ही तारीख देतात; परंतु वरील बिनतोड पुराव्यापुढें डफादि मंडळींची मातब्बरी नाहीं, असें म्हणावें लागतें. मुसलमानी तारीख व मराठी मित्ती यांचा येथें तंतोतंत व नामी मेळ बसत असल्यामुळें आतां संभाजीच्या वधाची मित्ती शके १६१० फाल्गुन वद्य ३०, सोमवार, ता० ११ मार्च सन १६८९ ( नवी पद्धत ) हिजरी सन ११००, छ २९ जमादिलावल हि च धरावी लागते. संभाजीस नक्की कोणत्या तारखेस पकडलें, ह्याची तारीख मिळाली नाहीं; तरी पण त्यास ता० १५ फेब्रुवारी १६८९ रोजीं बहादुरगडीं औरंगजेबासमोर आणिलें असें मासिर-इ-आलमगिरींत दिलेलें आहे. संभाजीस नक्की कोणत्या तारखेस पकडलें, तो पकडला गेला कसा, कलुशाची वास्तवीक हकीकत काय आहे, संभाजी व जैनुन्निसा बेगम ह्यांचे संबंध कोणत्या प्रकारचे होते, संभाजी संगमेश्वरीं एकटा च पकडला गेला किंवा तवारिखकार म्हणतात त्याप्रमाणें आपल्या बायकोमुलांसह पकडला गेला इत्यादि प्रश्नांची चर्चा संभाजीच्या वधाचे बाबतींत होणें जरूर

आहे. सदरील चर्चा कोणी तरी इतिहाससंशोधक करून ह्या क्रांतिकारक प्रसंगावर उजेड पाडण्याचें श्रेय घेईल अशी आशा आहे.

पां. न. पटवर्धन.

# ५२ पुणें येथील खुन्या मुरलीधर

येथील सदाशिव पेठेंत 'खुन्या मुरलीधर' नांवाचें एक प्रसिद्ध मंदिर आहे. त्यास खुन्या-मुरलीधर असें विशिष्ट नांव कां पडलें ह्यासंबंधानें चर्चात्मक चार शब्द लिहीत आहें. प्रचलित दंतकथा अशी आहे कीं, देवालयांतील ह्या सुंदर मूर्तीची प्रतिष्ठापना आपल्या बेलबागेंत करण्याचा व्यामोह नाना फडणवीस यांस उत्पन्न होऊन, त्यांनीं सदर मूर्तीची याचना मूर्तीचे मालक दादा गद्रे यांजपाशीं केली; पण हा डाव साधेना म्हणून हरप्रयत्नानें ती हिसकावून आणावी असा विचार करून, तसें करण्यास त्यांनीं आपल्या आरबांस फर्माविलें; तेव्हां नानांचे आरब व दादा गद्रे यांचे शिपाई यांमध्यें झुंज होऊन, त्या झुंजींत बहुत लोक प्राणास मुकले. व ह्या प्रसंगामुळें च ह्या मुरलीधरास 'खुन्या-मुरलीधर' असें संयुक्त अभिधान मिळालें. ह्या दंतकथेचा उल्लेख किंचित् फरक करून कै. नारायण विष्णु जोशी व रा. सीताराम रामचंद्र गाईकवाड यांनीं आपापल्या पुणें-वर्णनांत अनुक्रमें पृ. ४७।४८ व पृ ८७ मध्यें केलेला आहे. ह्या दोन लेखकांपैकीं पहिल्यानें या ऐकीव कथेचा नानांशीं बादरायण संबंध जोडून, ह्या गोष्टीमुळें त्यांच्या चातुर्यास व राज्यनीतीस कलंक लागतो असें हि बेशक खोटें विधान केलें आहे; व दुसऱ्यानें त्यांच्या 'भिक्षुकांची' थट्टा केलेली आहे ; परंतु उपलब्ध असलेल्या दंतकथा अक्षरशः खऱ्या आहेत असें समजून, त्यांवरून नानांसारख्या मुत्सद्यावर नाहीं नाहीं ते मिथ्या आरोप प्रस्थापित करूं पाहणें रासमंजसपणाचें नाहीं. इतिहास लिहिण्याचा आव घालणारानें प्रत्येक दंतकथा पारखून पाहिली पाहिजे; एरव्हीं अनर्थ गुदरावयाचा ! ह्या सर्वतोमुखीं असणाऱ्या दंतकथेंत हशील किती, ह्याबद्दल विचार करितांना मला म. इ. सा. खंड ७, पृ. २० वर एक प्रमाण सांपडलें; व त्यावरून वरील दंतकथेचा उलगडा झाला. वरील पुस्तकाच्या प्रारंभीं दुसऱ्या बाजीच्या राजवटीच्या आरंभाचीं कांहीं विश्वसनीय टिपणें दिलेलीं आहेत. त्यांत शके १७१९ सालच्या टिपणांत वादविषयक देवालयाचा उल्लेख सांपडतो. तो उल्लेख असाः—

"दादा गद्रे यांनीं सदाशिव पेठेंत देवालय मुरलीधराचें बांधलें त्याची आर्चा वैशाख शु० १० शनवार छ ८ जिल्कादी केली ते दिवशीं मेस्तर बेट यांचे पल-

टणचे लोकांची व अर्बांची कटकट त्या देवळानजीक होऊन शेंपन्नास मनुष्यें ठार पडलें. नंतर मुसोमोन्सम व शाहा मीरखान दरम्यान पडून कज्जा तोडला. कज्जाचें कारण विशेष नव्हतें. देवाजवळ आरब राहत होते तिकडून मेस्तर वेण्या ( ट या ) चे लोक जाऊं लागले. त्यांस आरबानें मना केलें, तें त्यांनीं ऐकलें नाहीं. त्यावरून लढाई सुरू झाली." ह्या ' विश्वसनीय टांचणा ' वरून खुन्या मुरलीधर शके १७१९ वैशाख शु. १० शनवार, ता. ६ मे सन १७९७ या सुदिनीं स्थापिला गेला हें स्पष्ट होतें. बेलबागेंतील विष्णु व हा मुरलीधर ह्या दोघांच्या प्रतिष्ठापनेच्या कालांत हि ३५ वर्षांचें अंतर आहे ही बाब हि विसरतां येत नाहीं. बरें, नानांना इतरत्र मुरलीधराचें मंदिर उभारावयाचें असतें तर त्यांना स्वतंत्रपणें अशी एकादी सुबक मूर्ती घडवितां घेऊन आपला हेतु तडीस नेतां आला असता. मुरलीधराचे रूपानें त्यांचे ठायीं सत्ता व सामर्थ्य हीं सुचक नांदत होतीं.

ही मूर्ती घडणाराचें नांव बखतराम असल्याचें ऐकण्यांत येतें. आपणास ही मूर्ती मिळत नाहीं असें पाहून ह्या बखतरामास दुसरे कोणा इसमास अशी मूर्ति घडवून देतां येऊं नये म्हणून त्याचा हात तोडण्यांत आला असें हि विधान वरीलसारखे कांहीं अप्रबुद्ध वाचाट ठोकून देत असतात. परंतु बेजबाबदार वाचाटांनीं केलेल्या ह्या क्षुद्र व पोंचट विधानास किंमत देण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. अशा रीतीनें ह्या प्रश्नाचा विचारदृष्ट्या विचार करितां, लोकवांत येणाऱ्या दंतकथेत कांहीं तथ्य दिसत नाहीं. सातवे खंडांतील मुरलीधराचे संबंधींच्या प्रसंगावरून खुन्या-मुरलीधर ह्या संयुक्त नावांची उपपत्ती लागते व नाना फडणविसांचा ह्या देवळाशीं दूरचा हि संबंध पोचत नसल्यामुळें, त्यांजवर मात्सर्यानें लादण्यांत आलेल्या कुत्सित आरोपाचें वैय्यर्थ्य हि फलित होतें.

पां. न. पटवर्धन

---

## ९३ कान्हो पाठकाचें गीतासार

---

सदरहू ग्रंथ केंदूर येथील पाठक यांचे संग्रहांत सांपडला. प्रचलित दंतकथा सांगते कीं, ज्ञानेश्वरांचे समाधीचे वेळेपासून खरपांचा मान ज्या कान्हो पाठकास मिळाला त्या कान्हो पाठकानें गीतासार रचिलें. परंतु सदरील ग्रंथाचे शेवटचे ओंवींतील उल्लेखावरून ग्रंथकार कान्हा पाठक नागनाथ यांचा उपदिष्ट होता. त्यावरून ज्ञानेश्वर कालीन कान्हो पाठक याचा ग्रंथ वेगळा असावा हें निश्चित. मात्र हा नागनाथउपदिष्ट कान्हो पाठक ज्ञानेश्वरसमकालीन कान्हो पाठकाच्या घराण्यांतील च होय, असें पाठकांचे विद्यमान वंशज सांगतात.

२ केंदूरपासून जवळ पाचळ (ता. शिरूर) येथें नागेश्वराचें देवालय असून पाठक यांचेकडून देवास नैवेद्य वगैरे उर्जा चालू आहे. हे नागेश्वराचें देऊळ कान्हो पाठक याचे गुरु वडवाळसिद्ध नागनाथ यांचे स्मरणार्थ च बांधिलें असावें.

पां. न. पटवर्धन

---

॥ श्रीगणेशाये नमः ॥

## ॥ भगः गीतेचें सार श्री कान्हो पाठकाचें ॥

ॐ नमो जी भगवंता : पुराण प्रसिद्धा अव्यक्ता : पर्यासि भगवद्गीता : माहा पातकें हरतील ॥ १ ॥ धृतराष्ट्रें प्रश्न केला : ते संजयो अनुवादला : कौरवदळभारु देखीला : काये बोलिला अर्जुन ॥ २ ॥ म्हणे आम्ही गोत्रबंधु : याचा करूं नये वधु : धर्मद्रोह माहा बाधु : राज्यावीण चाड नाहीं ॥ ३ ॥ मोह उपजला पांडवा : धनुश ठेवीलें गांडांवा : म्हणे अविचारु माधवा : मज घडत चुकला ॥ ४ ॥ सांडी सांडी देहवासना : न धरीं विशयाचीं कल्पना : निवारीन भवबंधना : कृष्ण म्हणे रे अर्जुना ॥ ५ ॥ मग तयाचें अयकोनी बोलणें : काये बोले नारायेण : मरीजे मारीजे कवणें : हे आत्मस्वरूप अविनाश ॥ ६ ॥ हे न तुटे न बुडे न जळे : येतां जातां पै न कळे : ईछा आपुलेनी खेळे : वैष्णवीचेनी संगें ॥ ७ ॥ मी करितो ऐसे न म्हण : आनादी सीध हे ची कारण : मन संकल्प जाण : फळ उपदेश न धरी ॥ ८ ॥ न करीं सुक दुख विचारु : अभंग भगे नाही निर्धारू : ज्ञानदृष्टि पाहे विचारु : पाप नाहीं युद्धाचें ॥ ९ ॥ पंचभूतांचा एक कटा : ते हे शरीर या सुभटा : कर्मे करीती येकनिष्टा : ते तैसी च फळ पावती ॥ १० ॥ यज्ञ कराती मनकामना : जे जे रुचे ज्या वासना : ते ते अर्पिती जीववासना : हे परीत (?) परीयसा ॥ ११ ॥ अनाश्रीये कर्म करीती : कर्मक ते ते होती : नाही कर्मफळभागी : ये कल्पनेवांचुनी ॥ १२ ॥ सत्व रज तम त्रिगुणी : आज्ञान प्रकृती हे गवसानि : ज्ञानलोप द्वैत घसनी : या कर्म ईंद्रियाचेनी संगे ॥ १३ ॥ आतां चक्रपाणी म्हणे वीरा : तुज मज संख्या नाहिं अवतारां : अनित कीलया येरझारा : वरि अज्ञुणी न भीळसी ॥ १४ ॥ माझें ऐसेंचि अवतरणें : धर्म रक्षावया कारणें : साधुसंतांचें प्रतिपाळणें : दुष्टां दुःख यावया ॥ १५ ॥ जें दोहिं निपजत : तें मजचि ब्रह्मार्पण करित : मज वेगळें नाहिं ठेवित : ये यातायातीचेनि भेगें ॥ १६ ॥ त्याचें सत्त्व जितुलें : तें मजचि अर्पिलें : म्हणउनि नाहिं ठेविलें : पुनरपि जन्मावया ॥ १७ ॥ जें जें करून मज अर्पिती : ते सायोज्यता मीं चि होती : मजसाम्यें रूवतीनि : ते सन्यासी भाग्यवंत ॥ १८ ॥ जेथें नाहीं डंभ काम क्रोध : नाहा लोभ हांसा अनुवाद : अनुभवे स्वयंशब्दबोध :

अत्मतत्वी राहीलें ॥ १९ ॥ पाहाणे अैकणें बोलणें : चालणे अवग्रहण होणें : हे जीतुके करणे : तें काही च वृथा न धरिती ॥ २० ॥ ते वांचरती साक्षयोगे : जीव जानसे सोहंसंगें : प्राणापानसमान योगे : आत्मबोध जालिया ॥ २१ ॥ गोविंद म्हणे पंडुसुता : या योगी राहे निरुता : जितेंद्रिये होय निरुता : न करीं चिंता देहाचीं ॥ २२ ॥ परतोनी आपना पाहि : मनीं विचारूं नको कांहीं : सदा अनुभवी राही : तूं ठाईचे ठाई निवसील ॥ २३ ॥ शब्द स्पर्श गंध रस : रूप या विषयाते देखोनि लप : हा तुवा न करावा साक्षप : या विषयां ते कळो ने दी ॥ २४ ॥ अर्जुन म्हणे गा हरी : हे मन चंचळ भारी : देव म्हणे वैराग्य धरीं : अत्मतत्वी राहे पा ॥२५॥ आर्जुना मी सकळांसि आगमु : येखादा+यें सुगमु : जे सांडिती द्वैतभ्रमु : आत्माराम म्हणोनीया ॥ २६ ॥ माझे साकार प्रकृती भजन : पृथ्वी आप तेज वायो गगन : मी सकळा जीवाचे जीवन : उत्पत्ती प्रळयो मजमाजि ॥ २७ ॥ माझे दिव्य तेज अगणित : तेणे चंद्र सूर्य उजळत : ध्वनि आकाषिं उमठत : हे ची ओळखी रे माझी ॥ २८ ॥ माझे अनंत पद लक्षण : मज यावया हे ची कारण : माझें स्वरूप असे निर्वाण : सहज चि मुक्त होसी ॥ २९ ॥ आर्जुन म्हणे हृषिकेशा : कर्मि कैसा : हे देह जाता आशेशा : तूं कैसीया परी भेटसी ॥ ३० ॥ देव म्हणे सदाकाळीं : जे मज ध्याती हृदयेकमळीं : त्याते पावेन अंतकाळीं : म्हणोनी मतें स्मर पा ॥ ३१ ॥ माझेनि नामें मज पावति : त्यासी नाहीं पुनरावृत्ति : मज सांडुनि सुख चिंतिती : ते पावती दुःखातें ॥ ३२ ॥ दानें व्रतें तपें : जे न कळे नव्हे सोपें : ते पावीजे येणें स्वरूपें : आत्मज्ञान जालीया ॥ ३३ ॥ आर्जुना म्या व्यापिलें अघवें : माझेनि स्वरूपें जग जीवें : न लिंपे तूं दुखवैभवें : कैसा स्वभावें वर्तत ॥ ३४ ॥ म्या अधिष्टिली प्रकृति : भुते मजमाजि असती : साकार निराकाराची स्थिति : ते मी चि होउनि राहे ॥ ३५ ॥ मजवाचुनि नाहीं दुजें : अैसे लपोनी राहिजे : त्याच्या संसाराचें वोझें : मजवरी पडेल ॥ ३६ ॥ पत्र पुष्प फळ उदक : जे मज अर्पिती भाविक : आनीक ही निपजे सकळीक : गुण दोष मज अर्पावे ॥ ३७ ॥ अर्जुना मी साकार दृष्टी : तव आक्षपी किरीटी : तरी या देहाचीया गोष्टी : काय मजहुनी वेगळीया ॥ ३८ ॥ देव म्हणे मी येकला : विश्वभरिता अवतरला : रिता ठाव नाही उरला : तो मी आतां सांगेन ॥ ३९ ॥ मी रवी शशी साम वेद : व्यास कपिल नारद : गरुड अक्रूर प्रल्हाद : अनंत विराटस्वरूप माझें ॥ ४० ॥ म्हणोनि सकळ जीव जात : हे माझेचि स्वरूप सत्य : तूं सांडी भिन्न भेदद्वैत : सहजचि मुक्त होसी ॥ ४१ ॥ संतोशोनी म्हणे पार्थः मज उत्कंठित मनोरथः तुझ्या स्वरूपाची मातः दाखवी दातारा ॥ ४२ ॥ देव ह्मणे रे पाहेः जे जे व्यक्त अव्यक्त आहेः आनंत उपमा लाहेः दिव्य तेज आगणित ॥ ४३ ॥ अर्जुन म्हणे दाखविलें ॥

ते नेत्रीं सर्वगत पाहिलेः देखोनी मन मावळलेंः मग अनुवाद खुंटला ॥ ४४ ॥
आनंदे आसुवें गद्गदिलेः कंपित रोमांच उठलेः यानंतरे जे वितळेः अनुभवी
जाणतो ॥ ४५ ॥ मग घातले दंडवतः उठोनी आसुवे पुसीतः म्हणे धन्य धन्य
विष्णुभक्तः जे सदा सुख पावले ॥ ४६ ॥ तये अवसरी ह्मणे कृष्णः आणीक हे
प्रश्नः भक्तयोगियां सहिष्णुः न करी चिंता कासयाची ॥ ४७ ॥ न सांडी आपुला
यातिधर्मः न ज ( च ! ) उद्देशें करी कर्मः नाहीं इच्छा...मेः मन इंद्रिया नेमिल्या
॥ ४८ ॥ करुनि न उच्चारी पुन्यः पापा नातळे तो धन्यः सर्वासी मज मान्यः
घ्यातो शून्य साकार ॥ ४९ ॥ अर्जुन म्हणे मदसूदना : हे तव नये माझ्या मनाः
अनुभवेंवीण अनुमानाः आलें काये करावें ॥ ५० ॥ पंचभुतिक जाणः यातें
वागविता कोणः ऐसाये प्रकृतीचा सीणः हरी माझा केशवा ॥ ५१ ॥ कृष्ण ह्मणे
पंडुनंदना : हे शरीर पंचभुतिक जाणः याने वागविता मी च जाणः जग जावे
माझेनी ॥ ५२ ॥ जत्र जीव तत्र शिवः ऐसा गुरुमुखे अनुभवः इतुकेनि बुझा-
वला पांडवः म्हणे हा देव अंतरीचा ॥ ५३ ॥ पुढती एक पा निवृत्ती : मुनी पावले
परम गतीः सकळ जीवोत्पत्तीः मजप्रति पा हे ॥ ५४ ॥ तिहीं गुणीं प्रकृती निपजेः
सत्वे उत्तम गती पाविजेः रजो मध्ये मोहिजेः अधोगती तामस ॥ ५५ ॥ ऐसे हे
तिन्ही गुण अनादीसिद्धः येणे शरीर होय बद्धः शब्ददोषें नव्हे शुद्धः भवजळीं
गुंतलो ॥ ५६ ॥ म्हणोनी तूं निःसंग होय पाः संग अवघा सांडी पाः तरी
तत्वविचार सोपा : स ज ची मुक्त होसी । ५७ ॥ सांगेन परमार्थ यक सहज :
तरी हे सकळ भोगणें मज : माझ्या आनंदाचे भोजें : हे त्रैलोक्य पा हे ॥ ५८ ॥
पुण्यपाप वडे देहीं : ते मी च करितो पाहीं : मजवेगळें दुजें नाहीं : बरवें वोखटें
माझे ची ॥५९॥ मी दीप्ततेजें हुताशन : मी इंद्रिय ची मनु : सुंदर मोती मदनु :
अष्टभोग मी ची भोगी ॥ ६० ॥ म्हणोनी साकार निराकार : हे चि माझे अंकुर :
तूं सांडी भिन्न भेदाकार : निराकार परब्रह्म होसी ॥ ६१ ॥ शंका न धरी जन्म-
मरणा : म्हणसी अधोगती कवणा : तरी या प्रकृतीचीया गुणा : माजी असोनी
अलिप्त ॥ ६२ ॥ मज लिंग देह जाण : वासना हेची खुण । मजवेगळें दुजेपण :
गर्भवास यावया ॥ ६३ ॥ यालागीं रचिलें वेदा : पाळावया विधिनिषेधा : आचार
धर्मभेदा : कुळधर्म न सांडावे । ६४ ॥ जव्हां जाणितलें नाहीं ब्रह्म : तव तिथें
त्यजिलें आपुलें कर्म : तो अधर्म चुकला धर्म : पाखाडीत येकला ॥ ६५ ॥
अर्जुन म्हणे हे सांगावेः जे वेदीं कर्म बोलिलें देवेंः जेणे नाम म्हणीतलं भावेंः
यास काये फळ असे ॥ ६६ ॥ सत्वगुणें जे सजतीः ते सत्यलोकासी जातीः
× × प्रपंचे जे सजतीः ते होती दैत्यराक्षस ॥६७॥ काया वाचा मनः जे त्रिविध-
ठाई भजनः जे मजवाचुन जाणः काही च नेणती ॥ ६८ ॥ आधी वेदांचें तोंड
धरीः मग करूं नये ची करीः बाह्य वर्तें लोकाचारीः परी अंतरीं कळो नेदी ॥६९॥

कर्म करावी सकळः परी न उच्चागवी कर्मफळें: हे ची भजन निर्मळः हा उपदेश ऐक पा ॥ ७० ॥ भावें भक्ती कीजेः मनी दोन्ही न धरीजेः सर्व भूतीं नमस्कारीजेः अरुभावीं विनय पा ॥ ७१ ॥ अर्जुन म्हणे घनानंदाः विसरलों भिन्नभेदाः धाकुटपणीच्या संवादाः क्षमा कीजे मलगीच्या ॥ ७२ ॥ म्हणोनी घातलें लोटांगणः आनंदे आलें फुंदनः कृष्णें दीधलें आलिंगनः म्हणोनी विसरलो रे सखया ॥ ७३ ॥ सकळ शास्त्राचें सारः कीं उपनिषदांचें गव्हरः नाकार निराकारः सगुण निर्गुण निवडीलें ॥ ७४ ॥ सकळ आगम चे मंथनः धांडे बहु विस्तारिले: कृष्णें अर्जुनासी कथिलें: आत्मज्ञान जाणिजा ॥ ७५ ॥ मन्मांदागचोन नकेः जीं हि केली माहायानकें: तीं नाशनीं निमिशें यकः गुरुकृपा जाणिजा ॥ ७६ ॥ गुरुपदेश नागनाथु : कान्हो पाठक विनविनु: तत्वमसी असे चिंती तुं: ब्रह्मज्ञान शिवयोगी ॥ ७७ ॥ इति श्रीभगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गीता संपूर्णमस्तु श्री कृष्णार्पणमस्तु श्रीरस्तु छ छ.

---

# १४ खर्डे येथील शिलालेख व जुन्या वस्तु

## (१)

माझे मित्र ग. रसाळ हे पुढील माहिती पाठवितातः—

खर्डे येथील भुईकोट किल्ल्यावर एकंदर तीन लेख आहेत

१ खंदकानंतरचा दरवाजा अगदीं साधा व लहानसा आणि पडका आहे त्यावर लेख वगैरे कांहीं नाहीं.

२ उत्तराभिमुख दरवाजा आहे त्यावर नं. ३ चा फारशी—उरदू लेख आहे.

३ पूर्वाभिमुख लंगरी खिळ्यांच्या कवाडांच्या प्रचंड दरवाज्याच्या गणेश पाटीवर नं० १ चा बालबोध लेख आहे. तो नजीकच्या ओवऱ्यांच्या गच्चीवरून वाचतां येतो.

४ किल्ल्याच्या आवारांत मध्यभागीं मशीद आहे तिजवर नं. २ चा फारशी—उरदू लेख आहे.

वरील तीन हि लेख परिश्रमानें मिळविले आहेत. सदरचे लेख अति उंच ठिकाणीं असल्यामुळें फार प्रयत्न करावा लागला.

सुदैवानें नं० २।३ लेखांचीं भाषांतरें व अर्धवट लेख हीं खर्डे येथील कुळकर्णी यांच्या येथें एका जुन्या कागदावर लिहिलेलीं सांपडलीं. अर्थात् हीं भाषांतरें आम्हीं केलीं नाहींत.

नं. २।३ चे लेख मूळांत फारशी-उर्दू आहेत तसेंच घेऊन मराठी भाषांतर तेवढें जुन्या कागदावरून त्याखालीं घेतलें आहे.

किल्ला बांधणारे आप्पासाहेब सुलतानराव निंबाळकर यांच्या वेळेची त्यांची ढाल अडीच फूट व्यासाची मोठी आहे. सामान्य मनुष्यास दोन हातांनीं सहज उचलत नाहीं अशी ऐतिहासिक वस्तु आहे.

त्यांचा मखमाली बिछाना हि येथें आहे. ह्या दोन्ही वस्तू खर्डे येथील चावडींत एका खोलींत धूळ खात आहेत ! !

सर्डे येथील भुइकोट किल्ल्यावरील लेख
किल्ल्याचे आंतील (नं. ३) दरवाजावरील
गणेशपट्टीवरचा शिलालेख

१ " ॥ श्री ॐकारेश्वर प्रसन्न ॥

॥ स्वस्ती श्रीनृपशालीवाहन शके १६६५ रुधिरोध-
॥ गारीनामसंवत्सरे अश्वीन वद्य द्वादशी तद्दिनी
॥ राजश्री सुलतानजी निंबाळकर देशमुख देशपांडे व
॥ मोकदम कसबे सिवपट्टण व अष्टाधिकार पेठ कसबे मजकूर
॥ परगणे जामखेड सरकार अहमदनगर सुभे खुजस्ताबुनियाद
॥ औरंगाबाद यानी केले सुलतान दुर्गाचे रचनेस प्रारंभ केला
॥ सन ११५३ शुभं भवतु हिजरी

२ खर्डे किल्ल्यांतील मशीदीचे मोहट्यावरील लेख.

بسم الله الرحمان الرحیم

چو وصف مگر به قرآن امانسبت ای ساجد - ساخت صدر جہان خان بہادر این مسیح

سنه ۱۲۱۶ ہجری

तरजूमा उर्दू.

ی مصلی یہ مسجد نماز و قرآن پڑھنے کیلئے صدر جہان خان بہادر نے بنائی ہے -

तरजूमा मराठी.

हे निमाज पढणारे मनुष्या ही म्हशीद निमाज आणि कूराण पढण्याकरितां सद्रे जहांखान बहादूर यानें बांधली सन १२१५॥ हिजरी.

३ खर्डे किल्ल्याच्या बाहेरील नं. २ च्या दरवाजावरील लेख

نقل دروازۂ قلعه بیرون (باہر کا) دروازہ

درآیام فرخندہ فرجام امارت و ایالت مرتبت راجه سلطان جی نمبالکر دیشموکهه و دیشپانڈے مقدم سیٹهه مہاجن وغیرہ قصبۂ سیئوپٹن پرگنه جامکهیڑ سرکار احمد نگر خجستۂ بنیاد آورنگ آباد و قلعه سلطان درگ قصبۂ مذکور بتاریخ شہر درشعبان سنه ۱۱۵۳ و ۱۱۴۶ فصلی - شہر ہجری سنه ۱۱۵۷ ھ حد ساخته *

### तरजूमाउर्दू

بیچ زمانه - مبارک خصلت امرو صاحب مرتبه راجه سلطان جی نمبالکر دیشموکهه و دیشپانڈے مقدم مہاجن وغیرہ قصبۂ سیئوپٹن پرگنه جامکهیڑ سرکار احمد نگر صوبه خجسته بنیاد آورنگ آباد کے قلعه (بنام) سلطان درگ قصبۂ مذکور بتاریخ ۲۵ شعبان سنه ۱۱۴۶ فصلی مطابق بموجب ماہ ہجر سنه ۱۱۵۶ ھ کو حد تیار ہوا *

### तरजूमा मराठी

उत्तम व गुणवान अमीर व साहेब मरतबा राजा सुलतानजी निंबाळकर देशमुख देशपांडे मोकदम महाजन सेट वगैरे कसबे सिवपट्टण परगणे जामखेड सरकार अहमदनगर सुबा खुजस्ताबुनियाद औरंगाबाद यांचे कारकिर्दीत किल्ला सुलतानदुर्ग कसबेमजकूरची हद्द ताा २५ माहे शाबान सन ११४६ फसली बरहुकूम माहे हिजरी ११५६ सन मध्यें तयार झाला.

---

## ( २ )

## धानोरे येथील शिलालेख

रा. रसाळ यांजकडून आलेली माहितीः--

अहमदनरच्या पूर्वेस २० मैल नगर–जामखेड रस्त्यावर धानोरे गांव आहे. येथील मारुतीच्या देवळासमोर जमिनीवर सुमारें ३ फूट उंचीचा ओबडधोबड

---

* खर्डे या गांवास 'शिवपट्टन' हें नांव या वेळेस सुलतानराव निंबाळकर यांनीं दिलें.

दगडी खांब आहे. त्याच्या एका च अंगास ( मारुतीकडील ) सोयत जोडलेला लेख आहे.

सदरचा खांब जमिनींत बरा च खोल पुरला असून त्यावर हल्लीं मातीची भर पडलेली आहे. तथापि त्यावरील ६ ओळी स्पष्ट दिसतात. मातींत गेलेल्या भागावर सुद्धां बऱ्या च ओळी आहेत असें येथील पुष्कळ लोक सांगतात. थोडी माती उकरतां च तसा सुगावा हि लागतो.

लेख असलेला पाषाण काळवत्री कठीण जातीचा असून अक्षरें कोरलेलीं आहेत. सुवाच्य आहेत पण दुर्बोध !

सदर दगड जमिनीत १ पुरुषभर खोल पुरलेला आहे. त्याखालीं द्रव्याचा ठेवा आहे, वगैरे यासंबंधीं दंतकथा धानोऱ्यास कळतात.

सदरच्या सहा ओळींचा तज्ञांकडून अर्थबोध होण्यासारखा असल्यास सर्व लेख मिळविण्याची खटपट करूं; व संशोधकांस शक्य ती मदतहि करूं.

धानोरे येथील शिलालेख

द र ऊ मा ने ह ठा म
त ल्ह न्ह ना न ० ॥
म स्या सुा अ ळ
फ वा घु ळ दी
ठ न वा ळ ॥
ळ से डां ० ॥
अपूर्ण

शं. श्री. देव

## ६४ ऐतिहासिकपत्रासंबंधानें माहिती

( १ ) मराठी रियासतींत राजपत्रांवर तीन शिक्के असत; एक छत्रपतीचा मथळ्यावर, दुसरा डावीकडे पंतप्रधानाचा व तिसरा उजवीकडे पंतप्रतिनिधीचा. आरंभ स्वतिश्री म्हणून होई व शेवट लेखनालंकार ( मर्यादेयं राजते ) म्हणून होई.

( २ ) छत्रपतींचें प्रतिनिधीस जें पत्र जाई त्याच्या शेवटीं सुज्ञ असा हे शब्द स्वतः छत्रपति लिहीत.

( ३ ) प्रतिनिधीचे प्रजाजनास जें पत्र जाई त्याच्या शेवटीं राजते लेखनावधि व निदेश समक्ष किंवा पा। हुजुर हे शब्द असत.

( ४ ) पंतप्रधानाचे प्रजाजनांस किंवा कामगारांस जें पत्र जाई त्याच्या शेवटीं आज्ञा प्रमाण हे शब्द असत.

( ५ ) छत्रपतीनें दिलेली सनद ऊर्फ राजपत्र अमात्य म्हणजे मुजुमदार लिहि व खूण लेखनालंकार हे शब्द असत. अशा राजपत्रावर सचिव ऊर्फ सुरनिस रुजू सुरनविस हे शब्द पाठीवर लिही. सुमंत संमत सुमंत हे शब्द पाठीवर लिही. राजाज्ञा संमत सरकार हे शब्द पाठावर लिही फडणीस जाणिजे हे शब्द शेवटीं लिही, आणि तेरीख हे शब्द हि फडणीस च लिही. सचिव, सुमंत, राजाज्ञा व फडणीस आणि पंतप्रधान यांचे मुतालिक आपापल्या मुख्याच्या शब्दाखालीं बार बार बार बार असे शब्द लिहीत. इतकें लिखाण झालें म्हणजे राजपत्र सर्वांगांनीं संगीन झालें. लिखाणाचा हा प्रकार मुसलमानी अमलांत पातशाही सनदांतून हि असा च आढळांत येतो. मुसलमानांनीं ही पद्धत यादवांचा श्रीकरणाधिप जो हेमाद्रि त्याच्या लेखनप्रशस्तीतून परंपरेनें उचललेली आहे.

( ६ ) हजीर मजालसीच्या निवाड्यांत गांवांतील किंवा प्रांतांतील जे गोत जमले असतील त्यांचे शिक्के व सह्या किंवा निशाण्या निवाड्याच्या प्रारंभीं द्याव्या लागत व शेवटीं साक्षी द्याव्या लागत.

वि. का. राजवाडे

## ९५ श्रीशिवछत्रपतींची पुण्यतिथी

श्रीशिवछपतींच्या जन्मतिथीसंबंधानें ज्याप्रमाण निश्चित असें कांहीं ठरलेलें नाहीं, तद्वत् च त्यांचे मृत्युतिथीची स्थिति आहे. महाराजांच्या पुण्यतिथीसंबंधानें आजतागायत प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक साधनांत खालील माहिती मिळते:—

१ सभासद विरचित शिवछत्रपतींचें चरित्रः— चैत्र शु. १५ रविवार, दोनप्रहर, शके १६०२.

१ चित्रगुप्तविरचित शिवाजीमहाराजांची बखरः तिथीचा उल्लेख नाहीं.

१ सप्तप्रकरणात्मक चरित्रः–चैत्र शुद्ध १५, रविवार दोनप्रहर.

१ शिवदिग्विजयः—चैत्र शु. १५, शनिवार.

१ श्रीशिवप्रतापः—उल्लेख नाहीं.

१ रायरीची बखरः—किता.

१ शिवछत्रपतीचीं ९१ कलमी बखर ( भारतवर्ष प्रभात ):—शके १६०२, चैत्री पौर्णिमा, दोनप्रहर.

१ सरंजामे यांची शकावली:—चैत्र शु. १५. रविवार, दोनप्रहर, ता. ७ एप्रिल. १६८०.

१ सातारचे श्रीमंतछत्रपती शिवाजमिहाराज यांचे वंशाचा इतिहास ( भिडेकृत):— चैत्र शु० १५, ता० ५ एप्रिल १६८०.

१ मासिर-इ-अलमगिरी:—२४ रबिलाखर १०९१ हिजरी.

१ तारीख-इ-महमदी: — कित्ता

१ वील्स कर्नॉलजी:——२४ रबिलावल १०९१ हिजरी.

१ ग्रांट डफ वगैरे:—ता० ५ एप्रिल १६८०.

येणेंप्रमाणें तिथींचे उल्लेख सांपडतात. ग्रांट डफ यानें शके १६०२ चैत्र शु० १५ रविवार हा रोज धरून इंग्रजी तारीख दिली आहे; व ती देतांना जुनी जंत्री उपयोगांत आणिल्यामुळें, त्यानें एक दिवसाची चूक केली आहे ! रविवार धरिला तर ता० ४ एप्रिल ही यावी. वाराचा व तिथीचा निश्चय ठरला म्हणजे इंग्रजी तारीख तेव्हां च काढितां येईल. तस्मात्, चैत्री पौर्णिमेस रविवार येतो किंवा कसें हें पाहिल पाहिजे. महाराज चैत्री पौर्णिमेस वारले याबद्धल सर्व साधनकारांची एकवाक्यता आहे, प्रश्न काय तो वारासंबंधीं आहे रा. व्यंकटेश बापुजी केतकर व रा. गणेश सखाराम खरे या उभयतांचे साहाय्यानें सूक्ष्म गणित करून पाहतां, चैत्री पौर्णिमा शनिवारीं च होती, असें सिद्ध होतें. सदर सालीं शनिवारीं पौर्णिमा ५५ घटकापर्यंत असल्यानें रविवारीं पौर्णिमेचा संबंध नव्हता. हेंहि ओघानेंच येतें. महाराज दुपारीं वारल्याचें स्पष्ट उल्लेख आहेत. शिव-दिग्विजयांत व मराठी रियासतकार रा. सरदेसाई यानीं आपल्या ग्रंथास एका जुन्या टिपणाच्या आधारानें जोडलेल्या परिशिष्टांत वाराचा उल्लेख 'रविसुत शनि ऐसें नाम तें वासराला' ह्या शब्दांनींच केलेला आहे. अशा स्थितींत महाराज शके १६०२ चैत्र शुद्ध १५ शनिवारीं दोन प्रहरीं वारले असें धरणें क्रमप्राप्त होतें.

मुसलमानी तवारिखांतून ता २४ रबिलाखर ही तेरीख दिलेली आहे. परंतु ही तारीख अगर वीलची रबिलावल २४ ही तारीख प्रस्तुत तिथीशीं जमत नाहीं. चैत्री पौर्णिमेस १४ रबिलावल ही तारीख येते; व १४ च्या ठिकाणीं चुकीनें २४ ही तारीख पडणें फारसें अशक्य नाहीं.

डफनें रविवार धरून तारीख दिलेली असून ती हि एक दिवसाचे फरकानें चुकीनें दिलेली, हें वर आलें च आहे. खरी तारीख ता. ३ एप्रिल १६८० ही आहे.

एवंच, श्रीशिवछत्रपती शके १६०२ चैत्र शुद्ध १५ शनवार, दोन प्रहर, ते. १४ रबिलावल १०९१ हिजरी, इंग्रजी तारीख ता. ३एप्रिल सन १६८० इ. रोजीं निवर्तले हें निश्चित समजावें.

पां. न. पटवर्धन

# १६ ज्ञानदेवकृत वसिष्टबोध

१ ही पोथी कऱ्हाडास सांपडली, इच्या मुखपृष्ठावर खालील मथळा आहे:—

श्रीगुरुकासिनाथायेन्मः ग्रंथ वसिष्टबोध कृत्य ज्ञानदेवो वोव्या सुमार १५० पानें सुमार २० वीस

पैकीं शेवटलें २० वें पान गहाळ. विसाव्या पानावर पाच चार ओव्या असाव्या. प्रकणवार ओंव्यांची संख्या अशी:—

| प्रकरण | | ओंव्या |
|---|---|---|
| १ | — | ७१ |
| २ | — | १४ |
| ३ | — | १२ |
| ४ | — | १३ |
| ५ | — | ७ |
| ६ | — | १२ |
| ७ | — | १८+ |
| | | १४७ |

पानांची व ओंव्यांची संख्या मथळ्या वर सुमारानें सांगितली आहे. त्या अर्थीं पोथीचीं पानें व ओंव्या मुळांत एकंदर किती होत्या, तें नकलकारास माहीत नव्हतें. त्याच्या पुढें फक्त २० पानें होतीं. पैकीं मला फक्त १९ पानें मिळाली.

षष्ठमप्रकरणाच्या शेवटीं ओंवी अशी:—

ऐसें हे परमार्थसाधन । परउपकारार्थ बोलणें ।
वसिष्ठरामा संवादे कथन । म्हणें ज्ञानदेव ॥ १२ ॥

या एका समाप्ती वरून ग्रंथ ज्ञानदेवकृत आहे हें कळतें. गेल्या वर्षीं रा. चांदोरकर यांनीं ज्ञानेश्वराचा योगवासिष्ट ग्रंथ प्रसिद्ध केला, त्याहून हा वसिष्टबोध ग्रंथ निराळा दिसतो. प्रस्तुत ग्रंथाची भाषा नकलकारांनीं आधुनिक केली आहे. तत्रापि एकाददुसरें रूप ज्ञानेश्वरकलीन चुकून राहिलें आहे. उदाहरणार्थ,

| प्रकरण | ओंवी | रूप |
|---|---|---|
| १ | ८ | तिये |
| १ | १४ | जिवात्मेयां सिं |
| १ | ७१ | वावरा चें |
| २ | ६ | इयें |

| | | |
|---|---|---|
| ४ | २ | पृथ्वी येसणा |
| ४ | ७ | इये समस्तें |
| ७ | ४ | इहिं डोळा |

ग्रंथ मंडळाच्या संग्रहास ठेविला आहे.

त्रि. का. राजवाडे

## १७ ज्ञानदेवकृत प्राकृत गीता

१ कऱ्हाड तालुक्यांत कृष्णातीरीं मालखेड नामें तीर्थक्षेत्र आहे, तेथें ज्ञानदेवकृत प्राकृत गीतेची एक प्रत सांपडली. ही प्रत शक १६९० सर्वधारीसंवत्सरीं लिहिली हींत विशेष असा आहे कीं, हींत कांहीं रूपें ज्ञानेश्वरकालीन आहेत. उदाहरणार्थ,

| अध्याय | ओंवी | रूप |
|---|---|---|
| २ | ३ | तुझेया |
| २ | १७ | श्रोतेयां सी |
| ३ | ३ | सांघितले |
| ३ | ८ | तवं |
| ३ | ९ | आत्म्येया |
| ३ | ९ | योगिया |
| ७ | ४ | आपणाथे |
| १८ | ३ | परमेश्वराथे |

अशीं आणीक हि उदाहरणें आहेत, परंतु विस्तरभयास्तव तीं देत नाहीं. सांगण्याचा मुद्दा एवढा च कीं या प्रतींत कांहीं ज्ञानेश्वरकालीन रूपें आहेत. मूळ प्रतींत सर्व रूपें ज्ञानेश्वरकालीन होतीं नकलकरानें त्यांतील बहुतेक सर्व स्वकालीन केलीं, परंतु कित्येक स्थलीं जुनींच रूपें ठेविलीं. उदाहरणार्थ, पंधराव्या अध्यायाच्या १६ व १७ ओंव्या पहा १५ व्या ओंवींत माझेया असें रूप लिहिलें आहे. आणि लागलींच १६ व्या ओंवींत माझ्या रूप काढिलें आहे. या वरून स्पष्ट होतें कीं मूळ प्रतींत सर्व रूपें ज्ञानेश्वरकालीन होतीं.

२ पहिल्या अध्यायांत ८ वी ओवी अशी आहे:—

त्या उपकारा स्तव निर्धारु ।
म्या कथिला ज्ञानेश्वरु ॥

आतां नमु ईश्वरु ।
जेणें अज्ञानअंधकारु नीरशिला ॥ ८ ॥

पूर्वील पांच चार ओंव्यांत ग्रंथकार सांगतो की व्यासानें संस्कृतांत गीता-ग्रंथ केला, पण तो अज्ञ जनांस कळत नाहीं, एतदर्थ, व्यासांचा उपकार थोडा-फार फेडावा या बुद्धीनें त्याचें प्राकृत भाषान्तर पूर्वी केलें. तें कोणीं केलें हें आठव्या ओंवींत ग्रंथकार सांगतो त्यां ग्रंथकारानें पूर्वी ज्ञानेश्वरु नामक ग्रंथ उपकार फेड-ण्याच्या निर्धारानें केला. ज्ञानेश्वरु म्हणू जे ज्ञानेश्वरी. तिन्ही चरणांत रुहवा म्हणून ी बद्दल रु लिहिला आहे. तात्पर्य या ओवींत ग्रंथकार आपण ज्ञानेश्वरीनामक ग्रंथ पूर्वी केला असें स्वतः त्या हें पद घालून सांगत आहे व त्या ग्रंथाचें नांव ज्ञानेश्वरी होतें असें स्वतः म्हणत आहे. कित्येक लोक त्या ग्रंथाला ज्ञानदेवी म्हणत परंतु स्वतः ग्रंथकार स्वतःच्या ग्रंथाला ज्ञानेश्वरु ऊर्फ ज्ञानेश्वरी म्हणतो. आणि स्वतःच्या नांवावरून स्वतः केलेल्या ग्रंथाला नांव देण्याचा संप्रदाय भारतवर्षांत व महाराष्ट्रांत फार पुरातन काला पासूनचा आहे. उदाहरणें सहज आठवण्यासारखीं असल्यामुळें व्यर्थ कालहरण करीत नाहीं. ह्या आठव्या ओंवींतील चौथ्या चरणांत रुकार आला आहे. परंतु असली एकनाथाच्या नांवानें प्रतिष्ठित झालेली पद्धत ज्ञानेश्वर कधीं कधीं उपयोगांत आणितो.

३ ह्या सबंध ग्रंथांत फारसी किंवा कानडी असा वाटणारा एक हि शब्द नाहीं.

४ व्यासाच्या भगवद्गीतेचें प्राकृत सार अज्ञां करितां येथें देतों असें ज्ञाने-श्वर सांगतो. परंतु, भगवद्गीतेचा क्रम या ग्रंथांत नाहीं. बालांना सुगम होईल असा विषयविभाग ह्या ग्रंथांत केला आहे धनुष्यभातें खालीं ठेवून अर्जुन बोलला, एथ-पर्यंत कथा सांगून पहिला अध्याय संपविला. क्लैब्याचा अवलंब करूं नकोस, हा विषय दुसऱ्या अध्यायांत आणिला आहे. तिसऱ्या अध्यायांत पंचप्राणांचा निर्देश करून, मायावर्णन चौथ्यांत थोडक्यांत दिलें आहे. पांचव्यांत भक्तीचा महिमा वर्णिला आहे. साहाव्यांत योग सांगून, सातव्यांत कनिष्ठ देवतांची निंदा केली आहे. आठव्यांत व नवव्यांत नामस्मरण, दहाव्यांत विभूतिवर्णन, अकराव्यांत विश्वरूपदर्शन, बाराव्यांत सूत्रधारित्व, तेराव्यांत मायावडंबर, चौदाव्यांत तामसवृत्ति. पंधराव्यांत भक्ति, सोळाव्यांत गुणत्रयवर्णन, सतराव्यांत सुगुणनिर्गुणज्ञान व अठराव्यांत समाप्ति आहे. अठराव्या अध्यायांत उत्तरगीतेचा उल्लेख केला आहे, ( १८—१५ )–तेव्हां, उघडच होतें कीं उत्तरगीता हि ज्ञानेश्वरानें च रचिली.

५ प्राकृत गीतेच्या अध्यायवार ओंव्या एणे प्रमाणें:—

| अध्याय | | ओंव्या |
| --- | --- | --- |
| १ | — | ३८ |
| २ | — | १८ |
| ३ | — | १० |
| ४ | — | ३१ |
| ५ | — | ७ |
| ६ | — | २० |
| ७ | — | २१ |
| ८ | — | २३ |
| ९ | — | २६ |
| १० | — | २४ |
| ११ | — | ३७ |
| १२ | — | २२ |
| १३ | — | १९ |
| १४ | — | १९ |
| १५ | — | २१ |
| १६ | — | १७ |
| १७ | — | २० |
| १८ | — | १८ |
| | | ३७१ |

बालांना मुखानें बोध होण्या करितां केवळ स्वल्प वर्णन ह्या ग्रंथांत केलें आहे, तें ठीकच आहे. ग्रंथ मंडळाच्या संग्रहास ठेविला आहे.

वि. का. राजवाडे

---

## ९९ शक ११२६ तील तीन मराठी ताम्रपट



दादोबा बाबाजी पाटील यांच्या मालकीचे करवीर संस्थानच्या कापशी पोटसंस्थानांतील पीरवाडी गांवच्या उपरिनिर्दिष्ट पाटलाच्या पूजेच्या देव्हाऱ्यांतील हे तीन ताम्रपट आहेत. चिकोडी तालुक्यांतील खडकलाट गांवच्या रा. रा. राघो शिवराम नांवाच्या कुळकर्ण्यानें आंतील मजकूर समजण्याकरितां हे तिन्ही ताम्रपट मंडळाच्या चिटणिसांच्या हवालीं केले.

पहिल्या ताम्रपटाची लांबी दोन इंच व रुंदी दोन इंच आहे. दुसऱ्या ताम्रपटाची लांबी १⅞ इंच व रुंदी १½ इंच आहे. व तिसऱ्या ताम्रपटाची लांबी २⅛ इंच व रुंदी १½ इंच आहे. अक्षर शालिवाहनाच्या बाराव्या शतकांतील मराठी बालबोध आहे. लेखक प्रायः अक्षरावरील मात्रा गाळतो. अक्षरें फार बारीक लिहिलीं असून, य, म, प, च ह्या अक्षरांच्या खुणा बहुतेक सारख्या काढितो, त्यामुळें सकृद्दर्शनीं वाचण्यास जरा जड च जातें तत्रापि एकदां नजर बसली म्हणजे किंचित् अडचण कमी होते. सबंध अडचण कमी होते असें मात्र नाहीं. ज्या शब्दाचा अर्थ कळत नाहीं व जो शब्द अपरिचितसा असतो, तो तो वाचतांना त्यांतील अक्षर प आहे कीं य आहे कीं म आहे कीं च आहे, हें ठरविणें दुर्घट होतें. असा ह्या ताम्रपटांतील अक्षरांचा प्रकार आहे, भाषा शक ११२६तील मराठी आहे; म्हणजे ज्ञानेश्वरी भाषेच्यापूर्वीची शंभर वर्षांची आहे. भाषेचें स्थळ करवीर इलाख्यांतलें च तत्कालीन आहे. प्रत्येक ताम्रपत्राच्या ३२ ओळी आहेत, एका बाजूस सोळा व दुसऱ्या बाजूस सोळा. पहिल्या ताम्रपटावर साहा ओळींचा एक शिक्का आहे.

२ शक ११२६ त पन्हाळगडास शिलाहारवंशीय राजा दुसरा भोज राज्य करीत होता. त्याच्या करितां हे तीन ताम्रपट एका सोनाराकडून—सोनाराचें नांव भोमणा—कोरविलेले आहेत. पहिल्या ताम्रपटांत विभव संवत्सर, श्रावण मास, अनुराधा नक्षत्र, सौम्यवार, असा काल दिला आहे, पक्ष दिला नाहीं. दुसऱ्या व तिसऱ्या ताम्रपटांत विभव संवत्सर, फाल्गुन शुद्ध प्रतिपदा सोमवार, असा काल दिला आहे. ही कालगणना बार्हस्पत्यसंवत्सर मानानें केलेली आहे, असें दिसतें. तें मान घेतलें म्हणजे शक ११२६, विभव संवत्सर, फाल्गुन शुद्ध प्रतिपदा सोमवारीं येते व श्रावण वद्य प्रतिपदा बुधवारीं येते. नक्षत्रें मात्र जुळत नाहींत. त्यासंबंधानें गणित जास्त सूक्ष्मपणें किंवा वर्ष बदलून केलें पाहिजे. तें कांहीं असो, इतकें निश्चित आहे कीं हे तिन्ही ताम्रपट पन्हाळच्या दुसऱ्या भोजराजाच्या अमदानींतील आहेत. दुसऱ्या भोजाच्या मिति शके १११२ पासून शके ११२७ पर्यंत सापडतात. प्रस्तुत तिन्ही लेख सकृद्दर्शनीं शक ११२६ तील आहेतसे दिसतात.

३ ह्या तिन्ही लेखांत सालीवान सक ४१० अशीं अक्षरें आहेत. ह्या अक्षरांचा अर्थ इतका च कीं ही मोजणी शिलाहाराच्या राज्यसंस्थापनेपासूनची आहे. शिलाहार शक असें जेथें म्हणावयाचें तेथें गांवढ्या गांवांतील लेखक शालीवान शक असें म्हणतो इतकें च, वस्तुतः त्याचा आशय शिलाहारशकाचा निर्देश करण्याचा आहे. ह्यावरून एवढें सिद्ध होतें कीं जसा भोसल्यांचा शक, किंवा गुप्तांचा शक किंवा कलचूरींचा शक तसा शिलाहारांचा हि शक होता, ह्या शक सार्वत्रिका

व सर्वमान्य व सर्वदेशीय नव्हता हें तर उघड आहे. कारण शिलाहारवंशीय राजांनीं कधीं साम्राज्य केलेलें नव्हतें. परंतु, आपला शक स्वतःपुरता तरी सुरू करण्याइतकें त्यांचें महत्त्व देशांत खचित होतें. उत्तर व दक्षिण कोंकण आणि कऱ्हाडपासून कोल्हापुरपर्यंतचा टापू त्यांच्या ताब्यांत तीन घराणीं मिळून पांच चारशें वर्षें होता. तेव्हां आपल्या राज्यापुरता त्यांनीं स्वतःहाचा शक चालू केला असावा हें असंभावनीय नाहीं. शक ११२६ त त्यांच्या राज्याला ४१० वर्षें झालीं होतीं म्हणजे शक ७१६ त त्यांच्या शक सुरू झाला, असा इत्यर्थ निष्पन्न होतो. शक ११२६ नंतर कांहीं वर्षांनी भोजाचें राज्य सिंघण यादवानें खालसा केलें.

४ पहिल्या लेखांत भोजराजाकरितां पत्र लिहिलें आहे. त्यांत कोकुदनूरच्य पाटलानें कांहीं मौल्यवान् धातूच्या द्रव्याचा निक्षेप आपल्या गांवांत केल्याचा उल्लेख आहे. हा निक्षेप पाटील, कुळकरणी, शेटे, महाजन यांच्या साक्षीनें व समक्ष केला. पैजापुरचा सतीचदेव, म्हादेव, संतदेवर, महालक्ष्मी, कालीका भोगणी, क्षेत्रफळ, भैरव, असे सर्व देव व कळपाटलाचा कुळस्वामी केदारलिंग, या सर्व देवांची साक्ष घालून नंतर पाटिलकुळकर्ण्यांनीं पत्र, निक्षेपपत्र लिहिलें आहे, निक्षेपपत्र अर्थात्, भोजराजाकरितां लिहिलें आहे.

दुसऱ्या ताम्रपटांत प्रमाजी जाधवानें साडेसतरा मण सोन्याचे सोनटके गांवाच्या दक्षिण टेकावर पुरल्याचा उल्लेख आहे. हे सोनटके म्हणजे सोन्याचे टंक, सुवर्णटंक भोजराजाकरितां प्रमाजीनें पुरले. त्याची पूजा करावी असा निर्देश केला आहे.

तिसऱ्या ताम्रपटांत लाटीया पाटलानें साडेसात मण सोनटके पुरल्याचा उल्लेख आहे.

तात्पर्य, ही तिन्ही हि निक्षेपपत्रें आहेत. तीं भोजराजाकरितां आहेत. सोनटक्यांचा म्हणजे सुवर्णटंक नांवाच्या नाण्याचे साडेसात मण व साडेसतरा मण जमीनींत पुरले. यावरून असें दिसतें कीं भोजराजावरती परचक्रवगैरेचें इतकें थोर संकट आलें असावें कीं पुढें उपयोगी पडावे म्हणून, ह्या विश्वासू पाटलाच्या करवीं त्यानें निक्षेप म्हणजे निधि म्हणजे ठेव जमीनींत पुरून ठेवविली, त्या ठेवींची जागा ध्यानांत रहावी म्हणून जाग्याचा निर्देश केला आहे. व एकानें च त्या ठेवी गडप करूं नये म्हणून विश्वासू व मान्य अशा लोकांच्या व पूज्य देवतांच्या साक्षी व समक्षता घातल्या आहेत. असें हें संकट भोजराजावरती कोणतें आलें होतें त्याचा अंदाज करतां येतो. ह्या च सुमारास सिंघण यादवाच्या किंवा त्याच्या सरदारांच्या स्वाऱ्या भोजराजाच्या प्रांतावर चाल करून येत असाव्या.

त्या दंगलींत भयानें गांगरून जाऊन भोजानें ठेवी पुरून ठेवविण्याची ही खटपट चालविलेली आहे.

५ शिलाहारांची मूळ भाषा मराठी होती, व ठेव पुरणाऱ्या मराठ्यांची भाषा मराठी होती व करवीर इलाख्यांतील कोकदूनूर वगैरे गांवांची भाषा त्याकाली मराठी होती, असें ह्या ताम्रपटांवरून म्हणावें लागतें. तसें च शिलाहारांची ही जर मूळ भाषा होती तर ती त्या वंशाच्या प्रारंभापासून च त्यांची मूळ भाषा असावी म्हणजे शक ७१६ त ती त्यांची मूळ मायाभाषा होती असें हि विधान करण्याकडे प्रवृत्ति होते—आणि ही म्हणजे कांहीं असंभाव्य गोष्ट नव्हे कारण शक ७१६ त मराठी चांगली चालती बोलती भाषा होती.

वि. का. राजवाडे

## ताम्रपट पाहिला

### पोट



१ स्त्री स्वहसत सक

२ स्त्री सालीवान सक

३ वरुस च्यारस ४१०

४ नाम सवछर वीभव मा

५ स सरावण नक्षत्र अन्नु

६ दा दनि सोमवार तदीनी

---

१ स्त्री स्वहस्त सक

२ स्त्री सालीवान सक

३ वरुस च्यारसे ४१०

४ नाम संवछर वीभव मा

५ स्रावण नक्षत्र अन्नु

६ दा दीन सोमवार तदींनी

७ पत्र लीहील नुपवर रा
८ जा भोजराजें–करीता पत्र ली
९ हील वईजापुरु–सीतयानन–सतीचंद्र
१० म्हादेव नाक्ष सतदेवरु नाक्ष म्हाल
११ क्षुमी नाक्ष कालीका भोवानी सा
१२ क्ष क्षत्रपाल भईरव नाक्ष समस्त दे
१३ व नाक्ष कलपाटीलाचा कुलस्वा
१४ मी कदारलींग सतया पाटील
१५ पंचम जगतराव रवल सेटी पाटील
१६ सेटी म्हाजन मवाण दामाजी कु

पाठ

१७ ळकर्णी पंचम सेटी गुरव सतरासी सु
१८ तार लपमणा कुवार भारणमडचा
१९ कामो न्हावी दामो वानी रापातल
२० कोळी भागो समस्त वईसानी प
२१ त्र लीहील पटलांचं सतया पाटील प

---

७ पत्र लीहीलें नुपवर रा
८ जा भोजराज—करीता पत्र ली
९ हीलें वईजापुरुसीतयानन सतीचदेव
१० म्हादेव नाक्ष सतदेवरु साक्ष म्हाल
११ क्षुमी नाक्ष कालीका भोवानी सा
१२ क्ष क्षत्रपाल भइरव नाक्ष समस्त दे
१३ व साक्ष कलपाटीलाचा कुलस्वा
१४ मी केदारलींग सतया पाटील
१५ पंचम जगतराव रवल सटी पाटील
१६ सेटी म्हाजन मवाण दामाजी कु
१७ ळकर्णी पंचम सेटी, गुरव सतरासी, सु
१८ तार लपमणा, कुवार भारणमडचा
१९ कामो, न्हावी दामो, वानी रापातल,
२० कोळी भागो समस्त वईसानी प
२१ त्र लीहीलें पटलाचे सतया पाटील पं

---

१ भोजराजकृते ( समास ) २ पट्टि = सट्टि = सटी ३ श्रेष्ठि = सेट्टी = सेटी
४ गांवाचें नांव असावें. ५ पटल =पडळ

२२ चम जगतराव रव सटा पाटल ह्मण
२३ मु यासी साक्ष केला कोकुर्दनुरीचा[6]
२४ पाटील चक्र[7] तपे[8] मग राव मला गो
२५ डा पाटल हसत पाटलान आपुली[9] षु
२६ तुंडा[10] गावा दक्षण टेका मदी वीस्वरु[11] पा
२७ णीरों[12] नीक्षोपीला आस पाटीला
२८ सतगावा[13] पूवज षीमसत[14] सोनारा
२९ भोमणाच हसतकी पत्र घडवील या
३० सी आसते[15] मानीती त रवरवी पात
३१ क होती चंद्रसुरीया[16] साक्ष धरतरी
३२ साक्ष पाडवा[17] पेमो[17] साक्ष पत्र सपुंर्नु[18]

---

२२ चम जगतराव रव(ल)सेटी पाटल म्हा(ज)ण
२३ मु(ख्य) यासी साक्ष केला कोकुदनुरीचा
२४ पाटील चक्र तपे मग राव मेला गो
२५ डा पाटल हस्त पाटलानें आपुली सु
२६ तुडा गावा दक्षण टेका मदी वीस्वरु पा
२७ णीरा नीक्षोपीला आसे पाटील
२८ सतगावा पूर्वज खीमसत सोनारा
२९ भोमणाचे हस्तकीं पत्र घडवीलें या
३० सी आसते मानीती ते रवरवी पात
३१ क होती चंद्रसूरीया साक्ष धरतरी
३२ साक्ष पांडवा पेमो साक्ष पत्र संपुन्नु

---

६ ग्रामनाम ७ परचक्र ८ तपे = ताप दिला ९ आपुलिये = आपुल्या १० ग्रामनाम ११ देव १२ स्थलाचें नांव, सप्तमी १३ ग्रामनाम १४ अर्थ कळत नाहीं. १५ असत्य १६ द्विवचन १७ देवनाम १८ संपूर्ण

## ताम्रपट दुसरा

---

### पोट

१ श्री स्वहस्त सक ⌣ स्री
२ सालीवाना सक वरु
३ स च्यारस ४१० नाम सं[2]
४ वछर वीभव मास फालगु
५ णु सुद पाडीवा नक्षत्र अस्वी
६ नी सोमवार तदींनी नीक्षों[3]
७ पत्र लीहील[4] न्रुपवर राजा भो
८ जरांजे[5]-करीता नीक्षोपत्र ली
९ हील[6] प्रसराम आग्राचे[7] ल
१० टीर्या[8] वाडा गावा पश्चम ह्मे[9]
११ पासु वाडा तथुंल[10] पाट
१२ ल जादवराव प्रमांजी[11] पट
१३ ल तयांचा[12] पुतण्या लाटीया
१४ पटल जादवरा[13] प्रमानजी[14]
१५ दोग मौळांनी[15] पनळे[16]
१६ सीहासनासी[17] आले[18]

### पाठ

१७ भोजा[19] रायासी[20] भेटल[21] मग रा[22]
१८ यें[23] सनमानु देंवनु[24] बईस

---

१ षष्ठी २ सं ३ निक्षेपपत्र ४ लिहिलें ५ भोजराकृते ( समास. ) ६ लें ७ आम्राचा ८ वाड्याचें नांव, वाडा म्हणजे लहान गांव ९ म्ह चा अर्थ कळत नाहीं, कांहीं अक्षरें गळालीं आहेत. १० तेथील ११ प्रेमाजी १२ तेयाचा=तयाचा=त्याचा १३ जादवरा=जादवराअ जादवराय = जादवराज १४ प्रेमाजी १५ कौ. १६ पन्हाळा १७ सिंहासनास (सिंह या शब्दाचा उच्चार त्या काळीं सींहँ करीत सिंहासन = सींह्यासन. १८ ले १९ द्वि-िया २० द्वितीया २१ समभ्यागतां २२ ले २३ यें २४ देवुनु

१९ वीलें[25] मग दोगानी रायाँ[26]
२० सी[27] वीनवील[28] जी[29] आसु
२१ चैं[30] काय पाटाआर[31] कचैनप[32]
२२ आसी नारोपु[33] देयावा[34] मग
२३ राय[35] नारोपु[36] दीला ग दोग
२४ मीळौनी[37] गावासी ौल म
२५ ग जादेवा[39] प्रमाजी[40] न आपुलेर[41]
२६ वाडेयाच[42] दक्षण माळा वारी[43]
२७ पाणीरा[44] मदी सांड[45] सदरा मण कां
२८ चन सोनटक[48] मातीचेय[49] रांजण[50] घा
२९ लैनु[51] नीक्षोपीलें[52] आस[53] तयाँसी[54]
३० पूजा हवन कराव[55] अदमेण
३१ च पचषाज[57] नव नारेलें[58]
३२ पान—सुपारी दयावी[59]

---

## ताम्रपट तिसरा

### पोट

१ स्री स्वहस्त[1] सक~
२ स्री सालीवान सां
३ क वरुस च्यारस ४१०

---

२५ ले २६ राजानं द्वितीया २७ सं २८ विज्ञापितं संविज्ञापितं, लें २९ आर्य! ३० चें ३१ पट्टार्थक = पाटाआर = ताम्रपट्टाकरितां ३२ कांनचपत्र. ३३ रो ३४ देयावा ३५ यें ३६ रो ३७ लौ ३८ ले ३९ तृतीया ४० नँ = नें ४१ आपुलिये ४२ वाडेयाचिये = वाडेयाच्ये = वाडेयाचे ४३ वरी ४४ स्थळविशेष ४५ सार्धं = साड्ढ = साड ४६ सतरा ४७ कां ४८ के सुवर्णटक = एक सोन्याचे नाणें ४९ मातीचेया ५० रांजणीं ५१ घालुनु ५२ ले ५३ आसत ५४ तेयासी ५५ वें ५६ अर्धमणस्य = अदमणच ५७ पचेसाय = पंचखाज ५८ नारिकेलानि = नारिएलाइँ = नारेलें = नारलें ५९ देयावी १ हस्त २ शकसंबंधी जें तें शाक = साक

४ नाम सँ[३]वछर वीभव
५ मास फालगुणु सु
३ द पाडीवा नक्षत्र आ
७ स्वीनी सोमवार तदी
८ नी नीक्षोपत्र लीही
९ लँ[४] त्रुपवर राजा भोज
१० राजकेरीता[५] नीक्षोपत्र ली
११ हीलँ[६] प्रसराम आग्रस्तल
१२ लाटीया पटलाचा राण जादवा
१३ भानजी पटलाचा बंदु
२४ सीरदवाडाचा पटल जा
१५ दत्र सोमाजी दोग बं[७] भी
१६ ळौनी[८] पनालेया[९] सी
१७ हयासैना[१०]सी आल

## पाठ

१८ राया भोजा रायासी
१९ भेटल मग सनमान दी
२० ला मग दोग बंदु[११] बोली
२१ ले जी म्हणती आमुच का
२२ इ पाटीरत[१२] काचैन[१३]पत्रासी
२३ नीरोपु दें[१४]ण मग रायें[१५] नीपुं[१६] दी
२४ लँ[१७] मग दोर्द[१८] गावासी ऑल[१९]
२५ मग लाटीयेंन्ह[२०] तें[२१] सीरदवा
२६ डयां[२२] आग्नि[२३] माळा वरी टे
२७ का मदी साड सात मण कौं[२४]
२८ चन सोनटंक[२५] राजेंण[२६] घा
२९ लेंनु[२७] नीक्षोपीलें[२८] आंस[२९]

---

३ सं ४ लें ५ राजकृते समास ६ ल ७ धु किंवा दु लिहावयाचा राहिला आहे. ८ ळौ ९ पनालेया १० सींह्यासनासी. ११ बंदु १२ पाटार्थ =पाटारत १३ कांचन १४ देणें १५ यें १६ रो मध्यें काढावयाचा राहिला आहे. १७ ले १८ दोग ग बद्दल द काढिला आहे. १९ ले २० तृतीया २१ ते २२ सीरदवाडेया षष्ठी २३ आग्नेय २४ कांचन २५ सोनटके २६ रांजणीं सप्तमी. २७ घालुनु २८ नीक्षोपीले २९ आसत

वा. इ.–२८

३० तयाँसी[३०] पुजा हवन कर

३१ वें[३१] पचपाँज[३२] आदमण ना

३२ रळ + + पानसुपारी

३३ च कापडा वरी पुजावी

३४ समसता नगरा गावीं

३५ वसावा पुन्हा पुन्हा

३६ आणा आँसें[३३] पुडीलाँ[३४]

## १०० औरंगजेब व त्याचा जुलुस

मोंगल बादशहांचे कारकीर्दींतील दरबारचे कागदपत्रांत, तसेंच सरकारी हुकुमान्वयें काढण्यांत आलेल्या फर्मानांत वगैरे जुलुसी सन उपयोजण्यांत आलेला आढळतो. औरंगजेब बादशहाची कारकीर्द दीर्घकालिक असल्यामुळें, व दक्षिणेशीं व दक्षिणेंतील राज्यव्यवस्थेशीं त्याचे कारकीर्दीचा निकट संबंध येत असल्यामुळें, किंवहुना त्याचा जुलुसी सन नक्की कधीं सुरू झाला एतद्विषयीं प्रचलित इतिहासकारांमध्यें एकवाक्यता नसल्यामुळें, ह्या विषयाची चर्चा करणें अगत्याचें झालें आहे.

'जुलूस' ह्या शब्दाचा मूलार्थ बसणें, अर्थात् सिंहासनारूढ होणें, असा आहे. मोंगल रियासतींत पूर्वींच्या बादशहाचे राजशकाचे महिने किंवहुना वर्षांचीं वर्षें आपले कारकीर्दींत जोडण्याचा औरंगजेबादि बादशहांचा प्रघात असल्याचें आढळून येतें. हेतु हा कीं, आपल्या पाठीमागील बादशहानें राज्यपद विगरहक्कानें हिरावून घेतलें असें आपल्या साम्राज्यांतील प्रजाजनांस भासवावें. ह्या प्रश्नाचा अशा रीतीनें विचार करितां कोणताही बादशहा ज्या विशिष्ट तारखेस सिंहासनारूढ होई, त्याच तारखेस त्याचा जुलुसी सन सुरू होत नसे हें उघड आहे. औरंगजेबाचें पहिलें राज्यारोहण वस्तुतः ता० १ जिल्काद सन १०६८ हिजरी उर्फ ता० २१ जुलै इ. स. १६५८ रोजीं झालें; व दुसरें राज्यारोहण ता० २४ रमजान १०६९ ता० ५ जून इ. स. १६५९ रोजीं मोठ्या थाटानें झालें. वस्तुस्थिति अशी असतां-ही औरंगजेबानें आपला जुलुसी उर्फ राजशक तारीख १ रमजान १०६८, मित्ती ज्येष्ठ शुद्ध २, शके १५८०, ता० २३, मे इ. स. १६५८ रोजीं सुरू झाल्याचें ठरवून, सरकारी कागदपत्र, फर्मान, नाणीं इत्यादि ठिकाणीं ह्या तारखेपासूनच

---

३० तेयासी ३१ वें ३२ पंचसाज ३३ आते ३५ पुढें होणाऱ्या लोकांस

जुलुसी सनाचा आरंभ धरिला. ता० १ रमजान १०६८ ( २३ मे १६५८ ) रोजींच, आपला भाऊ दारा ह्याशीं लढाई देण्याकरितां औरंगजेब चंबळपार झाला, व ह्या गोष्टीचे संस्मरणार्थ त्यानें आपला राजशक ह्या तारखेपासून धरिला. दुसरा व थाटाचा राज्यारोहणाविधि वर उल्लेखिल्याप्रमाणें १०६९ चे रमजान महिन्यांत साजरा करण्यांत आल्यामुळें ता० १ रमजान, १०६८ पासून राजशक धरण्यांत औरंगजेबाचा शहाणपणा व्यक्त होतो. राज्यारोहण व जन्मदिन ह्यांचे वाढदिवस मर्जीस मानेल त्या दिवशीं पार पाडण्यासंबंधीचे हुकूम आधुनिक संस्कृतींत मुरलेल्या इंग्रेजशाहींतही फर्माविण्यांत येतात, ही गोष्ट सर्वांस माहीतच आहे. औरंगजेबाचा जुलुसी सन नक्की कधीं सुरू झाला ह्याविषयींची प्रमाणभूत माहिती नसल्यामुळें, लेनपूल व त्याचे आधारावर भिस्त ठेवणारे रा. गोविंद सखाराम सरदेसाई हे ह्या बाबतींत चुकले आहेत. अस्तु.

औरंगजेबाचा मृत्युकाला कोणता, ह्या बाबीची चर्चा रा. राजवाडे यांनीं शकावलींतील टीपेंत ( पृ. ५ वर ) केलेली आहे. ह्या बाबतींत मराठी महिना व जुलुसी सनाचा आंकडा देतांना, रा० राजवाड्यांची नजरचूक झाली असल्याबद्दल 'मंडळा' चे सभासद रा० द. वि. आपटे, फोंडा-गोंवा यांनीं आपल्या एका निबंधांत दाखविण्याचा यत्न केला आहे. टीपेंतील औरंगजेबाच्या मृत्यूच्या स्थळाशिवाय आणखी दोन स्थळांचा उल्लेख रा. आपटे यांनीं प्रथमतः आपल्या निबंधांत केला आहे. धडफळ्यांच्या याद्या, व इतर कांहीं ठिकाणीं ह्या ठिकाणींही माघ महिनाच दिलेला आहे. गणित करून पाहतां, छ २८ जिल्काद हिजरी १११८ स, माघ बहुल अमावास्या शके १६२८, ता. २० फेब्रुवारी सन १७०७ ( ग्रांट डफ चुकीनें २१ फेब्रुवारी म्हणतो ! ) ही तारीख येते, व तीच युक्त आहे. औरंगजेबाचे मृत्युसमयीं ५१ जुलुसी येतो, हें उघड आहे. औरंगजेबाच्या जुलुसी सनाच्या प्रारंभाचे दिवस दिल्यास इतिहास-संशोधकांस सोयीचें होईल अशी सूचना आमच्या एका इतिहासप्रिय मित्रानें केली. असा एक तक्ता रा. द. वि. आपटे यांनीं परिश्रमपूर्वक तयार करून आपल्या निबंधास जोडिला होता. तोच ह्या प्रसंगीं येथें सादर केल्यास श्रम वांचतील अशा बुद्धीनें रा. आपटे यांच्या ह्या उपकृतीबद्दल मनः पूर्वक आभार मानून, तो येथें देतों.



## औरंगजेबाच्या जुलूसी ( राज्यारोहणाचा ) सनाच्या प्रारंभाचे दिवस

| जुलूस | हिजरी सन | शालिवाहन शक | इसवी सन |
|---|---|---|---|
| १ | १ रमजान १०६८ | २ ज्येष्ठ १५८० | २३ मे १६५८ |
| २ | १ ,, ,, १०६९ | २ ,, १५८१ | १३ ,, १६५९ |
| ३ | १ ,, ,, १०७० | २ अधिक ज्येष्ठ १५८२ | १ ,, १६६० |
| ४ | १ ,, ,, १०७१ | २ वैशाख १५८३ | २० एप्रिल १६६१ |
| ५ | १ ,, ,, १०७२ | २ ,, १५८४ | १० ,, १६६२ |
| ६ | १ ,, ,, १०७३ | २ चैत्र १५८५ | ३० मार्च १६६३ |
| ७ | १ ,, ,, १०७४ | २ ,, १५८६ | १९ ,, १६६४ |
| ८ | १ ,, ,, १०७५ | २ ,, १५८७ | ८ ,, १६६५ |
| ९ | १ ,, ,, १०७६ | २ फाल्गुन १५८७ | २५ फेब्रुवारी १६६६ |
| १० | १ ,, ,, १०७७ | २ ,, १५८८ | १५ ,, १६६७ |
| ११ | १ ,, ,, १०७८ | २ ,, १५८९ | ४ ,, १६६८ |
| १२ | १ ,, ,, १०७९ | २ माघ १५९० | २३ जानेवारी १६६९ |
| १३ | १ ,, ,, १०८० | २ ,, १५९१ | १३ ,, १६७० |
| १४ | १ ,, ,, १०८१ | २ ,, १५९२ | २ ,, १६७१ |
| १५ | १ ,, ,, १०८२ | २ पौष १५९३ | २२ डिसेंबर १६७१ |
| १६ | १ ,, ,, १०८३ | २ ,, १५९४ | ११ ,, १६७२ |
| १७ | १ ,, ,, १०८४ | २ मार्गशीर्ष १५९५ | ३० नोव्हेंबर १६७३ |

## औरंगजेबाच्या जुलूसी ( राज्यारोहणाचा ) सनाच्या प्रारंभाचे दिवस

| जुलूस | हिजरी सन | | | शालिवाहन शके | | | इसवी सन | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८ | १ | रमजान | १०८५ | २ | मार्गशीर्ष | १५९६ | १९ | नोवेंबर | १६७४ |
| १९ | १ | ,, ,, | १०८६ | २ | ,, | १५९७ | ९ | ,, | १६७५ |
| २० | १ | ,, ,, | १०८७ | २ | कार्तिक | १५९८ | २८ | आक्टोबर | १६७६ |
| २१ | १ | ,, ,, | १०८८ | २ | ,, | १५९९ | १८ | ,, | १६७७ |
| २२ | १ | ,, ,, | १०८९ | २ | ,, | १६०० | ७ | ,, | १६७८ |
| २३ | १ | ,, ,, | १०९० | २ | आश्विन | १६०१ | २६ | सपटंबर | १६७९ |
| २४ | १ | ,, ,, | १०९१ | २ | ,, | १६०२ | १५ | ,, | १६८० |
| २५ | १ | ,, , | १०९२ | २ | ,, | १६०३ | ४ | ,, | १६८१ |
| २६ | १ | ,, ,, | १०९३ | २ | भाद्रपद | १६०४ | २४ | ऑगष्ट | १६८२ |
| २७ | १ | ,, ,, | १०९४ | २ | ,, | १६०५ | १४ | ,, | १६८३ |
| २८ | १ | ,, ,, | १०९५ | २ | श्रावण | १६०६ | २ | ,, | १६८४ |
| २९ | १ | ,, ,, | १०९६ | २ | ,, | १६०७ | २२ | जुलै | १६८५ |
| ३० | १ | ,, ,, | १०९७ | २ | ,, | १६०८ | १२ | ,, | १६८६ |
| ३१ | १ | ,, ,, | १०९८ | २ | आषाढ | १६०९ | १ | ,, | १६८७ |
| ३२ | १ | ,, ,, | १०९९ | २ | ,, | १६१० | २० | जून | १६८८ |
| ३३ | १ | ,, ,, | ११०० | २ | ,, | १६११ | ९ | ,, | १६८९ |
| ३४ | १ | ,, ,, | ११०१ | २ | ज्येष्ठ | १६१२ | २९ | मे | १६९० |
| ३५ | १ | ,, ,, | ११०२ | २ | ,, | १६१३ | १९ | ,, | १६९१ |

# औरंगजेबाच्या जुलूसी ( राज्यारोहणाचा ) सनाच्या प्रारंभाचे दिवस

| जुलूस | हिजरी सन | शालिवाहन शके | इसवी सन |
|---|---|---|---|
| ३६ | १ रमजान ११०३ | २ ज्येष्ठ १६१४ | ७ मे १६९२ |
| ३७ | १ ,, ,, ११०४ | २ वैशाख १६१५ | २६ एप्रि १६९३ |
| ३८ | १ ,, ,, ११०५ | २ ,, १६१६ | १६ ,, १६९४ |
| ३९ | १ ,, ,, ११०६ | २ ,, १६१७ | ५ ,, १६९५ |
| ४० | १ ,, ,, ११०७ | २ चैत्र १६१८ | २५ मार्च १६९६ |
| ४१ | १ ,, ,, ११०८ | २ ,, १६१९ | १४ ,, १६९७ |
| ४२ | १ ,, ,, ११०९ | २ ,, १६२० | ३ ,, १६९८ |
| ४३ | १ ,, ,, १११० | २ फाल्गुन १६२० | २१ फेब्रुवारी १६९९ |
| ४४ | १ ,, ,, ११११ | २ ,, १६२१ | १० ,, १७०० |
| ४५ | १ ,, ,, १११२ | २ माघ १६२२ | २९ जानेवारी १७०१ |
| ४६ | १ ,, ,, १११३ | २ ,, १६२३ | १९ ,, १७०२ |
| ४७ | १ ,, ,, १११४ | २ ,, १६२४ | ८ ,, १७०३ |
| ४८ | १ ,, ,, १११५ | २ पौष १६२५ | २८ डिसेंबर १७०३ |
| ४९ | १ ,, ,, १११६ | २ ,, १६२६ | १७ ,, १७०४ |
| ५० | १ ,, ,, १११७ | २ ,, १६२७ | ६ ,, १७०५ |
| ५१ | १ ,, ,, १११८ | २ मार्गशीर्ष १६२८ | २६ नोवेंबर १७०६ |
| ५१ | २८ जिलकाद १११८ | ३० माघ १६२८ | २० फेब्रुवारी १७०७ |
| मृत्यु | | | |

हा तक्ता हाताशीं असल्यास, औरंगजेबाच्या कारकीर्दीतील ऐतिहासिक कागदपत्रांचा कालनिर्णय थोड्या श्रमांत समाधानकारक रीतीनें करितां येईल.

हा विषय संपविण्यापूर्वी ज़ुलियन पद्धत ( old style ) व ग्रेगोरियन पद्धत ( New style ) ह्या दोन पद्धतींचा निर्देश करणें जरूर आहे. इ. स. १५८२ सालीं १३ वा पोप ग्रेगरी यानें ख्रिस्ती पंचांगांत सुधारणा केली, व सर्व युरोपांत असें जाहीर केलें कीं, त्या सालच्या ४ थ्या आक्टोबरानंतर ५ व्या अक्टोबरास १५ आक्टोबर म्हणावें. इंग्लंडांत मात्र सन १७५२ पर्यंत ही नूतन पद्धत अमलांत आली नव्हती. इ. स. १७५२ मध्यें पार्लमेंट सभेंत हा कायदा पसार होऊन, ३ सप्टेंबरास १४ म्हणावयाचें ठरलें व नवी ग्रेगोरियन पद्धत सुरू झाली. प्रश्न असा आहे कीं, ता० ३ सप्टेंबर सन १७५२ पूर्वींची कोणतीही तारीख काढावयाची असतां कोणत्या पद्धतीचें अवलंबन करावयाचें ? ह्या बाबतींत एक पद्धत उपयोजण्यांत न आल्यामुळें मुसलमानी तारखांवरून व मराठी मित्यांवरून इंग्रजी तारखा ठरवितांना घोंटाळा उडण्याचा भारी संभव असतो. जुनी ज़ुलियन पद्धत व नवी ग्रेगोरिन पद्धत यांमधील फरकाचें ‘ स्वारस्य ’ न कळल्यामुळें इतिहाससंग्रहकार रा० ब० पारसनीस यांचा, इ. सं. पु० ३ रें, अंक ५, डिसेंबर १९१०, ऐतिहासिक स्फुट लेख १७ मध्यें ख्रिस्तवासी आयर्व्हिन यांनीं दिलेले औरंगजेबाचे कारकीर्दीचे राजशक ‘इतिहास—संशोधकां’ करितां उतरून देतांना असाच घोंटाळा झाला आहे ! ख्रिस्तवासी आयर्व्हिन यांनीं ग्रेगोरिन पद्धत योजिल्यामुळें, मुसलमानी तारखांवरून ता. ३ सप्टेंबर १७५२ चे पूर्वींच्या त्यानीं काढिलेल्या कोणत्याही तारखांत व प्रिन्सेप, सिवेल आणि दीक्षित, पिले, मोडक इत्यादि ग्रंथकारानीं काढलेल्या अगर त्यांच्या जंत्र्यांवरून काढण्यांत येणाऱ्या तारखांत १२ दिवसांचें अंतर पडणार, व तारखा काढतांना एक पद्धत न ठेविल्यामुळें, विनाकारण घोंटाळा उडणार ! इतिहासरचनेंत तारखांचेंही एक प्रकारें वैशिष्ट्य असल्यामुळें, होतां होईल तों बिनचूक तारखा देणें व आंग्ल ग्रंथकारांनीं काढिलेल्या तारखा तशाच उतरून देतांना आपल्या वाचकांचा विनाकारण घोंटाळा उडणार नाहीं, अशी सक्त खबरदारी घेणें हें इतिहासकारांचें व संशोधकांचें आद्य कर्तव्य होय.

पां. न. पटवर्धन

त्यावर रेघा ओढीत. अशा करतां कीं हें रेघाचिन्हित स्थान अतिथीकरितां आहे, हें समजावें. अतिथीला ह्या रेघा काढिलेल्या पाटावर येऊन बसण्याचें व जेवण्याचें च तेवढें काम उरे. अर्थात्, कांहीं श्रम न करितां अन्न मिळे, त्यावरून श्रमाविणें अन्न खाणाऱ्या आळशाला ऐत्या पिठावर रेघा ओढणारा हें विशेषण लावीत. धान्याच्या पिठाशीं वगैरे ह्या वाक्यांत कांहीं एक संबंध नाहीं.

## ( १५ ) आकार

वणिक्पशुपालकर्षकादिभ्यो राजग्राह्यो भागः करः । स एव कारः । कर म्हणजे च कार.

शेतकऱ्याला जमीनीचा आकार चार रुपये पडतो. या वाक्यांत वस्तुतः कार हा शब्द आहे. उच्चारसौकर्यार्थ आ लावून कार या शब्दाचा आकार असा उच्चार मराठींत झाला आहे.

आकार म्हणजे कर ( Tax,rent )

कारनाम्नि च प्राचां हलादौ (६-३-१० ) ह्या पाणिनिसूत्रांत कार शब्द सरकार देणें या अर्थी योजिलेला आहे. ह्या पाणिनीय कार शब्दापासून च आकार Tax हा मराठी शब्द निघाला आहे.

## ( १६ ) आगें मागें

अग्रे माग्रे = आगें मागें

## ( १७ )आडत

आट्टपात्य ( अट्टपति = बाजारचा मुकद्दम ) = आडआती = आडती= आडत. आडत म्हणजे बाजारच्या मुख्याला व्यवहारार्थ द्यावें लागणारें द्रव्य

## (१८) आदित्य ( विक्रमाजित, विकर्मजी )

विक्रमादित्य = विक्रमाजित = बिकर्मजी द = ज त्य = त

शंकरादित्य = शंकराजित = शंकराजी, शंकरोजी. वामनादित्य = वामनाजी, वामनजी,वामनोजी. विश्वनाथादित्य = विस ( एकशेष ) आजी = विसाजी, विसोजी

शिवादित्य = शिवाजी, शिउजी

कृष्णादित्य = कन्हु ( कन्ह चें ममतादर्शक )+जी = कान्होजी

मानादित्य = मानाजी, मानोजी

बालादित्य = बालाजी, बाळाजी, बाळोजी

विष्णवादित्य = विठ्ठाजी, विष्णयाजी

रामादित्य = रामाजी, रामोजी

लक्ष्मणादित्य = लखाजी, लखजी,लुकजी लखुजी

व्याघ्रादित्य = वाघोजी, वाघूजी

शंभ्वादित्य = संभाजी, संभूजी

राजादित्य = राजाजी, राउजी

परशुरामादित्य = परस ( एकशेष )+जी = परसाजी, परसोजी

अर्जुनादित्य = अर्जोजी

भीमादित्य = भिउजी, भिमाजी, भिमोजी

युद्धिष्ठिरादित्य = जोध ( एकशेष ) जी = जोधाजी

भगादित्य = बगाजी, बगोजी

नागादित्य = नागोजी, नागाजी

रघुनाथादित्य = रघोजी, रघुजी, रघाजी

सूर्यादित्य = सूर्याजी

धनादित्य = धनाजी

यंशआदित्य = एसाजी

तात्पर्य, हा जी, आजी, प्रत्यय आदित्य या संस्कृत शब्दापासून निघाला आहे.

( २० ) आनाठाईं

अन्यास्मिन् स्थाम्नि = आना(सप्तमी) ठाईं ( सप्तमी )

( २१ ) आडखळणें

अंतःस्खलनं = आँडखळणें = आडखळणें. ह्या खळण्याचा (स्कंदनं=खळणें)-शीं संबंध नाहीं.

( २२ ) आदोगर

आदावग्रे = आदोगर

आदौ म्हणजे अग्रे. पहिल्याप्रथम

आदावग्रे हे शब्द संस्कृतांत जोड योजतात.

( २३ ) आडमूठ

अनेडमूक = अडमूठ (क स्थाने ड) मूळ अनेडमूक म्हणजे बहिरा असून मुका तो. नंतर अडाणी असा अर्थ पडला.

( २४ ) आंडकाढणें

अंडकर्षण = आंड काढणें ( खडवणें )

( २५ ) आंडिल ( बैल )

अंडीर = आंडील, आंडिल

( २६ ) आंतकुडा

अंतःकुटिल = आंतकुडा

( २७ ) आंधळी कोशिंबीर ( खेळ )

आंधिका ( खेळ ) = ( स्वार्थे ल ) आंधळी कोशिंबीर

( २८ ) आंबोळी

आम्लबोलिका=आमबोळी=आंबोळी

( २९ ) आहाच ( ज्ञानेश्वरी )

आहत्य ( कदाचित् ) = आहच = आहाच ( जैनमहाराष्ट्री )

( ३० ) इजर ( एका प्रकारचा वेत )

इज्जर = इज्जर = इजर

( ३१ ) इटेघर

यष्टिगृह = इट्टिघर = इटेघर

सह्याद्रीच्या खोऱ्यांतील एका गावाचें नांव. यष्टिगृह हें संस्कृतांत गांवाचें नांव आहे.

( ३२ ) इतक ( का-की-कें )

इयत्तक ( वैदिक ) = इतक ( का-की-कें )

( ३३ ) इसाड ( नांगराचा दांडा )

ईशा ( नांगराचा दांडा ) = इसा+आड = इसाड

( ३४ ) उकळणें

अवक्षल्=ओखळ=उखळ=उकळणें

अवक्षल् म्हणजे वडवून धुणें.

( २५ ) उघड

उद्गाढं = उग्घाड = उघड.

उद्गाढमूर्खः = उघडमूर्ख उद्गाढ म्हणजे अतिशय, उघडमूर्ख म्हणजे अतिशय मूर्ख

( ३६ ) उजवणें.

उपयमनं = उअजवणँ = उजवणें

आमच्या दोन मुली उजवल्या म्हणजे दोन मुलींचीं लग्नें झालीं.

( ३७ ) उडवणें

उर्वणं = उडवणें

उर्व ( हिंसायां )

त्याला उडवा, त्याचें डोकें उडवा म्हणजे त्याचा नाश करा. उड्डी धातू-पासून निघालेल्या णिजर्थक उडवणें म्हणजे वरती उड्डाण करवणें ह्या धातू-

हून हा हिंसार्थक उडवणें हा धातू निराळा हा उडवणें ( हिंसार्थक ) णिजर्थक मूळांत नाहीं.

( ३८ ) उपड ( डा–डी–डें )

उपावृत्त = उपावट्टु = उपाड= उपड ( डा–डी–डें )

( ३९ ) उपळसरी ( वनस्पतिविशेष )

उत्पलसारिवा = उपळसरी

( ४० ) उभ्या पिकाची जमीन

यद् एकस्मिन् संवत्सरे द्विः फलति तद् उभयतः सस्यं क्षेत्रं । ( आश्वलायनगृह्यसूत्र – गार्ग्यनारायणीयवृति–१–५–६ ) उभ्या पिकाची जमीन म्हणजे ज्या जमीनींत वर्षांतून दोनदा पीक येतें.

( ४१ ) ऐटा

अट्टा ( उद्दाम वर्तन ) = ऐटा

ऐटा

अट्टा Overbearing Conduct = एटा मोनियर वुइल्यम अट्टा या शब्दाचा अर्थ Overbearing conduct असा प्रश्नचिन्ह करून भीत-भीत च देतो. परंतु, तसा त्याचा अर्थ आहे, हें मराठी अर्थावरून स्पष्ट आहे.

( ४२ ) अंडू

अंतर्भू ( to be in ) = अंडू

हा त्याचा अंडू आहे म्हणजे त्याच्यांत समावणारा आहे. अंडू म्हणज आंडगडी खेळांतला

( ४३ ) अंतरा ( सतारीचा )

अंतरालः = अंतरा ( ललोप )

( ४४ ) अंत्या ( विशेषनाम )

अनन्त = अंत्या ( एकशेष )

( ४५ ) अस्तमान ( संध्याकाळ )

अस्तमयन = अस्तमअन=अस्तमान

( ४६ ) अस्ताव्यस्त

अस्तव्यस्त = अस्ताव्यस्त स्त चा स्ता उच्चारसुखार्थ

( ४७ ) अळंकारणें

अलंकृ = अळंकार ( णें )

( ४८ ) कडक

कर्कर ( hard) = कडक (श्लेष)

( ४९ ) कणगा

( कनकस्य अयं ) कानकः = काणगा, कणगा, कणगा म्हणजे सुवर्णाची ठेव, कुणगा असा हि उच्चार आहे.

( ५० ) कप्पा

कल्पः = कप्पः = कप्पा

( ५१ ) करडा–डी–डें

कद्रु ( tawny ) = कडरु = करुड करड ( डा–डी–डे ) करडा घोडा म्हणजे कद्रु रंगाचा घोडा.

( ५२ ) करडुवा ( पक्षिविशेष )

कारंडव = करडुवा

( ५३ ) कळवी ( शाकविशेष)

कलंबी = कळंबी = कळवी ( अनुस्वारलोप )

( ५४ ) कानकीट

कर्णकिट्ट = कानकीट (कानांतला मळ)

( ५५ ) कानटाळ

कर्णताळ = कण्णटाल = कानटाळ

( ५६ ) कानड ( डा–डी–डें )

कर्णकटु = कण्णअडु = काणाडु = कानाड=कानड (डा–डी–डें )

कानडें म्हणजे कर्णकटु

( ५७ ) कानपुडी, कानपुड

कर्णपुट–टी = कानपुड = कानपुड–डी

( ५८ ) काफर ( लुचा, चोर )

खर्पर ( लुच्चा ) = खापर = काफर

( ५९ ) कामकरी

कर्मकर = कामकरी

( ६० ) कामगार

कर्मकार = कामगार

( ६१ ) कामसू

कर्मशूर = कामसूअ = कामसू

( ६२ ) कारटा

( संस्कृत ) करटः म्हणजे अकराव्या दिवसाचें भोजन. त्या भोजनाला जाणारा जो तो कारटा.

( ६३ ) काल

कल्ये = काल ( आजच्या पाठीमागील दिवशीं )

( ६४ ) कुत्रा, कुत्री, कुत्रें

संस्कृतांत कुक्कुरः ( रः, री, रें ) असा शब्द उपलब्ध आहे. त्यापासून कुकरा, कुका असा अपभ्रंश मराठींत व्हावा. परंतु, कुत्रा असा अपभ्रंश मराठींत रूढ आहे. हिंदींत कुत्ता असा अपभ्रंश आहे.ह्या वरून एक च अनुमान करावें लागतें. तें हें कीं संस्कृतसमकालीन प्रांतिक संस्कृतसम भाषांत कुत्तुरः किंवा कुत्तरः असा शब्द रूढ असावा. बहुशः संस्कृतांत च कुत्तरः असा शब्द असावा. कुत्र्यांचीं पिलें कु कु असा शब्द करतात त्यावरून त्यांना हाका मारितांनां कु कु अशी हाक आपण मराठे मारतों. ही कु कु हाक मराठ्यांनी अलीकडे नव्यानेंच उत्पन्न केली व प्रचारांत आणिली असें म्हणण्यास कांहींच पुरावा नाहीं. ही हाक आपण महाराष्ट्रींतून व महाराष्ट्रीनें संस्कृतांतून वंशपरंपरेनें घेतली असली पाहिजे, हें निश्चित आहे. कां कीं कुक्कुर शब्दांत हि पहिला अवयव कु आहे व दुसरा अवयव हि कु च आहे. हा कुक्कुर शब्द संस्कृतांत हि अपभ्रंश च आहे. मुळांत हा शब्द कुकुकरः असा होता. त्याचा संक्षिप्त उच्चार कुकरः असा संस्कृतांत रूढ झाला इतकें च. वैदिक पूर्वभाषेंत हा कुकुकरः शब्द असावा व त्या पूर्वीच्या भाषेंत नुसत्या कु ह्या शब्दानें च श्वन् या अर्थाचा बोध होत असावा. तो कु शब्द प्रांतिक संस्कृत भाषांत राहिला. ज्याप्रमाणें अश्वपासून अश्वतर गु पासून गुतर ( गुरूं ), महिष पासून महिषतर ( म्हसरूं ) हे शब्द न्हस्वत्वदर्शक होतात, त्या प्रमाणें च कु शब्दापासून न्हस्वत्वदर्शक शब्द कुतर हा होतो. त्या कुतरः ह्या प्रांतिक संस्कृत शब्दापासून मराठी कुतरा, कुत्रा हा शब्द निष्पन्न होतो कुत्र, कुतर हें मूळ रूप– त्याचीं तिन्हीं लिंगीं कुत्रा, कुत्री, कुत्रें अशीं मराठींत रूपें होतात व प्रांतिक संस्कृतांत कुतर कुतरी, कुतरं अशीं रूपें होत. कोशांत कुतर, कुत्र असा अकारान्त शब्द दिला पाहिजे व त्याचीं तिन्हीं लिंगीं कुत्रा, कुत्री, कुत्रें अशीं रूपें होतात.असें दर्शविलें पाहिजे.

( ६५ ) कुपी

कूपी ( a bottle) = कुपी

( ६६ ) कुरकुली ( लहानगी फुलांची टोपली )

कर्करी = करकली = कुरकुली

संस्कृतांत कर्करी म्हणजे गेंवळी

गेंवळीसारखें वेळूंच्या पट्यांचें चनविलेलें जें पात्र तें कुरकुली

( ६७ ) कुसळ करणें

कुशलीकरणं नाम वपनं ।

( आश्वलायन गृह्यसूत्र -१-१७-१६ )

कुसळें काढणें, उपटणें म्हणजे हजामत करणें, केंस उपटणें.

तूं माझें काय कुसळ करतोहेस ! म्हणजे तूं माझी काय हजामत करतोहेस !

( ६८ ) कुहू

कुहू ( कोकिळ ) कुहू

( ६९ ) केरसुणी ( अपशब्द व्यभिचारिणी स्त्री )

कर्षणि = करसुणा = केरसुणी

( ७० ) कोकणें

( कू = आवाज करणें ) कोकूय ( क्रियासमभिहारे ) = कोकणें

कोकणें म्हणजे फार वेळ आवाज करणें.

( ७१ ) कोंकलणें

( कल ) चा कल्यते=कोकलणें

(७२) कोंदी–धी

कुसंधि=कुहंधि=कोंधी, कोंदी

सांदीकोंदींत बसूं नको म्हणजे भिंतींच्या सांधींत किंवा कुसंधींत बसूं नको. कोंदी म्हणजे वाईट संधि, सांदी.

(७३) कंडरा

कंधरा=कंडरा ( गळ्याचा दोर )

७४ खचित् ( अव्यय )

खलुचित=खलूचित्=खचित् (खरोखर)

(७५) खटपट

खाट् कृत्य प्याट् कृत्य किंवा पाट् कृत्य ह्या शब्दांत खाट् व पाट् हे अव्ययशब्द आहेत. ह्या पासून खाटपाट= खटपट हा मराठी शब्द निघाला आहे.

(७६) खडखडून

खटखटायित्वा=खडखडून

खटखटाय म्हणजे शब्द करून उठणें खडखडून जागें होणें म्हणजे शब्द करून व उठून जागें होणें.

(७७) खरूज (मूर्ख माणूस, द्वाड माणूस, अनिष्ट माणूस )

खरु (द्वाड माणूस, मूर्ख)+ज=खरूज

हा खरूज कोठून आणलीस ! म्हणजे हा मूर्ख किंवा द्वाड माणूस कोठून आणलास ?

(७८) खळणें,

स्कंदनं=खडणँ=खळणें, वीर्यं स्कन्नं= वीर्य खळलें घोटकः स्कन्नः=घोडा खळला

(७९) खाई

खादिका=खाई

(८०) खाऊ ( विशेषण, खादाड, लुच्चा )

खादुक= खाऊ

( ८१ ) खाकरणें

खात्कृ = खाकर ( णें )

( ८२ ) खाटिक

खट्टिक = खाटिक

( ८३ ) खाडा, खड्डा

खातः ( खणलेला चर ) = खाडा, खड्डा

( ८४ ) खाणें (दुःख देणें, पीडा करणें)

खै – खायति = खातें

खानं = खाणें

( ८५ ) खिळखिळा करणें

खिलीरु (पौनःपुन्य) = खिळखिळा करणें

( ८६ ) खुनशी

कुहनशील=खुनशी. कुहन म्हणजे मत्सरी. फारसी शब्दाशीं संबंध नाहीं. खुनी शब्द निराळा

( ८७ ) खोळ

खल्ल = खोळ

( ८८ ) खंत

क्षांति = खंति = खंत

( ८९ ) गळणें ( म्लान होणें )

ग्लै = गळ ( णें )

( ९० ) गळूं

( वैदिक ) ग्लौ = गळौ = गळूं

( ९१ ) गागजणें

( गद् ) गागद्यते = गागजणें

( ९२ ) गागोडें

गर्गपद्रं = गागोडें

( ९३ ) गायतोंडे

गोतुंडाः = गायतोंडे ( गोत्रनाम )

( ९४ ) गार

कर्करः– री (एक प्रकारचा दगड)= गअर = गार

(९५) गावँढ ( ढा–ढी–ढें )

ग्रामड ( ग्रामषंड ) = गावँढ

ग्रामड असा शब्द पाणिनीयांत आहे.

( ९६ ) गुळपीठ

गुडपीष्ट = गुळपीठ

( ९७ ) गोठणें

गोष्ट् ( संघाते ) = गोठते

पानीयं गोष्टते = पाणी गोठतें.

( ९८ ) गोमा

गोतमः = गोयमा = गोमा ( विशेषनाम )

( ९९ ) गोंगावणें, गंगावण

( पौनः पुन्य ) जोडूयते = गोंगावतो. डू नादे

( १०० ) गंध

गंध या शब्दाचा मराठींत लेशमात्र असा एक अर्थ प्रसिद्ध आहे. तो च अर्थ पाणिनीच्या कालीं हि होता. तत्संबंधानें पाणिनीनें अल्पाख्यायाम् ( ५—४—१३६ ) असें सूत्र रचिलें सूपगंधि भोजनं, घृतगंधि भोजनं, घृताचा लेशमात्र ज्यांत आहे तें भोजन.

गंधो गंधक आमोदे लेशे संबंधगर्वयो रिति विश्वः। पैकीं आमोद, लेश, संबंध हे तीन अर्थ मराठींत प्रचलित आहेत.

( १०१ ) घरघर

हृद्ग्रह = घरघर

हृद्ग्रह म्हणजे हृदयाचा प्रतिष्टंभ मुमूर्षूच्या हृदयाच्या जो प्रतिष्टंभ होतो त्याला घरघर म्हणतात लक्षणेनें अवष्टंभानंतर होणाऱ्या आवाजाला हि घरघर म्हणतात.

(१०२) घरांत

गृह=घर गृहशब्दो भार्यायां वर्तते ( आश्वलायनगृह्यसूत्र–गार्ग्यनारायणीयवृत्ति, १—१—१ ) घरांत काय बोलली म्हणजे भार्या काय बोलली. घरांत बरें वाटत नाहीं. म्हणजे भार्येला इ.इ.इ. घरांत काय म्हटलें म्हण जे भार्येनें इ इ.इ. तात्पर्य, घरांत हा शब्द अव्यय आहे.

(१०३) घसरणी

घर्षणी=घसरणी

(१०४) घाण

घ्राण=घाण घ्रा म्हणजे वास घेणें (नाक) घ्राण म्हणजे वास घेणें घाण या शब्दाचा भावार्थ वास, मराठीत वाईट वास या अर्थी रूढ

(१०५) घायपात

कुमारीपत्रक=घाअपात = घायपात ह्याच्या दोऱ्या करितात.

(१०६) घारगा (खाद्य)

घारिकः (भाजून तळलेलें एक खाद्य (पक्वान्न)) =घारिगा=घारगा (पंचतंत्र)

(१०७) घोटणें

(उगाळून बारीक करणें)

घुट् = घोटणें. औषध घोटणें

घोटणें (बोलणें)

घुट् (घुट्) = घोटणें तें च तें घोटणें म्हणजे तें च तें बोलल्यानें त्रास देणें सांगत बसणें.

(१०८) चकली

शष्कुलि = चक्कुलि = चकुली = चकली (एका प्रकारचें पक्वान्न)

(१०९) चकाटणें

(कथ्) चाकथ्यते=चाकटणें, चकाटणें

(११०) चघळणें

(गृ) जीगीर्यते = जिगिळणें = चिघिळणें = चघळणें

(१११) चट!

चटु (स्तुति) = चट

(११२) चटपट

चाटुपटु = चटपट

(११३) चटका

चटका, (तिखट मिरें, मिरची)= चटका. चटका, तिखट म्हणजे मिऱ्याचें किंवा मिरच्यांचें तिखट

(११४) चटणी

चट् (फोडणें) पासून चटनं, चटणी = चटणी, चटणी म्हणजे कोणता हि पदार्थ फोडून बारीक केलेलें तिखट मिठाचा पदार्थ

(११५) चमकणें

(क्रम्) चंक्रम्यते=चक्रमणें, चमकणें म्हणजे वारंवार येणें.

(११६) चवढाळ

समर्द्धक=चवड्ड्अ=चवढ + (स्वार्थे आल०)=चवढाळ. समर्द्धक म्हणजे वरद कर्त्ता. चवढाळ म्हणजे निंद्य कर्ता

(११७) चवाठा

चतुष्पथः=चउअठा=चवाठा

(११८) चळोकापळो करणें

चलीकल्प्य = चळोकापळो क्लृप्चें पौनःपुन्यदर्शक रूप चलीकल्प्य–त्या पासून मराठी चळोका पळो–क्लृप् म्हणजे कल्पना करणें. चलीकल्प्य किंवा चल्कल्प्य म्हणजे नाना संकल्पविकल्प प्रकर्षानें करणें. चलीकल्प्य पासून नाम चलीकल्पनं–चलीकल्पनं करोति=चळोकापळो करतो–चळणें आणि पळणें या क्रियापदाशीं येथें कांहीं एक कर्तव्य नाहीं.

चळोकापळोकरणें

(क्लृप्) चलीक्लृप् = चलीकलप = चळोकापळो

[

चळोकापळोकरणें म्हणजे वारंवार कल्पना करून घाबरविणें

( ११९ ) चाचपणें

चाचप्यते ( चप् सांत्वने ) (पौनःपुन्य) = चाचपणें

चाचपणें म्हणजे हातानें सांत्वन करणें, नंतर हातानें शोधणें

( १२० ) चाचरणें

( चर ) चाचर्यते = चाचरणें

चाचरणें म्हणजे वांकडें तिकडें चालणें

( १२१ ) चाड

चाटु ( स्तुतीची इच्छा ) = चाड

( १२२ ) चाटळ

चाटुलोल = चाटोळ = चाटळ=चाहाटळ

चाटुलोल म्हणजे थट्टेबाज.

( १२३ ) चापणें

( जि ) जापयति ( णिच् ) = चापणें ज = च जापयति म्हणजे जिंकवितो चापतो म्हणजे जिंकवितो

( १२४ ) चाळ

शाला = साळ = चाळ

( १२५ ) चांदोड

चंद्रपद्र = चांदोड

( १२६ ) चिघळणें

जागल्य =जिगल = चिघळ(चिघळणें) अतिशय गळणें

चिघळणें

( गल् ) जागल्यते = चाघळणें = चिघळणें

( १२७ ) चुरगळ

चूर्णकला = चूरगळ

( १२८ ) चेटका

चाटुकारिन् = चेटका

चेटका म्हणजे मिठें भाषण करणारा.

( १२९ ) चेटुक

चाटुक ( मिठें भाषण ) = चेटुक

( १३० ) चेंव

चितिः ( पुंलिंगीं ) = चेउ० =चेव

चेव म्हणजे जागेपणा

( १३१ ) चोज

चोद्य = चोज्ज = चोज

( १३२ ) चोथा

चुस्तः = चुथ्था = चोथा

( १३३ ) चोपडें

चतुः पद्रं = चउपडें = चोपडें

( १३४ ) चंबू

शंबु ( शंख ) = चंबू ( शंखाकृति पात्रविशेष )

( १३५ ) छकल

शकल = छकल

( १३६ ) छगन ( विशेषनाम )

शकुनि = छगुनि = छगन.

( १३७ ) जगणें

( गम् ) जंगम् = जगणें

जंगम् म्हणजे सातत्यानें जाणें

जगणें म्हणजे सातत्यानें जगांत असणें

( १३८ ) जजु

यज्यु ( यजुर्वेदज्ञ ) = जज्यु, जजु

(१३९) जरा ( थोडें, अल्प, अव्यय)

अचिरात् = जिरा = जरा

अचिरात् गत्वा प्रत्यागच्छामि = जरा जाऊन येतों.

( १४० ) जाग

याग=जाग. खंडोबाचा जाग म्हणजे खंडोबाप्रीत्यर्थ केलेला याग ऊर्फ यज्ञ

( १४१ ) जागृती

जागर्तिः = जागृती

( १४२ ) जाच

यास ( यस् ) = जाच

( १४३ ) जाचक

यासक = जाचक

( १४४ ) जाणावणें

( ज्ञा ) जाज्ञायने = जाणावणें वारंवार समजाविणें

( १४५ ) जायें

येयायेय = यायें ( पहिलें व चवथें अक्षर लुप्त ) = जायें

जायें करतो म्हणजे येयायेयं करोति जायें नाम आहे

( १४६ ) जांव

जांवव = जांव

जांववं नगरं ( पाणिनीय सूत्र २-४-७ खालीं हे शब्द दिले आहेत. )

( १४७ ) जूट

यूथ = जूट

( १४७ ) जोखड, जोकड

योक्त्र = जोकड, जोखड

( १४८ ) जोखा ( चाई )

योपा = जोखा

( १४९ ) जोखीम

योगक्षेम = जोगखेम = जोखेम = जोखीम, योगक्षेम म्हणजे जोखीम पैशाची जोखीम म्हणजे The security of money

१५० ) जोगवण

योगापनं = जोगवण

वा. इ.-३०

( १५१ ) जोगवा

योगोपायन = जोगोवाअण = जोगोवा = जोगवा, कांहीं योग चालविण्याकरितां जें वाण मागणें तो जोगवा

( १५२ ) जोंधळा, जोन्हळा

योनलः, ( यवनालः ) = जोनळा = जोन्हळा = जोंधळा

( १५३ ) झकास

चकास ( चकाकणारें ) = झकास= झकास हें काम झकास झालें म्हणजे स्पष्ट, चकचकित, नामी झालें.

( १५४ ) झटणें

झट् ( संघाते ) = झटणें

तो मला झटला म्हणजे येऊन गच्च भिडला, झटून काम करणें म्हणजे भिडून काम करणें

( १५५ ) झड

झटी, झटा (झट् पसून)= झड; झडीनें, झडेनें

पावसाच्या झडीनें किंवा झडेनें पिच्छा पुरविला आहे

( १५६ ) झाला-ली-लें

कृ, अस्, भू

ह्या तीन क्रियापदांच्या पाठीमागें कोणता हि शब्द लागून संयुक्त क्रियापद संस्कृतांत तयार होतें. तो च प्रकार मराठींत होतो.

सः गंगीभूतः = तो गंगा झाला

सः ब्रह्मीभूतः = तो ब्रह्म - झाला

ब्रह्म-झालेल्याला संसार कोठचा ?= ब्रह्मीभूतस्य कुतः संसारः

येथें मराठी वैयाकरणंमन्य ब्रह्म याचें व्याकरण करूं जातात व त्या प्रयत्नांत

गडबडतात. वस्तुतः ब्रह्मझालेल्याला हा एक शब्द आहे व तो संस्कृतापासून मराठीनें घेतला आहे. ब्रह्मीभूतः या शब्दांत ब्रह्मी या शब्दाचें जसें निराळें व्याकरण नाहीं, तसें च ब्रह्म झालेल्याला ह्या शब्दांत ब्रह्म या शब्दाला निराळें व्याकरण नाहीं.

ती स्त्री राजा झाली = सा स्त्री राजीभूता

राजा झालेल्या स्त्रीस मुगुट घातला = राजीभूतायै स्त्रियै मकुटः दत्तः

येथें राजा हा शब्द निराळा करून व्याकरूं नये.

गाय झालेल्या लोकांस छळूं नये = गौभूतान् जनान् मा छलत ।

येथें गायझालेल्या हा एक शब्द आहे. गाय आणि झालेल्या असे निराळें शब्द करून परिस्फोट करूं गेल्यास घोंटाळा होऊन वांट सांपडणार नाहीं.

**झुलणें झुलवणें झुलावणें**

धूलति = झुलणें

धूलयति = झुलवणें

धूलापयति = झुलावणें.

**( १५७ ) टवचणें**

त्वचय = टवच

त्वचं गृह्णाति–त्वचयति

**( १५८ ) टंगळमंगळ**

तङ्गनं मङ्गनं = टंगळमंगळ

तङ्ग् स्खलने व पङ्ग् गतौ

टंगळमंगळ म्हणजे स्खलन, चुकारपणा

**( १५९ ) ठोकणें ( धूम )**

त्वंगति (उड्या मारीत पळणें) =ठोकतो

धूम ठोकतो म्हणजे धूम पळतो

**ठोकणें ( लांकूड )**

त्वक्षति ( कापणें ) = ठोखणें = ठोकणें

सुतार लांकूड ठोकीत बसला आहे = सूत्रधारः लकुटं त्वक्षति

**( १६० ) डर**

दरः ( भय ) = डर

**(१६१) डोण दोण (नदीनाम, प्रांतनाम)**

द्रोण = दोण, डोण

**( १६२ ) ढकलणें**

अधःकलनं = ढकलणें

**( १६३ ) ढुंगण**

अधोंऽग = ढोंग = ढुंग = ढुंगण (+ण)

**( १६४ ) ढोसणें ( अति भरणें )**

अध्यसनं = ढोसणें

पानीयं अध्यस्यति = पाणी ढोसतो

**ढोसणें ( अति खाणें )**

अध्यशनं = ढोसणें

**( १६५ ) तरणें**

तॄ = तरणें

तरय् – तारय् = तरविणें

तरणें व तारणें हीं दोन अगदीं भिन्न क्रियापदें आहेत

**( १६६ ) तवा**

तपः, तापकः = तवा ( लोखंडाचा )

**( १६७ ) ताम्हण**

ताम्रभांड = तामहाण = ताम्हाण = ताम्हण. ताम्हाण असें रूप जुन्या ग्रंथांत व अद्यापि अशिष्ट लोकांत सांपडतें.

**( १६८ ) तारणें**

त्रै = तारणें

देवः त्रायति = देव तारतो

( १६९ ) तिढें

तिरस् = तिढ ( दा–ढी–ढें )

जसें पुरस् पासून पुढें तसें तिरस् पासून तिढें तिढें. बोलूं नको म्हणजे वाकडें बोलूं नको.

( १७० ) तिरकून

तिर्यक्कृत्य = तिरकून

तो तिरकून वागतो म्हणजे वाकून वागतो

( १७१ ) तुडवणें

तुर्वणं = तुडवणें

तुर्व ( हिंसार्थे )

तुडवणें म्हणजे नष्ट करणें, नाश करणें

( १७२ ) तेवणें (दिवा जळणें)

तेजनं = तेवणें

( १७३ ) थिजणें

( स्त्यै ) स्त्यायति = थिजतें स्त्यै संघातें जलस्य

( १७४ ) थिनलें

( स्त्यै ) स्त्यानं=थिनलें(स्वार्थक ल)

( १७५ ) थोबाडणें

स्तुब्धापनं = थोबाडअणं =थोबाडणें थोबाडणें म्हणजे अवरोध, अटक करणें स्तुभ् रोधने

( १७६ ) दावण ( गुरांची )

दामनी = दावणी = दावण

ज्या लांब दोरीनें गुरांना एका ठिकाणीं ओळीनें बांधतात ती दोरी, लक्षणेनें जेथें बांधतात त्या जागेला हि दावण म्हणतात

( १७७ ) दांतरा

दंतुरः = दांतरा ( रा–रें )

( १७८ ) दुबेळकें

द्विबिलकं = दुबेळकें

दोन बिळें आहेत ज्यांत तें

बिळं म्हणजे splitting, openig, aputure तोंड

( १७९ ) देदेदेणें

( दा ) ददाति = देदेदेणें

( १८० ) दौड

धौर्य } दौड
धोरित }

धौर्य-धोरित म्हणजे अश्वगतिविशेष

(१८१) धकणें, ढकणें

दक्ष् (वृद्धौ) = धकणें, ढकणें

धकणें म्हणजे निभणें, योग्य ठरणें, गोष्ट धकली पाहिजे म्हणजे निभली पाहिजे.

(१८२) धक्का, ढक्का

(धक्क नाशने) धक्कः = धक्का, ढक्का

धक्का

धाकः (ओझें ठेवावयाचा खांब; तक्ता वगैरे ) = धक्का.

धक्का म्हणजे माल, माणसें उतरावयाचा मातीचा, दगडाचा किंवा लाकडाचा ताफा वगैरे

(१८३) धन

फांसे, कवड्या वगैरे टाकून जे दान घेतात त्याला धन म्हणतात. वेदांत धन हा शब्द फाशांच्या दानाला लावलेला आढळतो.

धन = धन

तुला चांगले धन पडलें, तूं चांगलें

धन घेतलेंस, असे प्रयोग होतात. धन चा ध अपभ्रंश दान धन=धान=दान

( १८४ ) धट ( परीक्षा )

धट ( तुला ) = धट

काम धटाला लागलें म्हणजे परीक्षेला लागलें, खरें कीं खोटें याच्या निर्णयाला लागलें.

( १८५ ) धडी–( पगडी )

धटी ( वस्त्रविशेष ) = धडी

( १८६ ) धण ( धाकट )

धणियबंधणबद्धाओ ( भगवतीशतक जैन ग्रंथ )

धनिय म्हणजे निबिड, चिक्कण

धणिय = धण

धणधाकट या जोडशब्दांत हा धण शब्द आढळतो.

( १८७ ) धनकवडी ( ग्रामनाम )

धनकर्वटिका = धनकवडी

कर्वट, कर्वटिका नाम कुनगर

( १८८ ) धपाटा, धपाटणें

अधःपाटन = धपाटणें, धपाटा

धपाटा म्हणजे खालीं पडेसें मारणें

( १८९ ) धश्चोट

अधश्चोदक = धश्चोडअ = धश्चोट

खालीं पाडून मारणारा

( १९० ) धरण

धरणः ( बांध ) = धरण

विनकमानीचा बांध

( १९१ ) धांवा

( ध्यै ) ध्यापः = धावा = धांवा

धांवा म्हणजे वारंवार त्याच च त्या गोष्टीचा उच्चार

( १९२ ) ध्यास ( आसक्ति )

अभ्यास = ध्यास

( १९३ ) धिवसा धिंवसा

अध्यवसाय ( उत्साह ) = धिंवसाअ ( अलोप ) = धिंवसा

( १९४ ) धूड

धोडः ( डुंडुभ, सर्पविशेष ) = धूड

जाडया अवजड सापाला मराठींत धूड म्हणतात. त्यावरून अवजड माणसाला किंवा प्राण्याला हि धूड हा शब्द लावतात.

( १९५ ) धूड, धूढ

अध्यूढ = धूढ, धूड

धूड म्हणजे शरीरानें अति पुष्ट, लठ्ठ

( १९६ ) धुव्वा

धुर्व ( हिंसार्थे ) = धुव्वा

धुव्वा म्हणजे समूळ नाश

( १९७ ) धेंड

अध्येद्ध = धेंड्ड = धेंड

अति वाढलेला, अति मोठा माणूस, पदार्थ, पशु वगैरे

( १९८ ) धोका

धक्कः = धोका ( नाश, नाशाचा संभव )

अ चा ओ

( १९९ ) नकका

( नाकिः अकच्क ) नकाकिः = नककी, नकका

नककी जाऊ = जाऊ नको

नकि = वजने निपातः

( २०० ) नको

नाकिः = नको

जाऊं नको = नकि याहि

बोलूं नको = नकि वद

तात्पर्य, नको हें अव्यय आहे.

( २०१ ) नथ

नप्तिका = नथ्थिआ = नथ

( २०२ ) नथ्या

नस्तितः = नथ्थिआ = नथ्या

मराठींत नाक टोंचलेल्या मुलाला नथ्या म्हणतात. मूल जगावें म्हणून नाक टोंचतात.

( २०३ ) नन्नाचा पाडा

अनन्वयस्य पाठः = नन्ना चा पाडा

ज्यांत अन्वय नाहीं तो अनन्वयपाठ

( २०४ ) नंगा नाच

अनंगनर्तन = नंगनाच = नंगानाच

( २०५ ) नाठाळ

अनास्थालु = नाठ्ठालु = नाठाळ

( २०६ ) नाडणें

नाथ्, नाधृ ( उपतापे ) = नाडणें

( २०७ ) नानू,नानी, ग्यानू,ग्यानी

ज्ञानदेव = ग्यान किंवा नान(एकशेष)

ममतादर्शक ( ग्यानू, नानू )

स्त्रीलिंग ( ग्यानी, नानी )

( २०८ ) नाहीं

नहि = नाहीं

मी गेलों नाहीं =अहं नहि गतःअस्मि

मी जाणार नाहीं = अहं नहि गंतास्मि

तो जाणारे नाहीं = सः नहि गंता

ते जाणार नाहीं = ते नहि गंतारः

मराठींत ते जाणार नाहीत, असें हि म्हणतात. परंतु, तें एका प्रकारें अशुद्ध आहे. तात्पर्य, नाहीं हें अव्यय आहे.

( २०९ ) नावेक

अन्हायक ( अकचू ) = नावक=नावेक

नावेक म्हणजे लौकर

हा शब्द जुन्या मराठी ग्रंथांत फार येतो

अन्हाय म्हणजे लौकर

( २१० ) नांदोड

नंदपद्र = नांदोड

( २११ ) निकर, निकार

निकरः, निकारः = निकर, निकार

निकार म्हणजे पराकाष्ठेची मानहानि

( २१२ ) निवणें ( थंड होणें )

निर्वाणं = निवणें

निर्वा ( क्रियापद )

( २१३ ) निवर्तणें ( मरणें )

निर्वर्तनं = निवर्तणें

( २१४ ) निसटणें

निसृष्ट = निसट्ट = निसट

निसट+णें = निसटणें

निसृज् पासून न निघतां, निसृष्ट पासून निसटणें शब्द निघाला आहे. किंवा निसृज् ह्यांतील ज् चा ट् होऊन त्या पासून हा शब्द निघाला आहे.

( २१५ ) नुमगणें, नुगमणें

अनुगमनं =नुगमणें = नुमगणें

नुमगणें म्हणजे जाणणें

( २१६ ) नोगांग

अनुगंगम् = नुगंग = नोगांग

गंगेच्या कांठचा देश तो नोगांग

गंगा म्हणजे कोणती हि पवित्र नदी. त्यावरून पवित्र नदीच्या कांठच्या एका देशाचें नांव

( २१७ ) पग

प्रक्रम = पगवँ = पगअँ = पग

प्रकृति= पगइ

पग म्हणजे पुढें पाऊल टाकण्याची जागा.

( २१८ ) पगडी पगड

प्रकृति = पगडि, पगड

बारा पगड, अठरा पगड जात, म्हणजे अठरा प्रकृतींचीं माणसें.

पगड म्हणजे प्रकृति

प्रकृति ह्या शब्दाचा पगडि असा अपभ्रंश जैनमहाराष्ट्रींत होतो.

( २१९ ) पघळणें

प्रगलनं = पघळणें

( २२० ) पच्ची

अपश्री = पश्शी = पच्ची ( सौंदर्यनाश)

( २२१ ) पटवणें

( पटु ) पटयति = पटवतो

सः तं पटयति ( पटुं आचष्टे ) = तो त्याला पटवतो म्हणजे कुशल आहे म्हणून दुसऱ्याची खात्री करतो

( २२२ ) पदर

प्रदर (प्रदॄ म्हणजे प्रकर्षानें फुटणें)=पद्र

मुलीला पदर आला म्हणजे प्रदर आला म्हणजे रजःस्राव झाला

( २२३ ) परडें

परिधि = परिडि = परडा, परडें

घरामागील कुंपण घातलेलें परसूं,जमीन

( २२४ ) परतणें

प्रत्त = परत ( परतणें )

परतणें म्हणजे परत देणें.

ही वस्तू परतून ये.

परतणे

प्रती ( प्रति + इ ) = परतणें

परतणें म्हणजे उलट येणें

तो परतला म्हणजे उलट आला

( २२५ ) परिपाठ

परिपाटि = परिपाट, परिपाठ

पठ् या धातूशीं कांहीं एक संबंध नाहीं.

( २२६ ) पलिता

प्रज्वलितः = पलित्ता = पलिता ( जळणारी दिवटी ).

( २२७ ) पवाडा ( कीर्ति, प्रसिद्धि )

प्रवादः = पवाडा

पवाडा ( निंदा )

अपवादः = पवाडा

( २२८ ) पळणें

पल् ( गतौ ) = पळणें

( २२९ ) पळवापळवी

प्रलपना + अपलपनी = पळवापळवी

( २३० ) पळापळ

पलायना + आपलायना = पळापळ

( २३१ ) पाजणें

आप्यायनं = पाजणँ (आलोप ) = पाजणें. आप्यायन म्हणजे संतुष्ट करणें

पितरांना पाणी पाजणें म्हणजे उदकानें संतुष्ट करणें

( २३२ ) पाजी

पाय्यः = पाजी ( तिन्ही लिंगी य अक्षरामुळें ) पाय्य म्हणजे निंद्य, नीच

( २३३ ) पाठवणें

पाथयति ( पथ् णिच् ) = पाठवणें ( धाडण )

( २३४ ) पातळ

पत्रल = पत्तल = पातळ

पाना इतकें जाड म्हणजे पातळ

पातळ

प्रतनु = पतलु = पातलु = पातळ

( २३५ ) पाताळूं

पचालु = पाताळूं(एक प्रकारचें अळूं)

( २३६ ) पाय ( इजा )

अपाय = पाय ( इजा )

रांडेच्या पायीं चुडाळा, येथें पांयीं म्हणजे अपायीं

(२३७) पासीं, पाशीं, पासून, पासोनि

पश्व या शब्दाची पंचमी पश्वात् व सप्तमी पश्वे

पश्वे = पासीं-शीं

पश्वात् = पासोनि, पासून

पश्व म्हणचे शेजार. पासीं म्हणजे शेजारीं

पासून म्हणजे जवळून, शेजारून

घरा पासीं ( येथें घरा ही षष्ठी ) = घरा शेजारीं घरा पासून=घरा शेजारून

( २३८ ) पिच्छा

( पद् ) पित्सा = पिच्छा

पित्सा म्हणजे मिळविण्याची इच्छा

त्यानें पिच्छा घेतला म्हणजे कांहीं एक वस्तु मिळविण्याची इच्छा घेतली

( २३९ ) पिटुकलें

प्रथुक = पिटुक + ल ( स्वार्थक)= पिटुकलें

प्रथुक म्हणजे कोणत्या हि प्राण्याचें लहान अर्भक

( २४० ) पीठवण

पृष्ठिपार्णि = पीठवण

पृश्निपर्णि असा शब्द अर्थव संहितेंत येतो. परंतु मराठींत अपभ्रंश पीठवण असा ठकारयुक्त आहे. तेव्हां पृष्ठिपर्णि असा ष्ठिकारयुक उच्चार मराठीच्या पूर्वजांना माहीत होता असें दिसतें. ही पीठवण कोडावर औषध आहे. अथर्वांत पृश्निपर्णि कुष्ठावर सांगितली आहे.

( २४१ ) पूड, पूडी

पुडि ( खंडने ) = पुड, पूड

पूड म्हणजे वांटून केलेली बारीक भुकटी

पुडी

पुटि, पुटी=पुडी, पूड

( २४२ ) पुरुष

पुरुष म्हणजे नवरा असा अर्थ मराठींत आहे. आमचे पुरुष घरांत नाहींत ह्या वाक्याचा अर्थ माझा नवरा घरांत नाहीं; असा आहे. हा अर्थ मराठीनें संस्कृतापासून घेतला आहे.

त्वं मम भार्या भव अहं तव पुरुषो भवामि ।

( आश्वलायन गृह्यसूत्र–गार्ग्य नारायणीयवृत्ति—१–६–१ )

( २४३ ) पुसपुसणें

पृच्छ्=पुसपुसणें घरच्या गोष्टी पुसपुसून तिनें मला सळो का पळो केलें येथें ही सबंद द्विरुक्ति आहे

फोफसणें

पोपुष्यते ( पुष् पुष्टौ ) =फोफुसणें= फोफसणें फोफसणें म्हणजे अतिशय पुष्ट होणें.

( २४४ ) पेणें

अध्ययनं = पेणें

अध्ययन म्हणजे जोडणें

( २४५ ) प्रेष

प्रेष्य = प्रेष

प्रेष म्हणजे जासूद

( २४६ ) पोई ( वनस्पतीविशेष, माडवी वेल )

उपोदिका = पोइआ ( उलोप ) = पोई

( २४७ ) ( पोपट ) पंची

पंचिका ( पंचू विस्तारवचने ) = पंची

पोपटपंची म्हणजे पोपटाचें विस्तृत तें च तें बोलणें.

पोपट

पोपुस्यते ( पुटू भाषायां ) = पोपट

वैशेष्यानें अतिशय बोलणारा पक्षी तो पोपट प्रथम पोपट हें त्या प्राण्याचें गुणदर्शक विशेषण होतें. नंतर विशेषण च त्याचें सामान्य नांव झालें.

( २४८ ) पोपडा

पोपुड्यते ( पुड उत्सर्गे ) = पोपुडा, पोपडा. सुटून निघालेला कवचा म्हणजे पोपडा

( २४९ ) पोर

पोर शब्द मराठींत पुल्लिंगी हि आहे व स्त्रीलिंगी आहे. नपुंसकालिंगाशीं सध्यां कर्तव्य नाहीं. संस्कृतांत हि पुत्र शब्द मुलग्याचा हि वाचक आहे व मुलगीचा हि वाचक आहे.

पुत्रशब्दः पुंसि स्त्रियां च स्मृतौ दृष्टः ।
अकृता वा कृता वापि यं विन्देत्सदृशात्सुतं
पौत्री मातामहः तेन दद्यात्पिंडं हरेद्धनम् ॥
इति ।
दौहित्रेण मातामहः पौत्री भवतीत्यर्थः ।
मनुः ।
लोके च दुहितरि पुत्रशब्दं प्रयुञ्जाना दृश्यन्ते एहि पुत्रेति । मंत्रे च दृश्यते । " पुमान्स्ते पुत्रो जायताम् " इति । तस्मात् पुमांसः पुत्राः इति विशेषणं । (आश्वलायनगृह्यसूत्र- गार्ग्यनारायणीय-वृत्ति-१-७-३ )

( २५० ) फड ( निवडुंगाचा )

स्फटः = फड

सापाच्या स्फटेसारखा दिसणारा निवडुंगाचा भाग तो

( २५१ ) फळफळणें

फल् = फळफळणें

सबंद द्विरुक्तीनें हि मराठींत पौनःपुन्यवाचक क्रियापदें साधतात

( २५२ ) फांड

स्फटी = फाडी

सोनार लोक फाडी लावून धातु शुद्ध करतात.

( २५३ ) फाड-फाडी

स्फटिक = फाड-डी

दगडाच्या चिऱ्यांना फाड म्हणतात

( २५४ ) फाटणें

( स्फुर प्रकाशणें) स्फारयति (णिच्)- = फाटणें

फाटलें म्हणजे प्रकाशलें, उजाडलें

( २५५ ) फार चड

प्रचंड = फार चड

तस्य करणं प्रचंडं = त्याचें करणें फार चड आहे. चड, चडेल हे शब्द चंडपासून निघाले आहेत.

( २५६ ) फुकट

फू(त्कृ)तं = फुकृट = फुकट

केवळ फूत् असा तोंडानें वारा सोडून होणारें तें फुकट

( २५७ ) फुंकरणें, फुकरणें

फुंकृ = फुंकरणें

फूत्कृ = फुकरणें, फुंकरणें

संस्कृतांत फुल्कु, फुल्कु व फुंरु अशीं तिन्हीं रूपें असावीं.

( २५८ ) फोफसा

पोपुष्यः = फोफसा ( अतिशय पुष्ट )

( २५९ ) बट्टू

अवटु ( मानेवरचा उंच भाग )=बटु ( अलोप ) = बट्टू

( २६० ) बदडणें

( बध् लग आदिना ताडणे, उपरोधे )

बंद्धं = बद्द = बदडणें

बदडणें म्हणजे काठी वगैरेनी उपरोध करणें.

( २६१ ) बद्दू

अवद्य=बद्द ( अलोप )=बद्दू

अवद्य म्हणजे निंद्य

( २६२ ) बनशीधर

वंशीधर ( कृष्ण )=बनशीधर. वंशी ( कृष्ण )=बनशी वंशी ( स्त्री ) वाद्य-विशेषः वांशिन् ( पु ) वंशवाद्य ज्याच्या जवळ आहे तो

( २६३ ) बस ( वजन, अधिकार )

वश=बस, हरिसवसविसप्पमाणहियए= हर्षवशविसर्पद्हृदयः त्याचा बस बसला म्हणजे त्याचा वश, अधिकार, सत्ता स्थापित झाली.

( २६४ ) बस्तान

अवस्तान = बस्थान = बस्तान ( अलोप )

बस्थान म्हणजे अवस्था, स्थिती

( २६५ ) बप्पीह ( चातक ), बापू

वापीह ( वापीला टाळणारा, चातक )= बप्पीह = बापू, चातक विहिरीचें पाणी पीत नाहीं.

( २६६ ) बाका—की—कें

पाकः = बाका = बाका-की-कें

पाकशब्दः प्रशंसायां प्राशस्त्ये वा । ( आश्वलायनगृह्यसूत्र गार्ग्यनारायणी-यवृत्ति १—१—२ )

हा पाक शब्द अल्पत्वार्थक हि संस्कृतांत आहे. परंतु, त्यापासून मराठींत कोणता अपभ्रंश झाला आहे, तें सध्यां सुचत नाहीं.

( २६७ ) बागलाण

व्याघ्रारण्य = बागरारण = बागलालण= बागलाण, वाघ आहेत फार ज्या अरण्यांत तें व्याघ्रारण्य ऊर्फ बागलाण हा प्रदेश सध्यां हिरानमय आहे.

( २६८ ) बारगीर

वारकीरः ( porter ) = बारगीर

लाख्या बारगीर, त्या प्रयोगांतील बारगीर संस्कृत वारकीर या शब्दापासून निघालेला आहे. फारशी बारगीर शब्द निराळा.

( २६९ ) बारबोड्या

[illegible]

( २७१ ) बाहाणें, बाहणें

व्याव्हानं = बाहाणें, बाहणें

व्याव्हे म्हणजे निरनिराळ्या माणसां-
निरनिराळें बोलावणें.

( २७२ ) बाँवरणें

( भ्रम् ) बंभ्रम्यते = बाँवरणें

( २७३ ) बिघाड

अभिघात = बिघाड

बिघाड

विघात = बिघाड

बिघाड

विघाटः = बिघाड

( २७४ ) बिचकणें

बिचक् ( चक् भिणें ) = बिचकणें

( २७५ ) बिडलोण

विड्लवण = बिडलोण

( २७६ ) बित्तंबातमी

बातमी हा बातनी ह्या फारसी शब्दापासून मराठींत आला आहे. व बित्तं हा शब्द संस्कृत वृत्त शब्दापासून किंवा विवृत्त शब्दापासून निघाला आहे.

वृत्त = वित्त = बित्त

विवृत्त =बिवत्त = बिअत्त=बित्त

विवृत्त म्हणजे विशेष वृत्त

बित्तंबातमी हा मुसलमानी अमलानंतर मराठींत जोड शब्द बनला आहे. बित्तं म्हणजे बातमी.

(२७७) बिब्बा

विभाषा=बिबासा=बिबाहा=बिब्बा

त्यानें ह्या कामा मध्यें बिब्बा घातला म्हणजे विकल्प घातला येथें बिब्बा म्हणजे विकल्प असा अर्थ आहे.

बिब्बा घालूं नको म्हणजे हें करूं कां तें करूं, असा विकल्प आणूं नको.

(२७८) बुचडणें

व्युच्चरणं = बुचडणें.

तां व्युच्चरति=तिला बुचडतो

बुचाडणें

व्युत्सादनं=बुचाडणें

व्युत्सादयति = बुचाडतो

बुचाडणें

व्युच्चाटनं = बुचाडणें

( २७९ ) बुडणें

बुड् ( बुडणें ) =बुड

( २८० ) बुर्बुर

बुर्बुर किंवा बर्बुर ( उदके निघंटुः ) =बुर्बुर पावसाची बुर्बुर म्हणजे पावसाचें पाणी

( २८१ ) बेघाट

विघाट=बेघाट

( २८२ ) बेपरवा

द्विप्रव्राजिनी=बिपरवाई=बेपरवारि द्वौप्रव्रजतीति द्विप्रव्राजिनी स्वैरिणी इति यावत् ।

( अश्वलायनगृह्यसूत्र – गार्ग्यनारायणीयवृत्ति-१-५-६ )

एकदां प्रव्रजन शास्त्रसिद्ध आहे. दोनदां प्रव्रजन करणें म्हणजे स्वैराचरण होय. बेपरवा म्हणजे स्वैरवृत्तीची.

बेपरवा हा फारशी शब्द निराळा. त्याचा अर्थ बेमुरवत असा आहे.

संस्कृतोत्पन्न बेपरवा ह्या शब्दाचा अर्थ स्वैराचारी.

(२८३) बेंबटणें

बेबिट्यते (बिट् आक्रोशे) = बेंबटणें, बेंबटणें

अतिशय आक्रोश करणें, म्लान होणें, अशक्त होणें.

(२८४) बेबळणें

बेबिल्यते (बिल भेदने) = बेबळणें

अतिशय भेदणें

(२८५) बेसन

वेसनं = बेसन

वेसनं म्हणजे डाळीचें पीठ

(२८६) बेळकें

बिलकं बेळकं

(२८७) बोड्यो

वर्धक = वड्डअ=बोड्डअ=बोड्डा–ड्डी–ड्डुं

वर्धककः = बोड्यो.

मुलाला वर्धक, वर्धमान इत्यादि शुभ शब्दांनीं हाक मारण्याची चाल संस्कृतांत होती.

(२८८) बोडन्ती

मोटन्ती = वोडन्ती = बोडन्ती

मोटन्ती म्हणजे मोडणें, हाणून पाडणें, मी त्याची बोडन्ती केली म्हणजे मीं त्याला वाचेनें हाणून पाडिला.

(२८९) बोभाट

(भर्त्स्) बाभर्त्स्यते = बोभाटतो

(२९०) बोळ (औषध)

बोल = बोळ Gum-myrrh

(२९१) बोंचणें

(कर्मणि) ब्रूस्यते = बोंचतें (अकर्मक) ब्रूस् इजा करणें हिंसायां ब्रूसयति = बोंचतो (सकर्मक)

(२९२) भगवें

भृगु (tawny) = भगवें

(२९३) भडभडून

भटभटायित्वा = भडभडून

भडभड आवाज होऊन किंवा करून

(२९४) भरकटणें

अभ्यवकर्षणं = भरकरणें (र व क यांचा परिवर्त)

भरकटणें म्हणजे वांकडें तिकडें लिहिणें

(२९५) भरभरणें

बर्भर्ति (भृ) = भरभरणें

भरभरणें, म्हणजे अतिशय भरणें

(२९६) भरभराटणें

बर्बर्हि (बृह वृद्धौ) = भरभराटणें

भरभराटणें म्हणजे अतिशय वाढ होणें

(२९७) भलोबा

भलन्दनः (एकशेष) = भलः = भलोबा (आदरार्थक)

(२९८) भाटोडें

भट्टपद्रं = भाटोडें

भाटोड्यास रहाणारे भाटोडेकर

(२९९) भास

अभ्यास = भास (अलोप)

त्याला शास्त्राचा किंचित् भास आहे, ह्या वाक्यांत भास या शब्दाचा अर्थ अभ्यास असा आहे.

(३००) भांबावणें

बंभ्रम्यते (भ्रम्) = भांबावणें

भांबावणें म्हणजे अतिशय भ्रममाण होणें.

(३०१) भिकाटणें

भिक्षाटनं = भिकाटणें

परंतु तें औषध, तो उपाय, ती मृत्युला मारक आहे. मूळ संस्कृत प्रत्यय दोन्ही ठिकाणीं निरनिराळे आहेत.

( ३१८ ) मिठी

मिलित = मिठिअ = मिठी

मिठी म्हणजे दोन माणसांचें चिकटणें.

( ३१९ ) मिरवणें

मिहिरायते = मिराअते = मिरवतो

मिहिर ( सूर्य ) = मीर, मिर

मिहिरायते म्हणजे सूर्याप्रमाणें चमकतो. किंवा,

मील् = मिर

मीलन् = मिरव

मील् म्हणजे चमकणें

अशी हि व्युत्पत्ति होईल.

( ३२० ) मिंधा ( धा—धी—धें )

( मिथ् ) मिद्धः = मिंधा मिध, मिथ् म्हणजे प्रेमानें एकत्र होणें. मिंधा म्हणजे कशाच्या तरी करितां दुसऱ्याशीं मिधून वागणारा

( ३२१ ) मुकटा

मूतकः = मुटका = मुकटा

( मू विणणें ) मूत ( शिवलेला ) पासून मूतक म्हणजे विणलेलें वस्त्र. कोशाचें, रेशमाचें, तागाचें विणलेलें जें वस्त्र तें मूतक

( ३२२ ) मुरोड, मुरूड

मरुपद्र = मरोड, मरूड, मुरूड, मुरोड

( ३२३ ) मेडशिंग

मेढ्रशृंगी = मेडशिंग ( स्त्री )

( ३२४ ) मेर

मीरः ( मर्यादा ) = मेर ( स्त्री )

( ३२५ ) मेनाबाई

मेना अथवा मेनका = मेणआ = मेणा = = मेना = मैना

मेणाबाई, मेणाबाई असे हि उच्चार करतात.

मैनानामक पाखराशीं कांहीं संबंध नाहीं.

( ३२६ ) मोकाटणें

मुक्तानं = मोकाटणें

( ३२७ ) यमी यमू,

यमुना=यमू, यमी ( एकशेष )

( ३२८ ) येशी, येसू

यशोदा=येशी, येसू ( एकशेष )

( ३२९ ) युधि आणि गवि

पदप्रक्रियेंत गवियुधिभ्यां स्थिरः ( ८–३– ५ ) हें सूत्र पाणिनि देतो. हलदन्तात् सप्तम्याः संज्ञायां ( ६–३– १ ) या सूत्राखालीं कांहीं पाणिनीनें गवियुधिभ्यां स्थिरः हें सूत्र दिलें नाहीं. म्हणजे गवि व युधि ह्या गो व युध् या शब्दांच्या सप्तम्या कांहीं पाणिनि गवियुधिभ्यां स्थिरः या सूत्रांत समजत नाहीं. गवि व युधि हीं पाणिनि मतें प्रातिपदिकें आहेत. गव्यूति व युधिगम या समासांत गवि व युधि हे शब्द प्रातिपदिक असलेले स्पष्ट दिसतात. सबब गवि व युधि ह्या सप्तम्या घेऊन गविष्ठिर व युधिष्ठिर हे समास अलुक्समासांत काढण्याचें कारण नाहीं.

( ३३० ) रगत

रक्त = रगत

रात किंवा राक असा अपभ्रंश नियमाप्रमाणें न होतां, मराठींत रगत अपभ्रंश झालेला आहे.

भक्त = भगत

शक्त = सक्त

फक्त = फकत

तख्त = तखत

वख्त = वखत

क्लिष्ट = किळसट

लुब्ध = लुबड

भ्रष्ट = भाजट

कुष्ट = कुजट

घुष्ट = घुसळ

संस्कृतांत किंवा इतर भाषांत ज्या शब्दाचे अन्त्य क्त, ख्त, ब्ध, ष्ट हीं जोडाक्षरें असतात, त्या शब्दांचे मराठींत अपभ्रंश जोडाक्षरें फोडून होतात.

रगत म्हणजे तांबडा असा अर्थ आहे. लालरगत हें मराठींत जोड विशेषण मुसुलमानकालीं बनलें आहे.

( ३३१ ) रगतगळूं

रक्तगुल्म = रगतगळूं

( ३३२ ) रश्शी

रज्जु = रस्सू = रस्सी

रशना = रसना = रस्सी

रश्मि = रस्सि = रस्सी

तिसरी व्युत्पत्ति विशेष ग्राह्य व तिन्ही खऱ्या

( ३३३ ) रस्सा

रसकः = रसा

रसक म्हणजे मांसाची आमटी, soup

( ३३४ ) रहाणें

लयनं = रअणें = रहणें = रहाणें-राहणें

लयनं म्हणजे वास करणें, वास करण्याचें स्थान.

रहाणें हा मराठी धातु ली-लय् ह्या संस्कृत धातूपासून निघाला आहे ह्यांत संशय नाहीं.

( ३३५ ) राखी

रक्षी अथवा रक्षा = राखी

श्रावणी पूर्णिमेला मनगटांत बांधलेली दोरी

( ३३६ ) राजवर्खी ( बांगडी )

राजवर्चस = राजवर्क, राजवर्ख

राजाला शोभण्यासारखी, उत्तमोत्तम

( ३३७ ) राजेलोक

राजलोकाः = राजेलोक

राजांचें मंडळ

( ३३८ ) रांगणें

रंगण = रांगणें

( ३३९ ) रीस

ऋषभ = रिसह = रीस

मराठींत अडाणी बेडोल माणसास रीस म्हणतात.

मूळ ऋषभ हा शब्द संस्कृतांत पुरुषऋषभ वगैरे सामासिक शब्दांत श्रेष्ठत्व दर्शवितो. विपरीत लक्षणेनें मराठींत रीस कनिष्ठत्व, अधमत्व दर्शवितो.

( ३४० ) रेघाटणें, रेखाटणें

रेषाकर्षणं = रेघाटणें, रेखाटणें

( ३४१ ) रोळी

र व ण क<br>र व णि का } = रोणी = रोळी

रं व ण क म्हणजे पाणी निथळण्याकरितां केलेलें कळकाचें पात्र.

( ३४२ ) लखमल

रक्षामल्ल = रखमल, लखमल

( ३४३ ) लज्जत

रसयतिः = लसअति = लअति = लजत् = लज्जत्

रसयति म्हणजे चव

( ३४४ ) लडका–की

लाडू ( बाई )

दारक = डारक-लाडक = लडक ( का–की )

लडका व लडकी हे दोन शब्द हिंदी भाषेत प्रचलित आहेत, मराठीत नाहीत. हिंदीत नपुंसकलिंग नाही. आतां दारिका = डारिआ = लाडिआ = लाडी.

लाडी हा स्त्रीवाचक शब्द मराठीत प्रचलित आहे. लाडू हें त्याचें दुसरें रूप आहे. लाडका–की–कें हे लड् धातूपासून निघाला असून लडका–की या शब्दाहून अर्थात् निराळा आहे.

( ३४५ ) लव बाई लव

लम पुत्रि लम = लव बाइ लव

अगदीं दोन तीन वर्षांच्या मुलींचें खेळतांनां म्हणण्याचें गाणें आहे. त्यांत आई म्हणते लव बाई लव. येथें लव हा शब्द लम् ( रमणें ) या धातूपासून निघाला आहे. लम = लमस्व = लव लम् हें रम् चें प्राकृत रूप आहे. रम आत्मने परंतु लम परस्मै. लव बाई लव म्हणजे रम पोरी रम, खेळ पोरी खेळ

( ३४६ ) लाटणें ( हाताचें )

रत्नि = लटणि = लाटणी = लाटणें

( ३४७ ) लाथाडणें

लत्तास्तृतं = लाथाड, लाथाडणें (+णें )

संस्तृत = संथड ( जैनमहाराष्ट्री )

उपस्तृत = उपत्थड ( जैनमहाराष्ट्री)

( ३४८ ) लिंग्या.

लिंगिन् ( लुच्चा, ढोंगी ) = लिंगी

लिंगिकः = लिंगिआ = लिंग्या

( ३४९ ) लुचाडणें

लुच्चापनं = लुचाडअणं = लुचाडणें

( ३५० ) वग

अवगति = वगइ ( अलोप ) = वग ( स्त्रीलिंग ) अवगति म्हणजे माहिती, परिचय, ज्ञान

( ३५१ ) वडूथ

वरूथ = वडुडु = वडूड = वडूथ

( ३५२ ) वरुळी, उरुळी

उरः पल्ली = उरुळी, वरुळी

( ३५३ ) वर्म

मर्मन् = वर्म

स मे मर्म क्राथयति = तो माझें वर्म काढतो क्राथ्=काढ म्हणजे हाणणें

स मे मर्माणि कर्षति = तो माझीं वर्में काढतो कृष् = काढ म्हणजे फरफटून ओढणें

( ३५४ ) वळणें

वृत्–वर्तय् = वळ हस्तवर्तं वर्तयति= हातानें गोळी वळतो, गोवरी वळतो = गोपुरीषं वर्तयति

( ३५५ ) वाढवीस, वाढदिवस

वर्धमान दिवस वाढद्दिस=वाढवीस, वर्धमानदिवस ( नाळ कापण्याचा दिवस ).

( ३५६ ) वायन, वाण

उपायन = वायन, ( वाअण )वाण

( ३५७) वावरणें

( व्रज् ) वाव्रज्यते=वावरतो. वावरणें

म्हणजे वांकडें तिकडें फिरणें

( ३५८ ) वांडकीच ( चा-ची-चें )

वान्धाकिनेय = वांडकिच (चा-ची-चें) छिनाल बाईचें पोर

( ३५९ ) वाँधा

(स्त्री) वाधा ( विरोध ) = वाँधा (पुलिंग)

( ३६० ) वांव

व्याम ( चार हात प्रमाण अंतर )= वांव

( ३६१ ) विकणें, विकतो (अकर्मक)

अविख्याति = भिख्याति=विके = विके

तो बापाच्या नावावर विकतो = सः पितृनाम्ना अभिख्यायते

पदार्थांची विक्री करणें ह्या वाक्यांतील विकणें या धातूहून प्रस्तुत विकणें धातू निराळा

( ३६२ ) विर्घळणें

आविर्गलनं = विर्घळणें

( ३६३ ) विझणें

विध्मा = विज्झा = विझ

विझ+णें = विझणें

( ३६४ ) विटणें

विंटनं = विटणें

विण्ट् वुण्ट् हिंसने, वस्त्र विटलें = वस्त्रं विंटितं किंवा वुंटितं

( ३६५ ) विटाळ

भ्रष्ट = बाट

विभ्रष्ट = बिट

भ्रष्टविभ्रष्ट = बाटबिटणें

विभ्रष्टनं = विटणें

विटाळशी

विभ्रष्टरजा = विटलसी = विटाळसी जिचें रजस् भ्रंश होते ती विटाळशी

( ३६६ ) विटाळणें

विट्टलितं विटालितं = विटळलें विटळलें पिलालितं विटालितं= विटाळलें टल् टल् वैक्लव्ये

( ३६७ ) विटाळशी

( १ ) विष्टरजस् = विट्टलसी = विटळशी = विटाळशी

विष्टं रजः यस्याः विष्टरजाः

विष्ट म्हणजे टाकाऊ

किंवा

( २ ) विष्टालसा=विट्टाळशी =विटाळशी

विष्टया अलसा म्हणजे विष्टेनें मंद, थकलेली

विष्टा म्हणजे शरीरांतून वहाणारें टाकाऊ रक्त

परंतु रजस् या पदार्थाशीं ज्या अर्थी विटाळशीचा संबंध आहे त्या अर्थी पहिली व्युत्पत्ति ग्राह्य दिसते.

विटाळशी

विष्टरजाः = विट्टलसी = विटाळसी

विष्ट म्हणजे स्रवणारें आहे रजस् रजस् जिचें ती स्त्री

बहुव्रीहि समास.

विष्ट सेचने या धातूचें निष्ठारूप विष्ट.

विष्ट म्हणजे स्रवणारें.

विष्टरजस् म्हणजे जिचें रजस् स्रवतें आहे ती स्त्री

ह्या शब्दाच्या अनेक व्युत्पत्त्या मी करून पाहिल्या. परंतु ही व्युत्पत्ति आतां कायम समजावी.

( ३६८ ) विटी

वीटा ( महाभारत-आदिपर्व )=विटी विटीदांडूच्या खेळांतील हत्यार

( ३६९ ) त्रिळा, विळी, इळा, इळी

इली ( शस्त्रविशेष ) = विळी, इळी ( पुल्लिंग ) इळा, विळा

( ३७० ) शारंगपाणी

शार्ङ्पाणि = शारंगपाणी, सारंगपाणी

( ३७१ ) शिरणें

श्रि = शिर ( शिरणें ) श्रि म्हणजे जाणें तो घरांत शिरला= सः गृहं श्रितः

( ३७२ ) शिरोड, शिरोळ

श्रीपद्र = शिरोड, शिरोळ

( ३७३ ) शिंकरणें

सिंघाणकरणं = शिंखाणअरणँ = शिंकारणें = शिंकरणें

शिंकरणें म्हणजे नांकांतला मळ काढणें.

( ३७४ ) शिंपणें, शिपणें

सिन्वू = सिप्प = शिपणे, शिंपणें

सिन्व् सेचने

( ३७५ ) शेगडी

शकटी = शगडी = शेगडी

अंगारशकटी = आगीची शेगडी

( ३७६ ) शेंजार

( १ ) सज्जगृह=सज्जार=सेजार=शेजार

शेजार म्हणजे जवळचें घर

( २ ) सज्जकार=सज्जार=सेजार=शेजार

सज्जकार म्हणजे जवळीक, जवळ करणें

त्या पुस्तका शेजारीं हें पुस्तक ठेव= तस्य पुस्तकस्य सज्जकारे इदं स्थापय

सज्ज चिकटणें, जवळ होणें.

( ३ ) शय्यागृह = शेजार, सेजार.

( ३७७ ) शेंदणें, सेंदणें

स्यन्दनं = शेंदणें, सेंदणें

( ३७८ ) सउरा, सौरा

शकुलः = सउरा, सौरा

वा. इ.-३२

( ३७९ ) सकारणें

सत्कृ = सकार ( णें )

( ३८० ) सगुण ( विशेषनाम )

सुगण्=सगुण, आत्माराम सगुण ह्यांतील सगुण शब्द सुगणू, शब्दाचा अपभ्रंश आहे,

( ३८१ ) संघष्टण

संघर्षण पासून संघष्टण आला नाहीं. संघृष्ट पासून संघष्ट आणि संघष्ट पासून संघष्टण—घृष्ट असा धातू धरला. संघर्षण पासून सांघरण असें रूप व्हावें. तें वर्तमान मराठींत नाहीं. संघष्टण आहे.

( ३८२ ) संसार ( योनि )

संसारमार्गः योनिद्वारे ( त्रिकांडशेषः ) संसार म्हणजे योनि, असा अर्थ संस्कृतांत आहे. तो च महाराष्ट्रांत मराठींत परंपरेनें रूढ आहे.

( ३८३ ) साज

सज्जा ( Equipment ) = साज

सारा साज तयार करून, कसबीण नाचूं गाऊं लागली.

( ३८४ ) साळू ( विशेषनाम )

चारु = साळु, साळू, साळू म्हणजे सुंदर

( ३८५ ) सांजा

संयावः = सांजाआ = सांजा, संयावस्तु घृतक्षीरगुडगोधूमपाकजः । दूध, तूप, गूळ व गहू मिळून जो पाक त्याचें नांव सांजा.

( ३८६ ) सांदी

संधि = सौंधि = साँदी भिंतीच्या सांदीस बसूं नको म्हणजे भिंतीच्या संधीस, जेथें दोन भिंती मिळतात तेथें

( ३८७ ) सांबळ, संबळ, चंबळ, चवाळे

शंबल ( पाथेयपात्र ) = संबळ, सांबळ, चंबळ, चवाळें

( ३८८ ) सुखाटणें

सुखाटनं = सुखाडणें

( ३८९ ) सुगंधी

सुवासिक तेलें विकाणाऱ्याला, आपण सध्यां मराठींत सुगंधी म्हणतो. कात्यायनकालीं त्याला सुगंध म्हणत-सुगंधः आपणिकः । परंतु, कात्यायनकालीं सुगंधि हा शब्द फुलें वगैरेंना लावीत. सुगंधि पुष्पं, सलिलं ।

( ३९० ) सुटणें

सृष्ट = सुट्ट = सुटणें

बाण सुटला = बाणः सृष्टः

( ३९१ ) सुटसुटित

सुट्टसुट्टित = सुटसुटित

सुट्ट अल्पीभावे. सुटसुटित म्हणजे लठ्ठ नव्हे तो, सडपातळ

( ३९२ ) सोकावणें

सक्त=सक्क=सोक=(क्रियापद) सोकावणें

सोकावणें म्हणजे सक्त होणें

( ३९३ ) सोगभोग

सौभाग्यभंगः = सोहागभंग = सोआगभग = सोगभोग

अ चा ओ

( ३९४ ) सोप ( पा-पी-पें )

(सु+उपाय) सूपाय = सोपा (पा-पी-पें)

(सु+आप्यं) स्वाप्यं = सोप ( पा-पी-पें )

सुलभ आहे उपाय ज्याला तें सूपाय

किंवा

सुखानें लभ्य तें स्वाप्य

( ३९५ ) हापटणें, आपटणें

आपाटनं = हापटणें, आपटणें

( ३९६ ) हार ( स्त्रीलिंगी )

( आहार ) आहृति = हारि, हार ( ओळ, रांग )

( ३९७ ) हाँतर ! ( अव्यय )

अंतर् ( अनुमत्यर्थक अव्यय ) = हाँतर !

( ३९८ ) हिरवें चार

हरित् शारं= हिरवें चार, शार म्हणजे चित्रवर्ण हिरवें चार म्हणजे हरिद्वर्ण व चित्रवर्ण

( ३९९ ) हुडुत

हिरुत् वर्जने अव्ययं ।

(अकच् )हिरकुत् = हिडउत् = हिडुत् = हुडुत्

हुडुत्, निघ येथून; हुडुत् तुझा हल्या मारी; वगैरे वाक्यांत हें वर्जनार्थक अव्यय मराठींत योजतात.

( ४०० ) हूद ( पानमांजर )

उद्र ( पानमांजर ) = ऊद = हूद

वि. का. राजवाडे

---

# सूची

इ



उ



ऋ



ए

## ख

## ग

### ध



### न

प

## भा. इ. सं मंडळांचे उद्देश व नियम

( १ ) संशोधनाचें काम वर्षानुवर्ष सारखें व्हावें ह्मणून तीन चार संशोधकांची या च कामीं नेमणूक करून त्यांचा योगक्षेम चालविणें.

( २ ) आपल्या महाराष्ट्रांत च अजून कित्येक ऐतिहासिक घराणीं अशीं आहेत कीं त्यांच्याकडील कागदपत्रांचा आपणास कांहीं च शोध नाहीं. तो शोध लावून ते कागदपत्र मिळविणें.

( ३ ) मराठी भाषेच्या उत्पत्तीपासून तों शके १७४० पर्यंत मराठींत जें अनेकविध सारस्वत निर्माण झालें त्यापैकीं सहस्रांशाची फार तर आपल्यास माहिती झाली आहे. बाकीचें जें सारस्वत अज्ञातवासांत पडलें आहे तें प्रकाशांत आणणें.

( ४ ) एतद्विषयक सर्व संदर्भग्रंथांचा संग्रह करणें.

( ५ ) इतिहासाच्या साधनांचे खंड व काव्यग्रंथ प्रकाशित करणें.

( ६ ) व्यक्तिशः सभासदांकडे जो संग्रह झाला आहे व यापुढें मंडळाचे प्रयत्नानें जो होणार आहे तो अग्नीपासून सुरक्षित ठेवण्यासाठीं सरस्वतीमंदिर बांधणें.

( ७ ) संशोधनात्मक निबंध व टांचणें त्रैमासिक, षाण्मासिक अगर वार्षिक वृत्तरूपानें प्रकाशित करणें.

हीं व या च धोरणाचीं इतर कामें विस्तृत प्रमाणावर व्हावींत असा मंडळाचा हेतु आहे.

मंडळाचे सभासद होण्याविषयीं नियम पुढीलप्रमाणें आहेत.

( अ ) मंडळास दरसाल ३०१ किंवा अधिक रुपये देणारे " आश्रयदाते" होत.

(आ) दरसाल १२५ अथवा अधिक रुपये देणारे "हितकर्ते" होत.

( इ ) दरसाल २५ अगर अधिक रुपये देणारे "सभासद" होत.

(वरील तिन्ही वर्गाच्या हातीं मंडळाची व्यवस्था राहील. )

( ई ) दरसाल किमान १२ रुपये देणारे " सभासद वर्ग २ " होत.

( उ ) दरसाल किमान ६ रुपये देणारे " सभासद वर्ग ३ " होत.

( ऊ ) दरसाल किमान ३ रुपये देणारे " सभासद वर्ग ४ " होत.

पहिल्या चार वर्गाच्या सभासदांना मंडळाकडून प्रकाशित होणाऱ्या ग्रन्थांची निराळी किंमत पडणार नाहीं. ते ग्रंथ ३ ऱ्या वर्गाचे सभासदांस निम्या किंमतीस व चवथ्या वर्गाचे सभासदांस पाऊणपट किंमतीस मिळतील. जास्त माहिती चिटणिसांकडे मिळेल.

☞ **मंडळाचें वर्ष चैत्र ते फाल्गुन**